


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








वर्ष. १५ अंक ६१ जाने. १९४२

" " ६२ फेब्रु. १९४२

" " ६३ जुलै १९४२ (फाटका)

" " " ६४ आक्टो. १९४२

म. सा. प. पृ - २९९-३०४

संपादक – के. नारायण काळे

वर्ष १५ वे जाने. १९४२ अंक १ ला जानेवारी

" " एप्रिल १९४२ अंक २ रा

" " जुलै १९४२ अंक ३ रा

" " ऑक्टोबर १९४२ अंक ४ था

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्



## नियामक मंडळाची त्रैवार्षिक निवडणूक (१९४३-१९४५)

## नवीन सभासदांची यादी

### अधिकारपरत्वें सभासद

**अध्यक्ष**— प्रि. वामन मल्हार जोशी.

**अुपाध्यक्ष**— म. म. पांडुरंग वामन काणे, प्रो. दत्तो वामन पोतदार, श्री. नारायण गोविंद चापेकर, श्रीमंत माधवराव विनायक किबे, श्री. भास्करराव विठोजीराव जाधव.

**कार्याध्यक्ष**— रा. सा. र. लु. जोशी.

**खजिनदार**— प्रि. धनंजय रामचंद्र गाडगीळ.

### प्रादेशिक सभासद

**मुंबअी**— आचार्य प्रल्हाद केशव अत्रे, प्रो. अ. वा. गजेंद्रगडकर, श्री. वामन रावजी ढवळे, श्री. दत्तो अप्पाजी तुळजापुरकर, डॉ. अमृत नारायण मालेराव.

**दादर व अुपनगरें**— प्रो. अनंत आत्माराम काणेकर, प्रो. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, प्रो. श्रीधर बाळकृष्ण रानडे.

**पुणें शहर, जिल्हा व भोर संस्थान**— श्री. विठ्ठल दत्तात्रेय घाटे, श्री. केशव नारायण काळे, सौ. आनंदीबाअी शिर्के, श्री. कृष्णाजी गणेश लिमये, प्रो. रामचंद्र श्रीपाद जोग, श्री. बाबूराव गणपतराव जगताप, श्री. चिंतामण गणेश कर्वे, श्री. जनार्दन सखाराम करंदीकर, श्री. गंगाधर माअूराव निरंतर, श्री. गोपीनाथ गणेश तळवलकर.

**सातारा जिल्हा आणि औंध व फलटण हीं संस्थानें**— श्री. रामचंद्र सदाशिव ढवळे.

**अहमदनगर जिल्हा**— श्री. रामचंद्र बळवंत हिवरगांवकर.

**नाशिक जिल्हा**— श्री. सोपानदेव नथू चौधरी.

**पूर्व खानदेश**— श्री. मुरलीधर डी. गंधे.

**पश्चिम खानदेश**— श्री. गणेश शंकर देव.

**सोलापूर साहित्य समिति (शाखा सभा)**— श्री. बाबूराव नरसप्पा जक्कल, श्री. शंकर नीळकंठ जामदार, श्री. दत्तात्रेय बळवंत मुद्गल, श्री. लक्ष्मण दत्तात्रेय सुर्वे.

**ठाणें जिल्हा व जव्हार संस्थान**— श्री. दत्तात्रेय दामोदर काळे.

**कुलाबा जिल्हा व जंजिरा संस्थान**— श्री. हरि गोविंद गोखले.

[मलपृष्ठ तीनवर पाहा.

## वर्गणीविषयक माहिती

म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी — रु. ४॥ (ट.ख.सह).

परिषदेचे सभासद व संलग्नसंस्था — वा. व. रु. ३ (म. सा. पत्रिका विना-मूल्य पाठविली जाते )

पत्रव्यवहाराचा पत्ता— महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १५ वें ] **अनुक्रमणिका** [ अंक ४ था

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## गोदाकांठचा अुषःकाल



घुमत नगारा मंदिरांत ललकारि अुषःकाला,
  आणि अुमाळ्यावरती अुसळे ती अमर ज्वाला !

कनक-रसापरि पसरुं लागलें क्षितिजावर तेज,
  आरुण कुसुमांनी मोहरले मेघांचे कुंज !

अंबरगत हे कळस हिरण्मय झळाळती भोंतीं,
  नील-समुद्रामध्यें पेटल्या जणु दीप-ज्योती !

सुवर्णगरुडापरी बैसला प्रकाश सोनेरी
  शिवालयाच्या जुनाट दगडी घुमुटाच्या शिखरीं !

प्रचंड घण्टा कधीं घोषते– घनगभीर नाद,
  अणुरेणु स्वरकंपित होअुन पुकारती साद !

प्रक्षाळत पायऱ्या तटाच्या सामगीत गात,
  जीवनमय हीं अमुची माता सन्थपणें जात !

नितळ निळ्या पाण्यावर हलती या कांचनलहरी,
  सोनसळीचें महावस्त्र वा तुकलें वाऱ्यावरी !

कुठे घुसळतें, कुठे उसळतें, तुषारतें पाणी
  कुठे समाधिस घालुन विळखा गुणगुणतें गाणीं

अमित काळच्या स्मृती तरंगत या लाटांवरती
  स्वप्नाशांचीं अिंद्रधनुष्यें त्यावर फेसळती !

—कुसुमाग्रज

अनुक्रमणिका






# साहित्यिकाचें खरें कार्य

(२६ व्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे नियोजित अध्यक्ष आचार्य प्र. के. अत्रे यांचा संदेश)



मराठी वाङ्मयाचा आरंभ ज्ञानेश्वरांनी केला असें मानलें तर 'बंडखोर' विचार प्रकट करण्यासाठीच मराठी वाङ्मयाचा जन्म झाला असें ठरतें. समाजाच्या जीवनांत आमूलाग्र क्रांति घडवून त्याच्या पुरःसर गतीला धक्का द्यावयाचा, हें कार्य मराठी वाङ्मयाने आपल्या जन्मकालीं केलेलें आहे. क्रांतीचें हें निशाण संतांच्या अभंग-वाणीने महाराष्ट्रांत तीनचारशें वर्षें फडकत ठेवलें. महाराष्ट्राच्या राजकीय स्वातंत्र्याला अुतरती कळा लागतांच मराठी वाङ्मयांतील हें अुद्दाम सामर्थ्य दुर्बल झालें. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी मराठी वाङ्मयांतील ह्या सुप्त बंडखोरीचा जीर्णोद्धार करून 'मराठी भाषेचे शिवाजी' ही सार्थ पदवी मिळविली. समाजांतील ही क्रांतिकारक प्रवृत्ति सतत जिवंत ठेवणें हेंच प्रत्येक मराठी साहित्यिकाचें कर्तव्य आहे. घरबसल्या ग्रंथनिर्मिति करून ग्रंथालयाच्या कपाटांचा भार वाढविणें हेंच केवळ साहित्यिकाचें काम नाही. समाजाच्या आकांक्षांशीं आणि चळवळींशीं समरस होअून समाजाच्या आंतरिक भावना बोलक्यां करणें, हेंच साहित्यिकाचें खरें कार्य आहे. मात्र राष्ट्राच्या जीवनांतील भाषेच्या आणि साहित्याच्या ह्या गतिमान सामर्थ्यावर साहित्यिकाचा मनापासून विश्वास पाहिजे. आज देशाच्या स्वातंत्र्यासाठी जनतेची जी प्रचंड सिद्धता चाललेली आहे, तींत मराठी साहित्यिक कोणता भाग घेत आहेत? समाजाच्या राष्ट्रीय आकांक्षा प्रज्वलित करण्यासाठी मराठी साहित्यिक आज काय प्रयत्न करीत आहेत! क्रांतिकारक मराठी वाङ्मयाची जर कोणत्या काळीं अधिक आवश्यकता असेल तर ती आजच्या! देशाच्या स्वातंत्र्याबद्दलच्या आकांक्षांची आणि प्रयत्नांची अुपेक्षा करणारे, त्याविषयी औदासीन्य बाळगणारे किंवा त्याला विरोध करणारे साहित्यिक हे मराठी वाङ्मयाचे शत्रु होत!

१८।९।४२ **प्रल्हाद केशव अत्रे**

# ध्वनीला अर्थ कसा प्राप्त झाला

## (विशेषतः मराठी ध्वनींना अनुलक्षून)



( लेखक— प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी )

१. आपण नेहेमी भाषा बोलतों, शब्द वापरतों, शब्दांचा अन्वय करतों, अन्वित शब्दांचा प्रयोग करतों, अन्वित शब्दांच्या प्रयोगांतून निघणाऱ्या अर्थाप्रमाणे व्यवहाराला प्रवृत्त होतों. व्यवहाराला प्रवृत्ति अर्थाने होते; अर्थाला प्रवृत्ति शब्दांनी होते; शब्दाला प्रवृत्ति वर्णांच्या अुच्चाराने होते अशी ही सांखळी आहे. परंतु रोजच्या व्यवहारांत अितकी सहजता असते की ह्या साखळींतील दुव्यांची कल्पना कोणाला फारशी येत नाही. कल्पना आली तर त्याकडे कोणाचें विशेष लक्ष जात नाही. बोलावें किंवा अैकावें व त्याप्रमाणे लागलीच व्यवहार करावा किंवा त्याप्रमाणे अजाणतांच, सहजगत्या आपल्या हातून व्यवहार व्हावा अशी नेहमीची स्थिति आहे. व्यवहार व भाषा ह्यांचें साहचर्य किंवा नैकट्य हें अितकें आहे. डोळ्याच्या पापणीच्या अुघडझापीसारख्या जातिक वृत्तीच्या क्रिया जशा आपल्या हातून सहज, अजाणतां घडून येतात तशीच जवळ जवळ भाषेच्यामुळे अुद्भवणाऱ्या व्यवहाराची अवस्था आहे. व्यवहाराच्या ह्या स्वरूपामुळेच भाषा किंवा तिचा अर्थ किंवा अर्थाचे शब्द किंवा शब्दाचे वर्ण ह्यांच्या पृथक्करणाकडे कोणाचें लक्ष न गेल्यास त्यांत नवल नाही. रोजच्या सरावाने होणारें हें दुर्लक्ष बाजूस सारून पृथक्करण करावयाचेंच म्हटलें तर मनुष्यास व्यवहाराला प्रवृत्त करण्याचें मूळ अर्थपूर्ण शब्दाच्या वर्णोच्चारांत आहे असें मानावें लागतें. वर्णांमध्ये तरी व्यवहाराला प्रवृत्त करण्याचें सामर्थ्य कसें आलें ?

२. समजा; आपण अेक अशी कल्पना करूं. मानव आहे, मानवांचा समाज आहे. पण त्या मानवसमाजाजवळ 'भाषा' नाही. केव्हा तरी आद्य आद्य काळांत अशी निर्भाषक अवस्था असलीच पाहिजे. भाषा नाही, शब्द नाहीत, शब्दांना अर्थ नाही. आहे काय ती फक्त अुच्चार करण्याची, कांही तरी आवाज अुत्पन्न करण्याची शक्ति. व ही शक्ति अितर प्राण्यांजवळ असल्यामुळे मानवप्राणी व अितर प्राणी ह्यांत फरक कांहीच नाही. दोन्ही अेकाच रानटी अवस्थेंत आहेत; परंतु ह्या रानटी अवस्थेंत देखील जे कांही आवाजाचे अुच्चार मानवप्राणी किंवा अितर प्राणी काढीत त्या अुच्चारांप्रमाणे त्यांचे परस्परव्यवहार होत असलेच पाहिजेत हें अुघड आहे. निर्भाषक अवस्थेंत देखील अर्थशून्य अुच्चारांमुळे व्यवहार होतच असे. भुकेने किंवा भीतीने व्याकुळ झाले म्हणजे, रागाने किंवा प्रेमासारख्या कोणत्याहि विकाराने बेहोष झाले म्हणजे, दुःखाने किंवा निराशेने गांगरून गेले म्हणजे कांही तरी ध्वनि प्राण्याच्या मुखांतून निघाला असला पाहिजे व त्याप्रमाणे त्याचा व त्याच्याभोंवतीं असलेल्या कळपांतील अितर प्राण्यांचा व्यवहार झालाच असला पाहिजे. भाषा नसली म्हणून काय झालें ? निर्भाषक स्थितींत मुद्रा विकारांना अनुरूप असा कांही तरी ध्वनि अुत्पन्न झाला असला पाहिजे व त्याला अनुरूप कांही तरी क्रिया-प्रतिक्रिया घडून आलीच असली पाहिजे. कळपांतील नायकाने भीतीची आरोळी

ठोकलेली कळपांतील अितर व्यक्ति अैकतात, तो पळालेला पाहतात व त्याप्रमाणे त्या व्यक्तीहि ओरडतात व पळतात. ह्या सर्व क्रियेचें मूळ कारण जी आरोळी तिला लगेच भीतीचा अर्थ अुत्पन्न होतो. संकट आलें कीं आरोळी ठोकणें ही अगदी सहजात क्रिया आहे. भीतीच्या विकाराबाबत जी गोष्ट तीच अितर विकारांची व अितर विकारांची जी गोष्ट तीच प्राण्याच्या अितर गरजांची. अशा रीतीने आरोळीला भीतीचा अर्थ प्राप्त होतो व तो अर्थ कळपांतील सर्व व्यक्तींना मान्य होतो. त्याप्रमाणे त्यांचें वर्तन होतें. कोणत्या तरी विकारप्राबल्यामुळे कांही तरी ध्वनि प्राण्याच्या मुखांतून अुद्भूत होतो व त्या ध्वनीला त्या विकाराचा दर्शक असा अर्थ प्राप्त होतो. अशा रीतीने त्या ध्वनीला शब्दत्व प्राप्त होतें. व तो शब्द त्या प्राण्यांच्या कळपांत किंवा मानवांच्या समाजांत रूढ होअून बसतो. अशा निरनिराळ्या शब्दांची त्या समाजापुरती भाषा तयार होते. विकारदर्शक ध्वनिशब्दांची जी गोष्ट वर सांगितली तीच गोष्ट विचारदर्शक शब्दांची. दोन्ही क्रिया सारख्याच आहेत. फरक अितकाच की विकार किंवा भावना ह्या अन्तःकरणाचा विषय होत व विचार हे बुद्धीचा विषय होत.

३. अमुक अेक विकार किंवा विचार अुद्भूत झाला कीं त्याची प्रतिक्रिया अगदी सहजात रीतीने ध्वनींच्या द्वारा बाहेर पडते. हे ध्वनि त्या त्या विकाराचे किंवा विचाराचे प्रतीक असतात – चिन्ह असतात. हेच विकारदर्शक व विचारदर्शक ध्वनि 'शब्द' म्हणून रूढ होअून बसतात. त्यांना शब्दत्व प्राप्त होतें व त्यामुळे भाषा सिद्ध होते. भाषेच्या मुळाशीं हे शब्द; शब्दाच्या मुळाशीं ते ध्वनि; आणि ध्वनींच्या मुळाशीं ते विकार व विचार; अशी ही सांखळी आहे. शब्द हे ध्वनींचें किंवा ध्वनींच्या मागच्या विकार-विचारांचें प्रतीक आहे. हीच ध्वनिप्रतीकता भाषेच्या मुळाशीं असते. हिच्यावरच भाषेची अुभारणी होत असते. निरनिराळ्या ध्वनींची अुलटसुलट हरतऱ्हेने जुळणी झाल्याने निरनिराळे शब्द तयार होतात. ह्या तयार झालेल्या निरनिराळ्या शब्दांत अर्थातच त्यांच्या ध्वनिघटकांच्या अर्थाचें प्रतिबिंब अुठल्यास नवल नाही; किंबहुना तसें तें प्रतिबिंब अुठणारच. भाषेचा कच्चा माल शब्द, शब्दाचा कच्चा माल ध्वनि, ध्वनीचा कच्चा माल विकार-विचार, ह्या परंपरेने परिपक्व, सिद्ध, साफसूफ अशा स्वरूपाची भाषा तयार होते.

४. ही वर अुल्लेखिलेली प्रक्रिया ध्वनिशब्द, अनुकरणात्मक शब्द, प्रतिध्वनिशब्द ह्यांच्या बाबत फारच अुत्तान रीतीने दृष्टोत्पत्तीस येते. शब्दाचा अुच्चार हा अर्थाचा प्रतिध्वनि असतो असें जें म्हणतात तें ह्यामुळेच. सरसर, धपधप, धुगधुग, फटफट, फटफटी, मकमक, फाटकन्, ताडकन्, काटकन्, सूं सूं, भिर्र्कन्, मेघांचा गडगडाट, पाण्याचा खळखळाट, पावसाची झिमझिम, रिपरिप, गूंगूं करणें, गुंग, गोंगावणें, घोरणें, ढोरणें, टर्रा फाटणें, गुरगुरणें, कुजबुजणें, चुकचुकणें, कुचकुचणें, हंमा, हंबरणें, भो भो करणें, भोकणें, म्यँव म्यँव करणें, किर्र् झाडी किंवा अंधार, सिंहाचें डरकणें, बैलाचें डुरकणें, अित्यादि कितीतरी ध्वनिशब्द मराठी भाषेंत आहेत. त्यांच्या अुच्चारावरूनच केवळ त्यांच्या अर्थाची कल्पना ताटकन् येते. ह्यावरूनच कांही कांही प्राण्यांना त्यांच्या आवाजावरून नांवें पडलेलीं आहेत. चिमणी हें नांव चिवँ चिवँ आवाजावरून; काक, काग, काव, कावळा हीं नांवें त्या प्राण्याच्या आवाजावरून; टिट्टिभी, टिटवी हीं नांवें त्याच्या टँव टँव आवाजावरून; मयूर, मोर किंवा मार्जार हीं नांवें त्यांच्या मँव मँव अशा आवाजावरून पडलीं आहेत. 'गाय' हा शब्द माहिती होण्याच्या पूर्वीच्या अवस्थेंत लहान मुलें गायीला 'हम्मा' म्हणतात किंवा कुत्र्याला 'भोभो' म्हणतात ते ह्या प्रवृत्तीनेच. ध्वनीला अशा रीतीने अर्थ प्राप्त होतो. अेखाद्या लोकसमाजालाहि नांवें प्राप्त होतात तीं त्याच्या भाषेंत बऱ्याच

अनुक्रमणिका

वेळां येणाऱ्या ध्वनींवरून प्राप्त होतात. कानड्याना 'गंडुगुंडु', गुजरात्यांना 'सांमळो', अिंग्रजांना 'यस् फयस्', मराठ्यांना 'कसाला बसाला' असे विडंबनात्मक कां होईना परंतु वाक्प्रचार रूढ आहेत.

५. हीं जीं वर अुदाहरणें दिलीं तीं अुत्तान ध्वनिप्रतीकतेचीं अुदाहरणें आहेत. वरील शब्दांचा ध्वनि त्या त्या शब्दाचा अर्थ अुत्तानरीत्या दाखवितो. अर्थाविषयी अडचण केव्हाच अुत्पन्न होत नाही. अशा रीतीने अुत्तान अर्थवाही शब्द अेकदा रूढ झाले म्हणजे त्यांच्यामध्ये झालेली अर्थप्रक्रिया अितर क्षेत्रांत लक्षणेने सुरू होअून अितर शब्द तयार होतात. केवळ लक्षणेने ही क्रिया होत असल्यामुळे त्यांच्यामधील ध्वनिप्रतीकता अितक्या अुत्तान रीतीने दृष्टोत्पत्तीस येत नाही. ती प्रच्छन्न होते. ध्वनीच्या अुचनीचत्वामुळे, ऱ्हस्वत्वदीर्घत्वामुळे, आरोहावरोहामुळे, मार्दवकार्कश्यामुळे त्या त्या ध्वनींना किंवा ध्वनिसमूहांना निरनिराळे अर्थ प्राप्त होतात. किंवा अगदी शास्त्रशुद्ध बोलावयाचें म्हणजे निरनिराळ्या अर्थाप्रमाणें तद्दर्शक ध्वनींच्या प्रकारांत फरक पडतो. अुदाहरणार्थ कांही ध्वनि व ध्वनिसमूह घेअूं. कंठ्य व ओष्ठ्य वर्ण ह्या ध्वनींना प्रेम, माया, वात्सल्य, आदर, पूज्यत्व वगैरे कोमल भावनादर्शक असे अर्थ प्राप्त झाले आहेत. लहान मुलें मापाशिक्षणाच्या आद्य अवस्थेंत कंठ्य व ओष्ठ्य वर्णच प्रथम अुचारूं शकतात. पितृ, पिता, बाप, बाबा, बापू, बाबू, आबा, आबू, आपा, मातृ, माता, माअी, माय, आअी, बाअी, मा, मामा, मम्म, अित्यादि शब्दांत ओष्ठ्य किंवा कंठ्य ध्वनींचें प्राधान्य आढळतें तें वर अुल्लेखिलेल्या भावना त्यांच्यांत निविष्ट असल्यामुळेच आहे. श्, ष्, स् ह्या अूष्मध्वनींत भय, त्वरा, नापसंती, तिरस्कार, तिट्कारा वगैरे भावना प्रकट करण्याचें सामर्थ्य आहे. म्, न्, र्, ल् ह्या ध्वनींत कुरकुर, तक्रार, गुरगुर वगैरे भावना प्रकट करण्याचें सामर्थ्य आहे. दन्त्य व मूर्धन्य ध्वनींत आघात, तोटा, सोटा, तडाखा, सपाटा, ठोका, ताडन, दण्ड वगैरे शब्दांनी प्रतीत होणाऱ्या कांही कर्कश भावना प्रकट करण्याचें सामर्थ्य आहे. कोमल, मृदु, मंद भावना ऱ्हस्व व मृदु ध्वनींनी तर कर्कश, जड, संथ भावना दीर्घ व कठोर ध्वनींनी प्रकट केल्या जातात. हा तर आपला नेहमीचा अनुभव आहे. ह्याला धरूनच काव्यशास्त्रकारांनी शब्दयोजनेसंबंधी तसे शास्त्रांत निर्बंध घातले आहेत. ध्वनीच्या अुचनीचतेचा किंवा आरोहावरोहाचा संबंध मानवी मनाच्या अवस्थांशीं कसा असतो हें आणखी पुढील अुदाहरणांवरून स्पष्ट होईल. आपण आपलें असमाधान कुरकुर, गुरगुर, धुसफुस अित्यादि शब्दांनी व्यक्त करतों; आपला राग फणकारा, झटका, फणका, तिटकारा अित्यादि शब्दानी व्यक्त करतों; आपलें प्रेम गुलुगुलु, गोड् गोड्, बुल्बुल् अित्यादि शब्दांनी व्यक्त करतों; आपली निन्दा दुदुत्, थूः, छिथू अित्यादि शब्दांनी व्यक्त करतों; आपलें दुःख किंवा निराशा अरे अरे, हाय हाय, हर हर, शिव शिव अित्यादि शब्दांनी व्यक्त करतों; आपलें कुतूहल किंवा आश्चर्य ओ हो, अहाहा, अबब, अरे बाप रे, रामा शिवा गोविंदा अित्यादि शब्दांनी व्यक्त करतों. निरनिराळ्या भावनादर्शक हे जे वर ध्वनिसमूह दिले आहेत त्यांत ध्वनीच्या अुचनीचतेचा किंवा आरोहावरोहाचा संबंध आलाच आहे. ऱ्हस्व ध्वनि त्वरा दाखवितो तर दीर्घ ध्वनि मंदाई, संथपणा दाखवितो. ध्वनींच्या अुचनीचतेचा संबंध जसा मानवी मनाच्या अवस्थांशीं असतो तसा तो बाह्य निसर्गांतील अवस्थांशींहि असतो. अुच्च स्वर आणि प्रकाश ह्यांचा संबंध आहे तर नीच स्वर आणि अंधकार ह्यांचा परस्परसंबंध आहे. चमक, झळक, लखकन्, मरकन्, लखलखाट वगैरे शब्दांनी वीज व विजेच्या प्रकाशाच्या क्रियेची कल्पना येते. तर अफाट, पसारा, फापट, ढिगारा, घुंधा, फांद्या वगैरे शब्दांनी वृक्ष व वृक्षसंबंधी परिसराची कल्पना येते. मंदमंद, झुळझुळ, शान्त, रम्य, शीत, सौम्य वगैरे शब्दांनी

नदीप्रवाह, पाणी ह्याच्या चलनवलनक्रियांची कल्पना येते तर सोसाटा, झंझावात, झोत, गोंगाट, झांबड वगैरे शब्दांनी तुफानी वाऱ्याच्या क्रियांची कल्पना येते. निसर्गातील त्या त्या क्रियेच्या संबंधी मानवी मनांत अुत्पन्न होणारी प्रतिक्रिया अशा रीतीने तद्दर्शक ध्वनींच्या अुचनीचतेंत किंवा ऱ्हस्वत्वदीर्घत्वांत किंवा कार्कश्य-मार्दवांत दाखविली जाते हें वरील अुदाहरणांवरून स्पष्ट आहे.

६. अिंग्रजी भाषेंत निन्दा, तिटकारा, नावड, वीट वगैरे विकार u ह्या स्वराने दाखविला जातो. Dull, bungle, blunder, muddle, clumsy, mud, slush, jugjin, mug, numb, skull, dumb, humbug, humdrum, dumber, अि०. तसेंच त्या व अितरहि कांही भाषांत 'S' आणि 'T' त्या दोन ध्वनींत स्थायित्व, चिरंतनत्व, सामर्थ्य, रचना वगैरे-संबंधी विचार प्रकट करण्याचें सामर्थ्य आहे. 'B' आणि 'L' ह्या दोन ध्वनींत वाजविणें, अुडविणें, सुरुंगाने नाहीसें करणें ह्यांची कल्पना आहे. 'G' आणि 'R' ह्या संयुक्त ध्वनींत कुरकुरणें, धुसफुसणें, तक्रार, गाऱ्हाणें वगैरेंची कल्पना आहे. 'K' ह्या ध्वनींत फुटणें, तुटणें कुटणें, मोडणें ह्या क्रियांची कल्पना आहे. 'P' ह्या ध्वनींत मारणें, दाबणें, लावणें ह्यांची कल्पना आहे. अशा रीतीने प्रत्येक भाषेंत कांही कांही ध्वनींमध्ये कांही विशिष्ट कल्पना किंवा विकार प्रकट करण्याचें सामर्थ्य असल्याचें आढळून येतें. मावरी भाषेंतील ध्वनींची अशीच मजा आहे. त्या भाषेंतहि कांही मूलभूत ध्वनि आहेत, व ते कांही विशिष्ट अर्थांचे वाहक आहेत. मावरी लोकांच्या भाषेंत 'क' म्हणजे अुष्णता, 'कु' म्हणजे वाकडें वळण किंवा बाक, 'त' म्हणजे चिकटणें आणि 'व' म्हणजे नेणें, वाहणें. आता ह्या मूलभूत ध्वनींच्या जुळणीने कसे निरनिराळे अर्थवाहक शब्द तयार होतात तें पाहा. 'क' म्हणजे अुष्णता; 'काय' म्हणजे जळणें, जाळणें; 'काल' म्हणजे करपून काळें झालेलें; 'काळा' म्हणजे काळी बाई; 'कारम' म्हणजे सूर्याची अुष्णता; 'कायम्' म्हणजे प्रेम किंवा मदन; 'कायम्' म्हणजे जखम; तसेंच 'कु' म्हणजे बाक, वाकडें; कुडेज म्हणजे छत्री; 'कुडई' म्हणजे टोपली; 'कुडु' म्हणजे गोळी; 'कुडम्' म्हणजे मांडें; 'कुळम्' म्हणजे तलाव. ह्याहिपेक्षा मजेदार चिनी भाषेचें स्वरूप आहे. चिनी भाषाच मूळ अेकावयवी (monosyllabic) स्वरूपाची आहे. भाषेंतील सर्व शब्द अेकावयवी. ह्या निरनिराळ्या अवयवांना निरनिराळे अर्थ आहेत. व्यवहारोपयोगी असें अर्थवाहक वाक्य तयार करावयाचें झाल्यास हे निरनिराळे अर्थवाहक अवयव गोळा करावयाचे व ते अेकापुढे अेक ठेवावयाचे. असें केलें कीं वाक्य तयार होतें. अेकच शब्द कधी नाम होईल तर कधी विशेषण होईल. कधी क्रियापद होईल तर कधी अव्यय होईल. वाक्यांतील स्थानावरून अमुक अेक अर्थवाही अवयव नाम आहे का क्रियापद आहे, का विशेषण आहे हें ठरवायचें असतें. 'हो' म्हणजे नदी; 'का' म्हणजे वस्तीस्थान, घर; 'होका' म्हणजे नदीवरचें घर किंवा नांव. 'पेकीनहून' असें म्हणावयाचें झाल्यास 'सुंग-पेकिन-लै' असें म्हणतात. ह्याचा शब्दशः अर्थ (सुंग =) अनुसरणें, पेकिन-येणें (<लै). 'तरवारीने' असें म्हणावयाचें झाल्यास 'युग-यी-पा-टौ' असें म्हणतात. ह्याचा शब्दशः अर्थ Use one sword = By means of a sword असा आहे.

भाषेचें अेक प्रकारचें हें अेक सामासिक स्वरूप आहे. ध्वनींना व्यस्त अशा अवस्थेंत कांही अर्थ असतात. तेच व्यस्त ध्वनि समस्त अवस्थेंत आले कीं त्यांना अर्थहि समस्त स्वरूपाचा असा प्राप्त होणार हें अुघड आहे. संस्कृतमधील शब्दांच्या सामासिक रचनेच्या मुळाशीं हीच प्रवृत्ति आहे.

७. संस्कृतमधील शब्द तपासले म्हणजे कोणत्या वर्णांना कोणता विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे हें तेव्हाच स्पष्ट होईल. ह्यासाठी आपण एकाक्षरी धातु व शब्द घेऊं. 'अ' ह्या स्वराला अभाव, नकार, आधिक्य असा अर्थ आहे; 'आ' ह्या स्वराला ईषत्, पर्यंत, आ-समंतात्, आधिक्य इत्यादि अर्थ आहेत; 'इ'मध्ये कोमलता, गमन, मार्दव, स्त्रीत्व इत्यादि अर्थ आहे; 'उ'मध्ये ओरडणें, हाक मारणें, शब्द करणें, जाहीर करणें असे अर्थ आहेत तर 'ऋ'मध्ये जाणें, हलणें, पेरणें वगैरे अर्थ आहेत. अशा रीतीने सर्व स्वरध्वनींना निरनिराळे कोणते अर्थ व्यक्त करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें आहे हें त्या त्या स्वरध्वनींचे शब्द तपासून दाखवितां येण्यासारखें आहे. जी स्वरध्वनींची गोष्ट तीच व्यंजनध्वनींची. संस्कृत व्यंजनध्वनींचे देखील विशिष्ट आणि विविध असे अर्थ आहेत. 'क्' ह्या ध्वनीचे शब्द करणें, जाणें, करणें, हे अर्थ आहेत तर 'ख' ह्या ध्वनीला खाणें, खणणें, खोदणें, खटणें, खेळणें हे अर्थ आहेत. 'ग' ह्या ध्वनीला गाणें, शब्द करणें, घेणें, बांधणें, रचणें, गिळणें, जाणें, पाळणें, लपविणें इत्यादि अर्थ असलेले आढळतात तर 'घ्' ह्या ध्वनीला घासणें, चोळणें, घट्ट करणें, शब्द करणें इत्यादि अर्थ असलेले आढळतात. 'ङ्' ह्या ध्वनीला गुङ्गणें, गुङ्गुङ् करणें, गोंगावणें असा अर्थ आहे तर 'च्' ह्या ध्वनीला चयन, संचय, चौर्य, चर्वण, चाबा, चाटणें, हलणें, असे अर्थ आहेत. 'छ्' ध्वनीला लपविणें, आच्छादणें, छाटणें असे अर्थ आहेत तर 'ज्' ह्या ध्वनीला जन्मणें, जल्पणें, जांभई देणें, जिंकणें, क्षयणें असे अर्थ आहेत. 'झ्' चे अर्थ शब्द, पतन, गोंधळ हे आहेत. 'ट्'मध्ये आदळआपट, मटक, फाडणें, तोडणें हे अर्थ आहेत तर 'ठ'चे मार, ठोक, गमन हे अर्थ आहेत. खरें पाहिलें तर मूर्धन्य ध्वनि हे दन्त्य ध्वनींचीं कठोर, कर्कश स्वरूपें होत. 'ड्'मध्ये उडण्याचा अर्थ निविष्ट आहे. तोच 'द्' ध्वनीमध्येहि आहे. 'त्'मध्ये चिरणें, समर्थ असणें, तरून जाणें हे अर्थ आहेत. 'द्'मध्ये देणें, दाबणें, उडणें, जळणें हे अर्थ तर 'ध्'मध्ये ठेवणें, विचार करणें हे अर्थ आहेत तर 'न्'मध्ये नेणें, वाहणें, स्तवणें, हलणें हे अर्थ आहेत. 'प्'मध्ये पिणें, पाळणें, लठ्ठ होणें, स्वच्छ करणें हे अर्थ तर 'भ्' मध्ये प्रकाशणें, भिणें, असणें, होणें, मरणें हे अर्थ आहेत. 'म्'मध्ये मोजणें, ओरडणें, देणें घेणें, ठरविणें, नाश होणें, मरणें हें अर्थ आहेत. 'य्'मध्ये जोडणें, जाणें ह्या क्रिया निविष्ट आहेत तर 'र्'मध्ये देणें, ओरडणें, मो॰णें ह्या क्रिया निविष्ट आहेत. 'ल्' मध्ये धरणें, चिकटणें, तोडणें ह्या क्रिया व्यक्त करण्याचें सामर्थ्य आहे तर 'व्'मध्ये वाहणें, विणणें, मागणें, उपभोगणें, वेधणें, आच्छादणें ह्या क्रिया व्यक्त करण्याचें सामर्थ्य आहे. 'श्' मध्ये स्तवणें, समर्थणें, मारणें, तीक्ष्ण होणें, पडणें, गोळा होणें, सैल होणें इत्यादि अर्थ दाखविण्याचें सामर्थ्य आहे तर 'स्'मध्ये बांधणें, दाबणें, रस काढणें, उत्पन्न करणें, सरणें इत्यादि अर्थ दाखविण्याचें सामर्थ्य आहे. 'ह्' ध्वनि त्याग, गमन, प्रेषण, हवन, हरण इत्यादि अर्थ सुचवितो तर 'क्ष्' हा ध्वनि राहणें, वस्ती करणें, झरणें, गळणें, नाश होणें इत्यादि अर्थ सुचवितो. 'ज्ञ्'मध्ये सर्व मानसिक क्रिया व्यक्त करण्याचें सामर्थ्य निविष्ट झालें आहे. संस्कृत भाषेंतील उच्चारध्वनींना कोणकोणते अर्थ प्राधान्याने प्राप्त झाले आहेत ह्याची वर्णवार मांडणी त्या त्या वर्णाच्या शब्दांची— विशेषतः धातूंची— तपासणी करून येथवर केली आहे.

८. ह्या वर्णवार मांडणीस संस्कृत शब्दांचा व धातूंचा आधार आहे. निरनिराळ्या पृथक् वर्णांचे अर्थ वर सांगितले. हेच वर्ण किंवा ध्वनि एकमेकांस जोडले म्हणजे संयुक्त वर्ण तयार होतील व त्या त्या संयुक्त वर्णांचा अर्थहि संयुक्त होईल. संयुक्त वर्णांचे जे दोन किंव

अधिक घटकावय वर्ण असतील त्यांचा प्रत्येकाचा पृथक् जो अर्थ असेल त्या सर्व अर्थांचा मिळून संयुक्त असा अर्थ त्या संयुक्त वर्णाचा होअील हें अुघड आहे. कांहीं अुदाहरणांवरून हें स्पष्ट होअील. 'अ', 'आ' ह्यांचा अेक अर्थ आधिक्य असा आहे. ह्याच्यापुढे भिन्न अर्थाचा वर्ण आला म्हणजे त्या संयुक्त ध्वनीचा अर्थ कसा बदलतो पाहा. ह्याचा तक्ता खाली थोडासा मांडून दाखवितों. अ, आ ह्यांखेरीज अितरहि वर्ण अर्थासह खाली मांडतों.

| पहिला वर्ण | पहिला अर्थ | दुसरा वर्ण | दुसरा अर्थ | संयुक्त वर्ण | संयुक्त अर्थ |
|---|---|---|---|---|---|
| अ | (आधिक्य) | + ज् | (जिंकणें) | = अज् | = (आत्मसात् करून) हाकणें. |
| अ | ,, | + ट् | (जाणें) | = अट् | = भटकणें. |
| अ | ,, | + त् | ( ,, ) | = अत् | = भटकणें. |
| अ | ,, | + द् | (दात्रणें, चावणें) | = अद् | = खाणें. |
| अ | ,, | + न् | (जीवमान असणें) | = अन् | = श्वासोच्छ्वास करणें. |
| अ | ,, | + म् | (मारणें) | = अम् | = हिंसा करणें. |
| अ | ,, | + श् | (गोळा करणें) | = अश् | = मिळविणें. |
| अ | ,, | + श् | (दात्रणें, चुरडणें) | = अश् | = खाणें. |
| अ | ,, | + स् | (सत्ता, वास्तव्य) | = अस् | = होणें, असणें. |
| अ | ,, | + स् | (सरणें) | = अस् | = फेंकणें, जोरांत गति देणें. |
| अ | ,, | + व् | (अुपभोगणें) | = अव् | = पाळणें. |
| आ | (= आधिक्य) | + प् | (पाळणें) | = आप् | = मिळविणें, आत्मसात करणें. |
| अि | (जाणें) | + ल् | (धरणें) | = अिल् | = शांत, स्थिर असणें. |
| आ | (आधिक्य) | + अन् | (श्वासोच्छ्वास करणें) | | |
| | | + अन | (प्रत्यय) | = आनन | = श्वासोच्छ्वासाचें करण–अिंद्रिय. |
| पु | (स्वच्छ करणें) | + न्, ण् | (स्तुति करणें) | = पुण्य | = पवित्र, स्तुत्य कृत्य. |
| पू | (पालन करणें) | + त् | (समर्थ असणें) | = पितृ | = पालन करण्यास समर्थ. |
| म् | (मोजणें, गणणें, काळजी वाहणें) | + त् | ( ,, ) | = मातृ | = काळजी वाहण्यास समर्थ. |

नमुन्यासाठी म्हणून हीं अुदाहरणें वरील तक्त्यांत मांडून दाखविलीं आहेत. निरनिराळ्या स्वतंत्र अर्थांच्या ध्वनींचा संयोग होअून ज्या वेळीं सयुक्त ध्वनींचा 'शब्द' तयार होतो त्या वेळीं ध्वनींच्या संयोगाबरोबर त्या ध्वनींच्या अर्थांचाहि संयोग होअून संयुक्त असा अर्थ त्या शब्दाला प्राप्त होतो. जे शब्द आपाततः सिद्ध झालेले असतात त्यांच्याबाबत हें विवेचन लागू होणार नाही.

९. ह्याच तत्त्वाला अनुसरून पाणिनीने भाषेंतील शब्दांचें पृथकरण करून शब्दांचें बीज धातु हा आहे असें ठरविलें. ह्या धातूचें बीजपृथक्करण करून आपृक्त धातु म्हणून ठरविले व त्या त्या आपृक्त धातूचे अथवा बीजाचे अर्थहि त्याने दिले. अमुक अेक बीज घेतलें कीं त्याचा अमुक अेक अर्थ असावयाचा असें त्याने ठरविलें. भाषेचा सर्व पसारा ह्या बीजापासून

किंवा ध्वनीपासून झाला. पाणिनीने जीं मूलभूत बीजें मानिलीं तीं हीं होत. व्, र्, म्, न्, भ्, ध्, ज्, ग्, द्, क्, प्, स् अशीं हीं बारा आपृक्त बीजें होत. ह्याशिवाय भ्र, क्ष्, स्त्, स्त्र् हीं संयुक्त बीजेंहि पाणिनीने दिलीं आहेत. आता त्यांचे अर्थ कसे ठरतात तें पाहा.

'म्' ह्याचा अर्थ चंद्र, मनुष्य असा आहे. त्यापासून पुढील शब्द बनतात. मयह्, मावह्, मह्, मस्, मास्, मन्, मनुस्, मानव, म्ना, मानणें, माहा, मो, mind, man, gayma. 'भ्' म्हणजे प्रकाश असा अर्थ आहे. त्यापासून बनलेले पुढील शब्द पाहा. भय्य, भायस, भा, भास, भास्वत्, भास्कर, प्रभा, पाहिजे, पहाट. 'घ्' म्हणजे गृह व त्यापासून झालेले शब्द धयम्, धय, घ्याअिमन्, द्रम्, जम्, दंपति, जम्पती, जायापती. 'द्' म्हणजे देव, प्रकाश व त्यापासून सिद्ध झालेले शब्द दग्ग, दय, द्यू, दिव्, देव्, देवी, Daeve (अवे.), Deus (लॅ.), Thes (ग्री.), द्योत, ज्योत अित्यादि होत. अितर आपृक्त बीजांचा अर्थ व त्यापासून निघालेले सर्व भाषांतील शब्द देतां येतील. हीं आपृक्त बीजें म्हणजे मूलभूत आद्य ध्वनिच होत. ह्यावरून अितकें निष्पन्न होतें की भाषेत कांही मूलभूत ध्वनि असतात व त्यांना ध्वनिप्रतीकतेमुळे (sound symbolism) कांही अर्थ प्राप्त झालेले असतात. त्यांच्या अुलटसुलट जुळणीने, क्रमव्युत्क्रमाने, संयोजनानें संयुक्त अर्थवाही असे निरनिराळे शब्द तयार होतात.

१०. पाश्चात्य भाषाशास्त्रज्ञांनी असे Eur-Aryan धातु शोधले आहेत. वेदपूर्व-कालीन आर्यसमाजाच्या भाषेतील धातु हेच होत. ह्याच्याहि पेक्षा मागे जाअून डॉ. मेरे ह्याने सर्व भाषांची अुत्पत्ति आठ नअू धातूंवरून प्रतिपादिली आहे. Ag, Bag, Cag, Dag, Lag, Mag, Vag, Rag, Khag हे नअू धातु डॉ. मेरे ह्याच्या मतें भाषेच्या प्रचण्ड अिमारतीचे स्तंभ होत. सर्व लॅटिन भाषा अेका 'हि' ह्या ध्वनीपासून निघाली असें अेक मत आहे, तर सर्व ग्रीक भाषा 'अि' ह्या ध्वनीपासून निघाली असें दुसरें अेक मत आहे. ह्या अेकान्तिक मतांचा अर्थ अितकाच की त्या त्या भाषांत त्या त्या वर्णाला विशिष्ट आणि विविध असे अर्थ प्राप्त झाले आहेत. मागे अेका संस्कृत भाषेमधील ध्वनि घेअून व्यस्त व समस्त अशा दोन्ही अवस्थांत त्याच्या अर्थासह मांडणी केली. तीच अुपपत्ति संस्कृत ही ज्या भाषासंघांतील अेक भाषा आहे त्या अिंडो-यूरोपीय भाषासंघांतील ध्वनि व त्यांचे अर्थ, त्यांचे संयोग व त्यांचे संयुक्त अर्थ ह्या-बाबत मांडून दाखवितो. अुद्देश हाच की भाषेत मूलभूत कांही ध्वनि असतात; त्यांना कांही कारणांनी विशिष्ट अर्थ प्राप्त होतात; त्यांच्या संयोगाच्या योगाने जे शब्द तयार होतात त्यांना त्या ध्वनींचा संयुक्त अर्थ प्राप्त होतो, हा सिद्धान्त स्पष्ट व्हावा. अिंडो युरोपीय किंवा अिंडो-जर्मानिक भाषांतील मूलभूत ध्वनींना Eur-Aryan असें क्वचित् म्हटलें जातें. हे मूलभूत ध्वनि निरनिराळ्या पाश्चात्य व पौर्वात्य भाषांत कोणत्या स्वरूपांत व कोणत्या अर्थाने आढळून येतात हें खालील अुदाहरणांवरून दिसून येअील. त्या त्या ध्वनीला अनुलक्षून युरोपांतील मुख्य भाषा, संस्कृत, अवेस्ता, प्राकृत व प्राकृतोद्भव हिंदुस्थानांतील अर्वाचीन भाषा ह्या सर्वांतील शब्द खाली मांडून दाखविले आहेत. नमुन्यासाठी सात शब्द तीन रकान्यांत मांडले आहेत. पहिल्या रकान्यांत अिंडो-युरोपीय मूलभूत ध्वनि, दुसऱ्या रकान्यांत युरोपीय भाषांत त्यांचीं झालेलीं रूपांतरें व तिसऱ्या रकान्यांत संस्कृत, प्राकृत व प्राकृतिक भाषांत त्याची झालेलीं रूपान्तरें अशी मांडणी आहे. प्रथम भाषादर्शक संक्षेप देअून रेषेपुढे ध्वनीचें रूपान्तर दिलें आहे.

| अिंडोयुरोपीयन किंवा Eur-Aryan ध्वनि | यूरोपमधील भाषांतील रूपान्तरें | हिंदुस्थानांतील भाषांतील रूपान्तरें |
|---|---|---|
| १ Qne, Qnu (कन्=आरंभ करणें). | Gr- Knid, Kno, Chonis; Lat- Cnide, Cinis, √Knis; Lithu- Knis; Lett, Russ- Gnides; Teut-Knis; ASax -Hnutu; Eng- nit, nut. | सं-कण, कन, कनीयस्, कनिष्ठ, कन्या; प्रा- कण, कन; गु-कण, कणी, कणुं; सिं- कणो; पं- कण; पश्चिम पं- कणी = थेंब; हि.-कन; मराठी- कण, कणी, कणीस, कणीक, कुणी, कणा, कण्या अित्यादि शब्दांत आढळतो. |
| २ Quel (चल्). | Gr- Pelo; Lat- Colo; Aisl- Hvel. | सं- चल्; अवेस्ता-चरअि; अुत्तर फार्सी- चरिदन्; प्रा- चल; गु. बं. ओ- चाल; पं-चल; सिं. हिं- चल; काश्मि- चल्=पळून जाणें; मराठी- चल, चलन, चालन, चाल, चाळण, चाळवाचाळव अित्यादि. |
| ३ Dhe (धा) | Gr- The; Lat-De; Slav- Deti; Lith-Deti; As-Don. | सं- धा; अवेस्ता-धअि; प्रा-धा, धण; गु. पं.-धण; सिं- धनु; हिं- ढन; काश्मि- दन; मराठी- धन, धान, धन्य, प्रधान, प्राधान्य, अनुधान, अि. |
| ४ Og, Ong, Aug. | Gr- Ab, ag, abros; Lat- Ung, Ignis; Lith- Ugnis; Slav- Ogni; HGerm- Aucho. | सं-अग्नि, √अंज्, अंगार; पा- गिनि; प्रा-अग्गी, अग्गि; गु- हिं - हिं - आग; सिं - अगि; काश्मि-ओगुन्; ओढिया-णिअ्; सिंह-अग; मराठी-आग, आगटी अि. |
| ५ Ek, Ak, Ok. | Lat- Ash, akoha, akus; Slav- Ak, asz; Lith- Akmeus, Aket; Teut-Ek; Goth- egg; Old Germ- Ekka; Eng- Acute, acumen. | पूर्ववैदिक- अेक्; सं-अश्, आशु, अश्मन्, अशनि, अश्मर, अश्रु; अवेस्ता- अश्, अष्, अश्मन्, अश्प, आशुस्; फार्सी- अस्वार. |

| अिंडोयुरोपीयन किंवा Eur-Aryan ध्वनि | यूरोपमधील भाषांतील रूपान्तरें | हिंदुस्थानांतील भाषांतील रूपान्तरें |
|---|---|---|
| ६ Ui, Vi. | Gr- Eideos; Lat- Vidua Slav- Vidova; Russ- Vdova; Goth- Widuwo; Eng- Widow. | सं.- विधवा, अविधवा, विधवम्; अवेस्ता- विधव; प्रा. अ- विहवा; हिंदी- अ-हिवात, अहीवात, म. अ-हेव- पण, अहेवदोरा, अहेव-मरण, अहेवनवमी. |
| ७ Ario | Gr- Helles (Hellespont) Germ- Herr; Eng- Sir, Old Pers- Ariya; Iran- Airem. | सं- आर्य √ऋ; अवेस्ता- अिर्य, अर्यमन्; पाली शिलालेख- अय्य. अय; प्रा- अज्जय; गु- आजो; हि- आजा; कानडी- अय्य. |

हे सातच शब्द वर अुदाहरणें म्हणून मांडून दाखविले. ह्यांसारखे आणखी कितीतरी शब्द मांडून दाखवितां येण्यासारखे आहेत. मूलभूत ध्वनि व त्याचे अर्थ निरनिराळ्या भाषांत संक्रान्त होत असतांना कसे बदलतात हें दाखविण्याकरिता वर कांही अुदाहरणें दिलीं.

११. येथे अेक गोष्ट दृष्टिआड होअूं देतां कामा नये. ज्या भाषांतील अुदाहरणें द्यावयाचीं त्या भाषा अेकाच भाषावंशांतील असल्या पाहिजेत; भिन्न वंशांतील असून अुपयोगी नाही. कारण भिन्न वंशांच्या भाषांत मूलभूत ध्वनि भिन्न असण्याचा संभव आहे. ध्वनिप्रतीक-तेचीं तत्त्वेंहि किंचित् भिन्न असण्याचा संभव आहे. कांही कांही ध्वनि अजिबात नसतात. आदिम आर्य भाषेंत मूर्धन्य ध्वनिच नव्हते. संस्कृत भाषेंत दन्त्यतालव्य ध्वनि नाहीत. तसेंच अरबी, फार्सी भाषांत कांही ध्वनिच अजिबात नाहीत तर कांही आर्य भाषांत नसलेले असे ध्वनि आहेत. तेव्हा भाषेंत अजिबात नसलेल्या ध्वनींचा अर्थ ध्वनीच्या द्वारा दाखवावा लागणार व तितक्यापुरते ह्या नव्या ध्वनींना नवे अर्थ प्राप्त होणार हें अवघड आहे. हें भिन्न भाषावंशांतील भाषांसंबंधी सांगितलें. परंतु कधी कधी अेकाच भाषावंशांतील निरनिराळ्या भाषांमध्ये सुद्धा ध्वनिप्रक्रियेच्या नियमाने जेव्हा ध्वनीचे बदल होतात तेव्हा मूळ ध्वनीचे अर्थ बदललेल्या ध्वनीला प्राप्त होतात. 'गृह' हा ध्वनिसमूह मराठींत येतांना 'घर' असें रूप धारण करतो. तेव्हा संस्कृतमधील ग्, ऋ, ह, अ ह्या ध्वनींचे अर्थ घ्, अ, र्, अ ह्या ध्वनींना प्राप्त होतात. 'युगलम्' ह्या ध्वनिमूहाचें मराठींत रूपान्तर 'जुळें' असें होतें. अर्थात्च य्, ल् ह्या ध्वनींचे अर्थ ज्, ळ् ह्या ध्वनींना प्राप्त होणारच. 'अवनत'चें 'ओणवा', 'ऊर्ध्व'चें 'अुभा', 'अभिकर्ण'चें 'अैक(णें)', 'अर्धचतुष्पदी'चें 'ओवी' अित्यादि संस्कृत ध्वनिसमूहाचीं मराठींत रूपान्तरें होतात तेव्हा मूळ ध्वनींचे अर्थ रूपान्तरित ध्वनींना आलेच पाहिजेत. तसे ते येतातच. व ते आल्यामुळेच त्या त्या भाषेंत विशिष्ट असे मूलभूत ध्वनि निर्माण होतात व त्यांना निराळे अर्थहि पण प्राप्त होतात. परंतु हा नियम देशी व तद्भव म्हणून समजल्या जाणाऱ्या शब्दांच्या बाबतींत खरा आहे. तत्सम शब्दांना हा नियम लागू होणार नाही. तत्सम

शब्दांच्या बाबतींत मूळ ज्या भाषेंतील ते शब्द आहेत व तेथे त्या ध्वनिसमूहाला जो अर्थ आहे तोच कायम राहणार हें अुघड आहे.

१२. अशा रीतीने मराठी भाषेंतील मूलभूत ध्वनींना कोणते अर्थ प्राप्त झाले आहेत हें पाहणें ओघानेच प्राप्त होतें. मराठींतील कांही वर्ण किंवा ध्वनि व त्यांना प्राप्त झालेले अर्थ अुदाहरणादाखल मांडून दाखवितों. 'अ'पासून 'औ'पर्यंत सर्व स्वर व 'क्'पासून 'ज्ञ्'पर्यंत सर्व व्यंजनें त्यांच्या अर्थासह मांडून दाखवितां येण्यासारखीं आहेत. परंतु कांही थोडेच वर्ण मांडून दाखवितों. प्रथम वर्ण, नंतर त्याचें वैशिष्टय व शेवटीं अुदाहरणें असा क्रम पुढील कोष्टकांत ठेविला आहे.

| वर्ण | अर्थवैशिष्ट्य | अुदाहरणें |
|---|---|---|
| १ ग् | मधुरत्व, रुचिरत्व | गंध, गौर, गोरा, गूळ, गुऱ्हाळ, गुलाब, गुलकंद, गुलाली, गायन, गंधर्व, गुणगुण, गुंगुं, गीत, गुलगुल, गोंडस, गाथा, गोड अित्यादि |
| | वर्तुलत्व, समूह | गोल, गोळा, गोळी, गुंड, गुंडी, गोंडा, गांठ, गिंडी, गुंता, ग्रंथ, गोत्र, गोत, गर्दी, गाव, गिचमिट, गडबड, गोंधळ, गवाळें |
| | चैतन्य, वाणी, शब्द करणें गमन, गिळणें | गद, गद्गद, गुलगुल, गिरा, गीता, गो(वाणी, अिंद्रिय), गायत्री, गाथा, गिळणें, गाळ, गळा, गल्ल, गाल, गमन, गाडी, गळणें, गांठणें, गोठणें, गणणें, गांधील अित्यादि |
| | गोपनीयत्व, गुह्यत्व | गोपन, गुह्य, गुहा, गुंफा, गुडुप, ग्रंथी, गांठ अित्यादि |
| २ च् | भ्रमण, गति (मानसिक व शारीरिक) | चर, चार, चल, चाल, चाळ, चाळणी, चल, चक्र, चक्कर, चव्हाटा, चाक, चाकी, चर्पट, चावट |
| | अदन, खाणें | चव, चाव, आचव, चाखणें, चाटणें, चारा, चट्टा, चटणी, चरिंदा, चोथा, चुट्टा, चोखणें |
| | प्रकाश, तेज, सौंदर्य, संचय | चक, चकाक, मयचकित, चित्र, चित्रण, चितारी, चमत्कार, चिती, चिता, चांग, चांगलें, चंद्र, चांदणी, चमक |
| ३ झ् | तेज, प्रकाश | झक, झाक, झकाकी, झकपक, झळ, झाळणें, झारी, झळकणें, झोत |
| | आवाज, मांडण | झंकार, झंझावात, झुमझुम, झांगड, झांबड, झगडा, झोड, झाडणें, झोडप, झिमझिम, झोंड |
| | आवरण, आच्छादन | झाकणें, झापण, झोळ, झोळी, झगा, झडप, झाकवणें, झवलें |

| वर्ण | अर्थवैशिष्ट्य | अुदाहरणें |
|---|---|---|
| | शीघ्रत्व, त्वरा | झट, झटकन्, झटपट, झणी, झपझप, झरणें, झुरणें, झरा, झारी, झरी, झरशर, झेळणें, झोल, झोळ |
| | क्षुद्रत्व, तिरस्कार | झट्, झाँट, झट, झिपरी, झिंझी, झुलूप |
| ४ ड | ध्वनि | डंका, डांगोरा, डमरु, डुरडुर, डराँव डराँव, डुक्कर, डोंबल |
| | दंश | डंक, डंखीण, डाख, डाखणें, डाकू |
| | चलितत्व | डग, डळमळ, डचकळ, डबडब, डुलणें, डोल, डोली, डांग, डुंग, डुंगर |
| | दहन, क्रीडा, शरीरावयव | डाग, डागणें, डाव, डोकें, डोळा, डोशी, डाव |
| ५ ढ् | वैपूल्य | ढग, ढिग, ढिगार, ढब्बू, ढब, ढसदार, ढमाल, ढकार, ढगळ, ढवढव, ढोबळ, ढाळ, ढोण, ढाण |
| | चलितत्व-गति, जोर | ढळणें, ढकलणें, ढकल, ढळढळ, ढिला, ढाळणें, ढुसक, ढोसणें, ढुस्सा, ढोर |
| | अुच्चत्व | ढुंग, ढुंगण |
| ६ त् | अवयव, विभाग होणें, तुटणें | तुटणें, तोडणें, त्रुट, तोटा, तोडा, तुटक, ताडातोड |
| | हिंसा, पीडा, त्रास, त्याग | तंटा, तंडणें, तडतडा, तडाखा, तामसी, ताप, ताव, तवा, तडफड, तळणें, तेल, तूप, तट्ट, तटतट, तट्टू |
| | त्वरा, आवाज, पसरणें, गति | त्वरा, तातडी, तडक, तारा, तारका, तावडतोब, तडकण, तरतरी, तळमळ, तत्काळ, तरंग, तर्क, तंतु, तत, ताण, तातू, ताट, तपेली, तस्त अित्यादि |
| | सार्वनामिक बीज(दर्शक) | तो, ती, ते, तेवढा, तादृश, तिकडे, तेथे |
| | रक्षण, वजन अित्यादि | त्राण, तात, तात्या, तान्हा, तान, तारणें, तोल, ताजवा, तराजू, तारतम्य, तुलना |
| ७ थ् | स्थैर्य, स्थान | थांबणें, थोपणें, थोपी, थापी, थबकणें, थळ, थाळी, थाळेरा, थाळेरें, थावरणें |
| | विस्तृतत्व, अल्पत्व, संघात, तिरस्कार अित्यादि | थोर, थविर, थेरडा, थोडें, थप्प, थवा, थाळा, थूत्कू, थुकणें, थुंकी, थुका, थोबाड, ठोल्या |
| ८ द् | हाताशीं संबद्ध अशी देण्याची, दंडण्याची क्रिया | दान, देणें, दण्ड, दाण्ड, दाण्डा, दाण्डू, दाण्डके, दण्ड्या, दाण्डकी |

| वर्ण | अर्थवैशिष्ट्य | अुदाहरणें |
|---|---|---|
| | दुष्टत्व अित्यादि | दुष्ट, दुष्काळ अित्यादि |
| ९ न् | सजीवत्व, चैतन्य, वनस्पति | नर, ना, नवरा, निंब, निंबु, निंबोळी |
| | अंग अवयव | निटिल, निढळ, नाक, नख, नरोटी, नाडी, नाडा, नासा, नाभि, नस |
| | पाणी, द्रव, गति-वहन | नीवर, नहर, नेर, नहाण, न्हाणी, न्हावी, नित्य, नितान्त, निजणें, नीद |
| | लुबाडणें-हिंसा, आवाज अि० | नागवणें, नागवा, नागा, नंगा, नाद, नद, नदी, नांदी, नंद, आनंद, नंदन अित्यादि |
| १० श् | खाली पडणें, निजणें | शयणें, शयन, शेज |
| | अुच्चत्व, मर्यादा, अंत | शेंडा, शिख, शेंव, शिव, शेवट, शेप, शेपूट, शीर्ष |
| | स्वच्छत्व अित्यादि | शुच्, शुद्ध, शोध, शोच, शोभन, शुक्ति, शिंपल, शुक्र, शोधन, शोभा अित्यादि |

१३. वर मराठींतील दहा वर्ण किंवा ध्वनि अुदाहरणांदाखल घेअून त्यांचे सामान्य दृष्टीने दिसणारे ठळक असे अर्थ देअून त्यांचीं अुदाहरणें दिलीं. अितरहि मराठी वर्ण व अुदाहरणांवरून प्रतीत होणारे त्यांचे ठळक अर्थ मांडून दाखवितां येण्यासारखे आहेत. केवळ स्थळमर्यादेकडे पाहूनच तसें केलें नाही. वरील दहा वर्णांचे सुद्धा आणखी कांही अर्थ असणार नाहींत असेंहि नाही; आणखीहि कांही अर्थ असूं शकतील. सिद्धान्त प्रस्थापण्याच्या दृष्टीने कांही मांडून दाखविले अितकेंच. अुपसर्गाने शब्दाचा अर्थ बदलतो ह्या मताच्या मुळाशीं सुद्धा हाच सिद्धान्त आहे. विशेषतः अेकाक्षरी अुपसर्गांच्या बाबत तर हा सिद्धान्त तेव्हाच अुपोद्बलित होतो. नि, वि, सु, (अ)पि ह्या अुपसर्गांनी मूळ शब्दाच्या अर्थांत विकृति कां अुत्पन्न व्हावी? त्या त्या अुपसर्गांच्या घटक वर्णांत कांही तरी अर्थ निविष्ट असल्याशिवाय विकृतिसामर्थ्य त्याला कसें प्राप्त झालें असणार? हा अर्थ तरी त्यांना कोठून आला? पूर्वीच्या कोणत्या तरी सांग शब्दाचे अवयव झडून जे अवशेष राहिले ते हे अुपसर्ग. तेव्हा पूर्वीच्या सांग शब्दांचा अर्थ ह्या अवशिष्ट अवयवांत अेकत्र झाला. तोच ह्या अुपसर्गांचा अर्थ आणि त्या योगानेच ज्या शब्दांच्या पूर्वी जे अुपसर्ग लागतात त्यांच्या अर्थांत ते विकृति अुत्पन्न करतात. हीच विचारसरणी व्युत्क्रमाने अनुसारिली कीं आम्ही जो मूलभूत ध्वनींच्या अर्थासंबंधी सिद्धान्त मांडीत आहों त्याला पुष्टि मिळते.

अशा रीतीने मूलभूत ध्वनींना अर्थ प्राप्त होतो. त्या मूलभूत ध्वनींचा क्रम, अनुक्रम, व्युत्क्रम वगैरे निरनिराळ्या प्रकारांनी जुळणी केली म्हणजे भाषेंतील शब्द तयार होतात. ह्या ध्वनिघटित किंवा वर्णघटित शब्दांखेरीज आपाततः किंवा यदृच्छेने बनलेले असेहि शब्द भाषेंत पुष्कळ असतात. ह्या शब्दांच्या बाबत अमुक अेक शब्दाला अमुक अेक अर्थ कसा प्राप्त झाला

हें सांगतां येणें शक्य होत नाही. अुदाहरणार्थ, व्यक्तींचीं नांवें व त्या नांवांवरून रूढ झालेले शब्द ह्यांचे अर्थ व त्यांचीं कारणें स्पष्ट करून सांगणें कठीण आहे. कृष्ण, भीष्म, अर्जुन, युधिष्ठिर अित्यादि व्यक्तिनामांचा अर्थ सांगण्यांत येतो. अगदी प्रथम हीं नांवें जेव्हा अुपयोगांत आलीं तेव्हा तो अर्थ खरा असेल आणि तेंहि कदाचित्. परंतु पुढे तर त्या मूळ अर्थाचा मागमूसहि राहत नाही. व्यक्तिनामावरून सिद्ध झालेल्या अितर शब्दांची तीच गत. घाशीरामी, बाजीरावी, सुलतानी, Bycott, Macadamise, पैठणी वगैरे शब्दांना विशिष्ट अर्थ कांही विशिष्ट प्रसंगाने प्राप्त झाला आहे.

१४. भाषेंतील मूलभूत ध्वनींपासून घटित झालेल्या व अशा रीतीने आपाततः किंवा यदृच्छेने घटित झालेल्या शब्दांना विशिष्ट वाच्यार्थ प्राप्त होतो. त्या विशिष्ट वाच्यार्थास पुनः लक्ष्यार्थ प्राप्त होतो. लक्ष्यार्थाला पुनः लक्ष्यार्थ प्राप्त होतो. मूळ शब्दावर अशा रीतीने लक्षणेचीं पुटेंचीं पुटें सारखीं चढत असतात. भाषा अशा रीतीने सारखी संपन्न होत असते. भाषेचें वैभव जें वाढतें तें लक्षणेच्या सामर्थ्यानेच. शब्दाच्या अर्थाकडे मानसशास्त्राच्या दृष्टीने पाहतां येण्यासारखें आहे. अमुक अेका शब्दाला अमुक अेक अर्थ कां ? तर तशी अीश्वराची अिच्छा म्हणून. ह्या अुत्तराने समाधान होत नाही. अुत्तर देतां येत नसल्याची ही कबूली आहे. ध्वनिशास्त्राप्रमाणे आम्हीं अुत्तर वर दिलेंच आहे. शब्दाला अर्थ देतांना तरी मनांत क्रिया काय होत असते ? 'शब्द' हें अेक चिन्ह आहे; तें अेक प्रतीक आहे. आणि तें प्रतीक अेका वस्तुसंबंधीच्या कल्पनेचें आहे. शब्दार्थाच्या बाबत तीन बाबींचा संबंध येतो. पहिली बाब वस्तु, दुसरी बाब त्या वस्तूची कल्पना आणि तिसरी बाब त्या कल्पनेचें दर्शक चिन्ह किंवा प्रतीक. वस्तु, कल्पना, प्रतीक ह्या तीन बाबींच्या परस्परसंबंधानेच अमुक अेका शब्दाला अमुक अेक विशिष्ट अर्थ प्राप्त होतो. ह्या तीन बाबींचा हा संबंध त्रिकोणाच्या आकृतीने दाखवितात. ह्या तीन बाबी व त्यांच्या परस्परसंबंधाची त्रिकोणाकृति ह्या गोष्टी प्रथम Ogden and Richards ह्या मानसशास्त्रसंशोधकांनी आपल्या प्रसिद्ध "The Meaning of Meaning" ह्या ग्रंथांत मांडून दाखविल्या. ह्या अुपपत्तीचें सर्व श्रेय त्यांचें आहे.




असा हा त्रिकोण आहे. त्रिकोणाच्या अेका टोकास संबंधी वस्तु, शिरोबिंदूजवळ त्या वस्तुसंबंधी संकेत अथवा कल्पना व त्रिकोणाच्या दुसऱ्या टोकास प्रतीक अशी त्याची मांडणी आहे. शब्द व त्याचा अर्थ ह्या दोहोंबाबत **संकेत** ही अेक अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. संकेत आहे तर अर्थ आहे व अर्थ आहे तर शब्द आहे. संकेतामुळे शब्द जिवंत राहू शकतो. शब्दाचें तगणें अथवा मरणें हें संकेतावर अवलंबून आहे. मानवशरीरांत जसा पृष्ठवंश तसा शब्दांत संकेत असतो. शब्दाचा पृष्ठवंश म्हणजे संकेत. पृष्ठवंशांतील मणका तुटला कीं मानव-

शरीर जसें लुळेंपांगळें होतें तसें संकेत ढिला झाला किंवा नाहीसा झाला कीं शब्द लुळा-पांगळा होऊन मरतो. शब्दाचें जगणें मरणें ह्या संकेतावर अवलंबून आहे. भाषेंत शब्दाचें जें जन्ममरण चालतें तें त्या संकेतामुळेच. व्यवहारांत नवीन संकेत निर्माण झाले कीं तद्दर्शक नवे शब्द प्रचारांत येतात. कालाच्या ओघांत ते संकेत जुने झाले कीं शब्द जुने होतात व पुढे कालांतराने संकेत नाहीसे झाले कीं ते शब्दहि मरतात. ज्ञानेश्वराच्या वेळचे बरेच शब्द अेकनाथ-काळीं राहिले नाहीत; अेकनाथकाळचे रामदासाच्या वेळीं राहिले नाहीत; शिवछत्रपतींच्या वेळचे स्वातंत्र्यांतील शब्द, पेशवेकाळाचे साम्राज्यांतील शब्द आजच्या आङ्ग्लाअींत राहिले नाहीत. ह्या सर्वांचें कारण आम्हीं जें वर सांगितलें तें म्हणजे संकेतरूपी पृष्ठवंशांतील ढिलाअी हें होय. शब्दाची सुस्थिति ही जशी संकेतावर अवलंबून आहे तसेंच भाषेचें वैभवहि संकेतावर अवलंबून आहे. जितके संकेत अधिक तितके तद्दर्शक शब्द अधिक, व तितकी भाषेची संपन्नता अधिक हें उघड आहे. संकेत तरी वाढावे कसे ? शास्त्रसंशोधन, विस्तृत व विविध जीवन, भिन्नभिन्न अनुभूतींच्या केंद्रांचें अुत्पादन, औद्योगिक व औद्यमिक व्यवहारांचें निष्पादन वगैरे हरअेक मानवी प्रयत्नांनी संकेतांची निर्मिति वाढते व त्याबरोबर शब्दहि वाढतात व भाषाहि संपन्न होत जाते.

१५. संबंधी वस्तु, संकेत किंवा कल्पना व त्याचें अनुबंधी प्रतीक जो शब्द ह्या तिहींचा व्यापार अेकदा सुरू झाला म्हणजे भाषाव्यवहार सुरू होतो. ह्यालाच शब्द व त्याचा अर्थ ह्यांचा व्यवहार असें म्हणतां येईल. हा व्यवहार अेकदा सुरू झाला म्हणजे त्यांत निरनिराळ्या कारणाने निरनिराळे प्रकार सुरू होतात. अर्थाच्या निरनिराळ्या छटा निर्माण होतात. अर्थाचें सामान्यीकरण कोठे होतें तर कोठे त्याचें विशेषीकरण होतें, कोठे अर्थविस्तार होतो तर कोठे अर्थसंकोच होतो, कोठे अर्थगौरव होतो तर कोठे अर्थभ्रंश होतो, कोठे अर्थातील ग्राम्यतेचा परिहार करतात तर कोठे मांगल्याचा परिहार करतात, कोठें अेका शब्दाला नाना अर्थ प्राप्त होतो तर कोठे नाना शब्दांत अेकच अर्थ प्राप्त होतो, असे हे चमत्कार शब्दसृष्टींत होत असतात. जसा आपला हा मानवांचा समाज आहे व तो जसा नाना विविध रंगांनी नटलेला असतो तसाच शब्दांचा सुद्धा अेक समाज आहे व तो विविध रंगांनी नटलेला आहे. शब्दांच्या ह्या समाजांत शब्दांच्या निरनिराळ्या संस्था आहेत. शब्दांचीं कुटुंबें आहेत. शब्दांचे वंश आहेत. कांही शब्द दीर्घायुषी असतात तर कांही शब्द अल्पायुषी असून जन्माला आल्याबरोबर मरतात. कांही शब्द शान्त असतात तर कांही शब्द चळवळे असतात, तर अितर कांही क्रांतिकारक असतात. कांही स्वास्थ्यप्रिय तर कांही बंडखोर; कांही समतावादी तर कांही समाजसत्तावादी; कांही लोकशाही तर कांही राजशाही असे शब्द असतात. कांही शब्दांना अेकलकोंडे-पणाची ब्रह्मचर्यवृत्ति आवडते तर अितर कांही शब्दांना कुटुंब करून राहणें आवडतें. याग, मंत्र, अिंद्र, अुपस्, होम अित्यादि वैदिक अथवा पूर्ववैदिक शब्द हे दीर्घायुषी शब्द होत. कांही नाही तरी दहा हजार वर्षांचें ह्यांचें आयुष्य आहे. अननस, बटाटा, तंमाखू अित्यादि शब्द प्रवासाचे फार शोकी आहेत. 'जिराफ' हा असाच अेक भटक्या शब्द आहे. अरबस्तान, अिराण, स्पेन, पोर्तुगाल, अिटली, फ्रान्स ह्या देशांत फिरून अिंग्लंडमध्ये 'जिराफ' ह्या स्वरूपांत स्थायी होऊन बसला. इंग्रजी Mango व Chiroot हे शब्द तर मूळचे मलायांतील असावेत अशी शंका देखील येत नाही. तसेच 'मुंगूस' हा शब्द मूळचा तेलगू तर 'दाम' शब्द मूळचा ग्रीक. 'किमया' शब्दानेहि पुष्कळ प्रवास केला आहे. किमया हा मराठी शब्द व

Chemistry आणि Alchemy हे अिंग्रजी शब्द हे अेकच शब्द आहेत असें म्हटलें तर कोणाचा त्यावर विश्वासहि बसणार नाहीं. परंतु तसे ते अेक आहेत. असो. असे शब्दांचे पुष्कळ चमत्कार साधार सांगतां येण्यासारखे आहेत. ह्या सर्व शब्दांच्या अर्थांच्या गमती आहेत व तो अेक स्वतंत्रच विषय आहे, तें अेक स्वतंत्र शास्त्र आहे.*

## रद्दींतील रत्नें

### लहानपणीं अीश्वरज्ञान करून देणें

"मुलांबरोबर वाद करून अीश्वराचें अस्तित्व स्थापन करणें हें केवळ अप्रयोजक आहे असें जर कोणास वाटत असेल तर वाटो, परंतु तें नीट नव्हे; कारण अीश्वर आहे याच्या खरेपणाविषयीं दृढ आणि चांगलीं प्रमाणें आहेत, तीं न जाणतां त्याचें अस्तित्व कितीअेक स्वीकारितात, तथापि त्याविषयीं नानातऱ्हेच्या शंका घेतां येतात. आणखी असें आहे कीं धर्मसंबंधी सर्व मतें आणि शास्त्रें यांस अीश्वरास्तित्व केवळ आधार होय, त्याविषयीं मनुष्यांचा जसजसा अपूर्ण आणि भ्रांतिष्ट विचार असतो त्या त्या प्रमाणें धर्मसंबंधी शास्त्रांत ज्या खऱ्या गोष्टी सांगितल्या असतात, त्यांविषयीं मनाच्या ठायीं संशय अुत्पन्न होतात, आणि मग तदनुसार त्यापासून क्रियाही घडत नाहींत. विचारपूर्वक पाहिलें असतां दुसऱ्या सिद्धान्तासारखीं या सिद्धान्तांसही प्रमाणें आहेत, तर तीं जसजशीं पूर्ण आणि दृढ असतात तसतसा या सिद्धान्ताचा यथास्थित विचार होतो. मग तो विचार वारंवार मनांत घोळूं लागला म्हणजे त्यावर सतत विश्वास बसून त्यापासून फळ अुत्पन्न होतें. म्हणोन त्याचा अभ्यास करणें सर्वांस आवश्यक आहे. त्यांत मुलांस लहानपणींच अीश्वराच्या गोष्टी सुचविण्याकरितां आणि पुढें त्यांस वाअीट संगतीनें अथवा वरवरल्या गोष्टी समजून जें अपूर्ण ज्ञान होतें त्याच्या अभिमानानें जे नास्तिक विचार अुत्पन्न होतात ते न होण्याकरितां पूर्वींच बंदोबस्त करून ठेवणें हें फार अुत्तम आहे. मुलांच्या कोमल अंतःकरणांत अेकदां अीश्वराच्या अस्तित्वाविषयीं पूर्ण बोध व त्याच्या गुणानुवादाविषयीं अभिरुचि हीं अुत्पन्न झालीं म्हणजे अुत्तरोत्तर तीं त्यांच्या समाधानास कारण होतात; त्यांत मुलांस असा बोध होणें कांहीं सुलभ वाटतें. कां कीं, त्यांचें मन थोर मनुष्याअितकें दुष्ट विकारें करून लिप्त नसतें."

—सृष्टिजन्य अीश्वरज्ञान (पांडुरंग गणोबा कृत) अि. स. १८४२ प्रस्तावना.

---

* ह्या निबंध लिहितांना अितर पुष्कळ ग्रंथांबरोबर पुढील ग्रंथांचा अुपयोग झाला आहे. त्या त्या ग्रंथकाराचा लेखक अत्यंत ऋणी आहे. (1) Etymological English Dictionary by Skeat, (2) Science of Etymology by Skeat, (3) World of Words by Eric Partridge, (4) Wonder of Words by Oldberg, (5) Language and Reality by W. M. Urban, (6) The Meaning of Meaning by Ogden and Richards, (7) Linguistic Speculations of the Aryans by Chakravarti, (8) Eur-Aryan Roots by Baly. अित्यादि.)

# महाराष्ट्रांतील जानपद ओंवी

(लेखांक ६ वा)

(लेखिका— कु. अनसूया भागवत)

**(३) वहीणभाअू प्रेम :** आतापर्यंतच्या ओव्यांतून आओीवाप व मुलें यांच्यांतील परस्परप्रेम हेंच अनुपम म्हणून जरी वर्णिलेलें असलें तरी वहीण व भाअू यांच्यांतील परस्परप्रेम हा ओवीगीतांचा सर्वांत अधिक मोठ्या प्रमाणांत विपय झालेला दिसून येअील. बहीणभावां-संबंधीच्या ओव्या असंख्य मिळतात. भाअू व बहीण अेकाच घरांत, अेकाच आअीबापांच्या मायेच्यां छत्राखाली वाढलेले हे दोन जीव म्हणजे लहानपणापासून अेकमेकांचे जिवलग मित्र झालेले असतात. प्रत्येक कुटुंबांतून दिसून येणारीं बहीणभावांतील क्षुल्लक भांडणें जरी खालील ओव्यांतून रंगविलेलीं असलीं तरी हीं भांडणें किती वरवरचीं असतात व अंतःकरणांतून हे दोन जीव परस्परांच्या प्रेमासाठी किती आसावलेले असतात हेंहि त्याबरोबरच दर्शविलेलें आहे.

बहिणभावंडाची त्यांच्या पोटामधीं माया ।
फोडिलं सीताफळ आंत साखरेची काया ॥८२०
लसूण कोथमिर अेका दंडानं पाणी पिती ।
डाळुंबी माझी बाई भावाला शोभा देती ॥
बहीण भावंडाचीं यांचीं सारखालीं तोंडं ।
गंधारी माझी गोदू जाअी चमेली तुझी बोंडं ॥
बहीण भावंडाची जोडी बसली वावरी ।
राघू मारीत मरारी मैना झालीया बावरी ८२३
बहीणभावंडाचा झगडा रानींवनीं ।
बहिणीच्या डोळां पाणी भाअू चिंतावला मनीं ॥
बहिणभावंडाचा झगडा जवा तवा ।
वाणीचा बंधु बोल तिच्या वाट मी गेलों कवा ?॥
बहिणी या भावंडाचा झगडा झाला शेतीं ।
वाणीचा बंधु बोल तुला भैणाया राग किती ?॥
वहीणभावंडाचा झगडा कुणी तोडीना ।
चिखल पाण्यांला सोडीना ॥८२७
बहीणभावंडाचा झगडा निमना ।
मधीं बसली कामनी[1] अुगी म्हणना दोघांना ॥

यांपैकी पुष्कळशा ओव्या अर्थात्च बहिणींच्या बाजूने भावावरून गाअिलेल्या असतात. भावावरून रचलेल्या ओव्यांची संख्या अितकी विपुल आहे की नुसत्या भावावरील ओव्या अेकत्र केल्या तरी त्यांवरून महाराष्ट्रांतील खऱ्याखुऱ्या कृषीजीवनाचें सर्वांगपूर्ण असें चित्र अुभें करतां येअील. किंबहुना, जात्यावर दळण्यास बसलेल्या स्त्रीच्या अुत्साही व भक्तिपूर्ण मनांत जे जे विचार किंवा कल्पना येतात त्यांना गेयरूपाने बाहेर वाट देतांना मध्यबिंदु म्हणून ती पुष्कळदा आपल्या भावाचीच मूर्ति निवडते व त्या मध्यबिंदूभोवती आपले विचार व कल्पना यांचें जाळें मराभर विणीत जाते. निरनिराळ्या क्षेत्रांत वावरणाऱ्या भावाचीं रंगविलेलीं हीं सर्व चित्रें अेकत्र केलीं कीं खेड्यांतील शेतावरचें किंवा अितर धंद्यांतलें जीवन, बौद्धिकतेपेक्षा धार्मिक व भावनात्मक मनोवृत्तींचें वर्चस्व, आणि पांढरपेशा वर्गापेक्षा पुष्कळच

१ कामिनी—भावजयीस अुद्देशून.

निराळें असें नैतिक वातावरण, यांचें चालतेंबोलतें रंगीत चित्र आपल्या मनःचक्षूंसमोरून धावत जाअील.

मावावरील आपलें गाढ प्रेम बहिणीने अनेक तऱ्हांनी व्यक्त केलेलें आहे. आअीला ज्याप्रमाणे आपल्या मुलापुढे कुटलीहि मौल्यवान् वस्तु तुच्छ वाटत असते त्याचप्रमाणे बहिणीलाहि भावापुढे कशाचीच किंमत नसते. भाअू म्हणजेच तिचा अमोल दागिना—

सुपमर सोनं नार लेतिया कवाबवा ।
माझा बंधुराया चंद्रहार केला नवा ॥ ८२९
समरतें सोयीर पंद्याच्याँ[3] मोलाचा ।
माझा बंधुराया माझा हंबीर तोलाचा ॥८३०
वाटनीं कोण येतो माझा निडळावरी हात ।
माझा बंधुराया आली माझी दवलत ॥ ८३१
गांवाला गेला कुण्या याला महिना झाला आज।
बयाचं माझ्या बाळ माझ्या गरसोळीचा साज ॥
लिमणगांवींची वाट पुसतें पांदीची ।
बयाचं माझ्या बाळ माझी चौकट चांदीची ॥
फुटली बांगडी नग म्हणती छंदबंद ।
माझा बंधुराया मधीं बिलवराचा बांध ॥८३४

अर्थात्च अितर कुणाहि पुरुषापेक्षा भावाचेंच कौतुक बहिणीला अधिक—

शेजीच्या बंधवाला दादा म्हणायाची चोरी ।
मांडीला देतें मांडी सख्या बंधुची गोष्ट न्यारी ॥
लोकांच्या लग्नांत नाहीं कुंकवाचं बोट ।
बंधुच्या लग्नांत घोळ पातळाची अट ॥ ८३६
लोकांच्या लग्नांत धुरा भरलं माझं डोळं ।
बंधुच्या लग्नांत नकीपोतळ भुअी लोळ ॥ ८३७
लोकाच्या लग्नांत मी त जुलमाची वऱ्हाडीण ।
बंधुच्या लग्नांत गाडी स्वताची शृंगारीन ॥८३८

भाअू-बहिणींचें प्रेम व अेकमेकांकरिता त्याग करण्याची तयारी ओव्यांतून अनेक तऱ्हांनी वर्णन केलेली आहे[6]—

सरगीच्या देवा सख्याचं बरं कर ।
त्याच्या मागून माझ्या बंधवाला हातीं धर॥८३९
मला माया येते झाडावरल्या पाखराची ।
माझ्या बंधवाची विनबापाच्या लेकराची॥८४०
माझ्या गळ्यावर सुरी जीव माझा जाअू राहूं।
माझ्या बंधवाची आण कशासाटीं वाहूं? ॥८४१

---

१ ६५२, ६५८ या मुलांवरील ओव्या भावावरूनहि अनुक्रमें खालीलप्रमाण गाअिलेल्या आढळून येतातः—

(१) धनसंपत्तीची नको वसूं शेजाराला ।
माझा बंधुराया जर माझ्या पदराला ॥
(२) माझ्या घर मधीं मालाच दोन हंड ।
माझा बंधुराया हंड्याला कंडोदंड ॥

२ समर्थ. ३ पंदे = अेक तऱ्हेचें खरवरीत गवत. ४ खसरी. ५ ठेवणीचें पातळ. ६ ७३८, ७४२, ७२० या मुलांवरून गाअिलेल्या ओव्या भावावरूनहि अनुक्रमें खालीलप्रमाणे रचलेल्या आढळतातः—

(१) भावाच्या बहिणीला कशाचा दुकूळ ?
माझ्या बंधुराया पाणी हौदाला वकळ ॥
(२) तुझ्या जीवासाठी जीव देअीन खचित ।
माझ्या बंधुराया कां हो राघोबा दुचित ? ॥
(३) गांवाला गेला कुण्या तिकड माझा डोळा .
माझा बंधुराया माझा नवतीचा पानमळा ॥

तुझ्या जीवासाठी जीव मी अपुला देअीन ।
माझ्या बंधुराया तुला तागडीं तोलीन ॥८४२
भूक लागली पोटाला म्या त तहानेचा गलका केला ।
ताअीत माझा बंधु सखा अवघड्या विहिरी गेला
बारीक माझा गळा कसा वाऱ्यानं अैकूं गेला?
माझ्या बंधुजीनं घोडा मैदानीं अुभा केला ॥
आवुलक मेवा कुणीं कुणीं खावा ?
दोघ माझे बंधु विनबापाऱ्याला द्यावा ॥८४५
गेला कुण्या गांवा माझ्या झुव्याची तोंडकडी ?
माझा बंधुराया नदर पडना झाली येडी ॥८४६
गांवाला गेला कुण्या माझ्या जीवाचा कलीदां[1]।
माझा बंधुराया साखर सोजीचा मलिदां[2]॥८४७
गांवाला गेला कुण्या कवा येशील सांग मला ।
तळातावरी तांब्यों बंधु अडवीन तुला ॥८४८
गांवाला गेला कुण्या माझा अंब्याचा टपळा ।
त्याच्या वाटकडे जीव लागला सगळा ॥८४९
गांवाला गेला कुण्या नाही गेलें मी घालवाया ।
जरीच्या रुमालांनी बंधु लागला पालवाया ॥
गांवाला गेला कुण्या माझं बोलणं वसावसा ।
कुणीकडे गेला माझा गुलाबी पेरू जसां[4]॥८५१
राग मला आला मीच बोललें फडाफडा ।
माझ्या बंधुराया माझ्या काळजाच्या धडा ॥
रागं झालें रुद्र माझं बोलणं सभागती ।
बंधवाला माझ्या कोण घालूं मदरथीं? ॥८५३
वाण्याच्या दुकानीं सौदा घेतें मी तोलातोली ।
बंधुजी रुसला समजावितें मी बोलाबोली ॥८५४
आम्ही तिघी बहिणी जशा वनींच्या बारवा ।
माझ्या बंधुराया यावं पक्षा पाणी प्याया ॥८५५
आम्ही तिघी बहिणी तीन गांवच्या तीन पेठा ।
माझा बंधुराया मला सातारा दिस मोठा ॥८५६
आम्ही चवघ्या आम्ही बहिणी चहुं गांवींच्या बारवा ।
आंत ताअीत बंधु माझा मधीं चांफ्याचा गारवा
बहिणीचा माऊ बहिणींमधी बस ।
माझा बंधुराया सोन्याचा ढीग दिस ॥८५८
तुझ्या जीवासाठी अुभी राहिलें अुन्हांत ।
माझ्या बंधुराया तूंच शेला मी वनांत ॥८५९
तुझ्या जीवासाठीं होअीन रानांतील हरण ।
माझ्या बंधुराया तुझ्या भोवताली चरेन ॥८६०

भावावरून अितरहि स्तुतिपर ओव्या पुष्कळ रचलेल्या आढळतातः—

विहिरी बारवला कशाचं झांकण ?
माझ्या बंधवाला सदाशिवाची राखण ॥८६१
नवस बोललें पाण्याला जातां जातां ।
ताअित माझा बंधु लिंबाखाली अुभा होता ॥
भावाच्या बहिणीनं काय आक्रीत केलं ?
सोमवारीं न्हाली पाणी वेलाच्या खाली गेलं[5]॥
भावाच्या बहिणीनं वाकडी वाट केली ।
आपट्याखाली गेली गळा मरून सोनं ल्याली ॥
झाली न तुला दृष्ट तुला कुणाअीची सोन्या ।
माझ्या बंधुराया माझ्या लिंगाअीत वाण्या ॥
अशी दृष्ट तुला झाली मी त अुतरतें कांदा ।
ताअीत र बंधु माझा चैती पुनवच्या चांदा ॥
लगीन सराअींत जीव कावराबावरा ।
ताअीत बंधु माझा कोण्या तिथीला नवरा[6]॥
अुन्हाळ्याचं अून जरा शिळुपा देरे देवा ।
माझा बंधुराया माझा सुकेशा गेला गांवा ॥

१ कलिजा. २ मलिदा = मळलेली कणीक; साखर = आभी; सोजो = वाप. ३ दृष्ट काढण्याकरिता. ४ किंवा:— "गांवाला गेला कुण्या माझ्या अंगठीवरला ठसा । बंधु वाटेनं गेला कसा माझा गुलाबी पेरू जसा ॥"

५ सोमवार हा शंकराचा वार असल्याने त्या दिवशीं भाअू असलेल्या बहिणीने डोक्यावरून न्हाअूं नये, कारण तें भावाच्या जिवाला वाअीट असतें, अशी शैव लोकांची समजूत आहे.

६ किंवा:— "लगीनसराअींत जीव नाही जिवाअीत । बंधु माझ्या शिणच नवर झाल गांवाअीत ॥"

किंवा पहिली ओळ:— "लगीनसराअी जीव माझा भाअूबंदीं ।"

अुन्हाळ्याचं अून लागतं चैताचं ।
तोंड कोमेजलं ताअीताचं ॥८६९

अुन्हाळ्याचं अून माझ्या बंधुला सोसना ।
झाडाझुडुपाची कुठं सांवली दिसेना ॥८७०

अुन्हाळ्याचं अून तुला झालं मोठ्या लोका ।
बंधवाच्या माझ्या पाठीवर पाणी टाका ॥८७१

अुन्हाळ्याचं अून तुझ्या आलं सुरतीला ।
सांगतें बंधवाला छत्री ने संगतीला ॥८७२

बाअी नवँगतीचा[1] माल माझा पुण्याला गेला काल
ताअीत माझ्या बंधु सावलीनं चाल ॥८७३

बंधुची सासुरवाडी नाही माझ्या मनाजोगी ।
माझ्या बंधुराया राहूं नको येर विगी ॥८७४

सासुरवाडीं जाया हातीं छत्री नकशाची ।
माझ्या बंधवाची जोडी गरुड पकशाची ॥८७५

मंडअी शहरामधी मी घेतें माजीपाला ।
वोळखूं नाही आला बंधु माझा छत्रीवाला ॥

कितीक हाका मारूं तुला डोंगरावरून ? ।
भिरगाचं पाणी नद्या चालल्या भरून ॥८७७

वाटनीं कोण येतो लंबाट चालणीचा ।
माझा बंधुराया हिरा माझ्या मालणीचा[2] ॥८७८

धुणं धुव तूं परटिणी साबण लाव खडकाला ।
आता ताअीत माझा बंधु छातीमधीं बाळा
अंगरखा तुझा तडकला ॥८७९

अंघुळीला पाणी दारीं अिसणीला गंगा ।
माझ्या बंधुराया कर अंघुळ श्रीरंगा ॥८८०

सावळी सुरत न्हाव्याच्या पोराची ।
हाजीमत करी माझ्या अुमेदवाराची ॥८८१

काय सांगूं बाअी काल येगदीचा पोर ।
हाजीमत करी दोन्ही चंद्राची कोर ॥८८२

संपत्तीच्या बळं यांनी तोडिली बामळ ।
ताअीत बंधवानीं माझ्या घातली आगळ ॥८८३

लुगड्याची घडी टाकिली गव्हावरी ।
माझा रुसवा भावावरी ॥८८४

जीवाला जड भारी मायखळ्याला गेलें नाही ।
राणीच्या बागेमधे भाअू माझा वाट पाही ॥

गांवाला गेला कुण्या आठ दिसांची बोली केली।
माझ्या बंधुराया नववी रातर कुठं गेली ॥८८६

गांवाला गेला कुण्या झाला महिना तीन वार ।
कुणी होकारीला मनींचा मनहर ॥८८७

गांवाला गेला कुण्या झेंडू गुलाब्या रंगाचा ।
ताअीत बांधवाचा वास सुटला अंगाचा ॥८८८

गांवाला गेला कुण्या माझी साबणाची वडी ।
माझा बंधुराया शिंपी म्हणूं का मारवाडी ८८९

आली आगीनगाडी डब्याडब्याला कुलूप ।
नाहीं बंधुनं पाहिला हळदीहंड्याचा मुलुख ॥

पुष्कळसे भाअू असले तर कुठल्या बहिणीला नको असतात ? परंतु अेकुलत्या अेक मुलाप्रमाणे अेकुलत्या अेक भावाचीहि किंमत अधिकच वाढते—

अग काय ग करावं आहेत लोकाला बंधु लअी।
माझा अेकुलता अेक भाअू माझा शेला रुंदु
सवाअी ॥८९१

अेकुलता अेक नको म्हणूं शेजीनारी ।
माझा बंधुराया मला हजाराला मारी ॥८९२

अेकुलता अेक कातणी तुझा तारा[3] ।
आता माझ्या बंधु तुझ्यापाशीं लक्ष सारा ॥८९३

पुतळ्याची माळ माझ्या लोळती पाठींपोटीं[4] ।
माझ्या बंधवाला चंद्रहाराला झाली दाटी ८९४

पाठच्या भावाबद्दल बहिणीला विशेष प्रेम असतें; तो तिला बरोबरच्या मित्राप्रमाणे तर वाटतोच शिवाय त्याच्याबद्दल तिला अेकप्रकारचा वात्सल्याचाहि जिव्हाळा असतो——

---

१ नवतीचा.

२ किंवा २ रा चरणः— "निचाळ चालणीचा ।"
४ था चरणः— "शाळु हिरव्या पलाणीचा ।"
किंवा "फोक नवा नारळीचा ।"

३ तान्याप्रमाणे दिसणारें कातणीचें घर. ४ "पाठींपोटीं पुतळयाची माळ लोळते" म्हणजे पाठच्या बहिणी व पोटच्या मुली पुष्कळ आहेत. परंतु भा (चंद्रहार) मात्र अेकटाच आहे.

पोटच्यापरास मला पाठीची लई गोडी ।
दोघ माझं भाऊ बाळपणींची माझी जोडी ॥
तोंडामांडीला भाऊ दादा म्हणतें पुढे गेला ।
पाठीचा माझा बंधु ग्यां ग सत्तेचा उभा केला॥
राग मला आला माझ्या रागाच धनी कोण ?
पाठीचा माझा बंधु आडवा झाला पहिलवान ॥

जीव माझा गेला नका म्हणूं अेकलीची ।
उशाला माझ्या मांडी बंधु माझ्या धाकलीची ॥
भरील्या बाजारांत दह्यादुधाचा विकयरा ।
पाठीचा माझा बंधु भाऊ बहिणीचा चुकयला ॥
भरल्या बाजारांत सर्व मिळालं आटींचं ।
नाही देवा दिलं सख्खं भावंड पाठीचं ॥९००

वडील भावाबद्दल मात्र बहिणीचें प्रेम जास्त आदरयुक्त असतें. वडिलांच्या पश्चात् घराण्याच्या लौकिकाची जबाबदारी बापाकडून वडील मुलाकडेच येते. बहिणींच्या लग्नांची जबाबदारी भावाकडेच येते. विधवा बहिणीचा आधार तोच [1]असतो—

चालली समतून हालूं देअीना माझ्या निऱ्या ।
माझ्या बंधवाच्या बोल लाविना त्याच्या तुऱ्या ॥
जाअीन समतून बघना सभकड ।
बंधवाला माझ्या दादाला पाणी चढ ॥९०२॥
जाअीन समतून सभवाल्याची बहीण ।
मनची आपल्या मी गहीण ॥९०३॥
जाअीन समतून मी सभेचं लेकरूं ।
माझ्या बंधुराया नको माझी चिंता करूं ॥९०४

बाअीला मागण पान खातोया सारा गांव ।
राजी होअीना तुझा भाव ॥९०५॥
बाअीला मागण सोयरा बसला उन्हांत ।
काय सांगूं बाअी नाही भावाच्या मनांत ॥
बहिणी बोळविल्या मोठ्याच्या रीती केल्या ।
माझ्या बंधुजींनी शेल्याच्या बुर्ती[2] दिल्या ॥
लिंबुणीचं लिंबु डोंगरकांठीच आवळे ।
समयाच्या शिरीं मी बहीणभावाच्या जवळ ॥

माहेरीं आलेल्या बहिणीला कपडे आणि दागिने देऊन मोठा भाऊ नेहमी खूप करीत असतो अशा तऱ्हेच्या कल्पना पुष्कळच ओव्यांतून सांपडतात[3]—

हौस पुरविली माझ्या हौशीच्या धन्यानं ।
बंधवांनी माझ्या गळा भरिला सोन्यानं ॥
बोल शिंपीदादा हौशी लेणारीण कोण ?
बोल केशवबाळ पाठीची वंजारीण ॥९१०॥
शिंप्याच्या साताला भाऊ बहिणीनं केला वेडा ।
बाळ माझी पारवती अुंच धडीला मारी खर्डो[4]
हावस मला मोठी भावासंगत बाजाराची ।
माझ्या बंधवानं कंठी मोडली हजाराची ॥

आता वैराळयादादा तुला जायाचं कोठवरी ?
पंडीत माझा बंधु दादा माझा वाटवरी ॥
नवं मी नेसतें जुन्यावरी देतें पाय ।
बयाच्या बाळाला घेणाराला औख लय ।९१४
भरीला बाजार काय करूं मी बाजाराला ?
पंडीत माझा बंधु मी धुंडीतें बजीराला ।९१५
भरीला बाजार भरून मला रीता ।
माझ्या बंधुराया पेठ दणाणली आता ।।९१६

---

१ या पित्यावरून गाअिलेल्या ओव्या भावावरूनहि खालीलप्रमाणे रचलेल्या मिळतातः—

(१) माझी जातकूळ कोण पुसतो सांदीचा ।
माझा बंधुराया खरा रुपया चांदीचा ॥

(२) बहिणी लोळविल्या बंधु माझ्या मायाळांनी ।
लाविल्या जिरेसाळी पाण्याच्या जिव्हाळयांनी ॥

२ खेडेगांवांतील माहेरवाशीण अगर सासुरवाशीण गांवाला जातांना तिच्याबरोबर दिलेले खाद्यपदार्थ व कपडे वगैरे. ३ अशा तऱ्हेच्या जास्त ओव्या कपडे व दागिने यांवरील ओव्यांच्या विभागांत येतील. ४ किंवा:— अग शिंप्याच्या दुकानीं बंधु रुसला भोळा राजा ।
अग आपल्या बहिणीचा अुंच धडीला हात माझा ॥

बहिणीचें लग्न झाल्यानंतरहि तिच्या व तिच्या भावाच्यामधील लहानपणापासून जडलेला मायेचा पाश ज्यांच्या योगाने अधिकच दृढ व्हावा अशा तऱ्हेच्या कांही रूढी हिंदुसमाजांतील पुष्कळशा जातींतून प्रचलित आहेत. महाराष्ट्रांतील मराठा, महार किंवा अितर ज्या जातींतील स्त्रियांकडून या ओव्या घेतलेल्या आहेत त्यांच्या चालीरीतींप्रमाणे बहिणीचें लग्न झाल्यानंतर प्रथम जेव्हा तिची सासरीं पाठवणी करतात तेव्हा बहुधा तिचा अेखादा भाअू तिच्याबरोबर पाठवतात. त्यानंतरहि ज्या ज्या वेळीं मुलीला माहेरपणाला आणावयाची असेल त्या त्या वेळीं तिचा भाअूच तिला मूळ घेअून जातो.[2]

बहिणीचा निरोप घेतांना झालेली भावाची अश्रुपूर्ण स्थिति किंवा मुऱ्हारी म्हणून भाअू न्यायला आला असतांना बहिणीला झालेला आनंद याचें सुंदर चित्र या ओव्यांत रेखाटलेलें आहे. मुऱ्हारी भाअू फार लहान असला तर नेणतेपणामुळे तो वाटेंत किती घोटाळे अुत्पन्न करतो आणि बहिणीला कसें नकोसें करून टाकतो हेंहि मोठया मजेदार रीतीने वर्णिलेलें आहे. तरीसुद्धा असा नेणता मुऱ्हाळी नेण्याची आपल्याला फार हौस वाटते असें अेका ओवींत बहीण सांगतेः—

आगीनगाडींन मला गुंगारा मारिला ।
भावाच्या बहिणीनं हात गळ्यांतला काढिला ।।
बहिणीला घालवून भाअू बसला गांवकुशीं ।
सखा शेल्यानं डोळ पुशी बंधु अितकी माया कशी ? ।।९१८
लोकाचं लगीन मी त बघतें जातां जातां ।
माझा बंधुराया घोडमुऱ्हाळी येअील आता ।।
दोघींचा मुऱ्हाळी अेकीच्या दारीं अुभा ।
डाळुंबी बकुबाई अून झालंय बिगी निघा ।।
नेणता मुऱ्हाळी नको लावूं बयाबाअी ।
आवखळ शिंगीबाअी आवरत नाही ।। ९२१
नेणत्या मुऱ्हाळयाचा मला येतोया कंटाळा ।
माझ्या बंधवाचा सदा शेल्याचा घोटाळा ।।
नेणता मुऱ्हाळी आडरानांत रुसला ।
नेणता बंधु माझा शिंगी सोडून बसला ।।९२३
चाले झडुझडीं तुझ्या चालीनं चालवना ।
माझ्या बंधुराया तहान लागली बोलवना ।।

भावापासून दूर सासरीं गेलेल्या बहिणीचें आपल्या भावावरील प्रेम ओव्यांमधे अनेक तऱ्हांनी व्यक्त झालेलें आढळतें. त्याबरोबरच भावाच्या बहिणीबद्दलच्या भावनांचेंहि आविष्करण झालेलें दिसून येतें[5]—

शेल्याच्या पदरीं बांधत डुमती ।
बहिणीला आणाया बाळांची विनंति ।।९२५
भाअू मला माच दिल गोविंदान ।
गोकुळ माहेर जाअीन आनंदान ।। ९२६
दरव्याच्या कांठीं मोत्यापवळयाच्या झाल्या लुटी ।
निघाल्या भाअूभेटी साल शीतळ जायासाठीं ।।
येडा माझा जीअू अुगीच येडवला ।
बयाचा बाळराज सोयरा कुठ तडवला ?।।९२८

१ या भूमिकेंत भावाला मुऱ्हारी (मूळ + हारी) किंवा मुऱ्हाळी ही संज्ञा मिळते. २ खेडेगांवांतील रीतीप्रमाणे मुऱ्हाळी बहुधा घोड्यावरूनच जातो.

३ किंवा तिसरा चरणः-- "माझ्या बांधवाला"

४ किंवा पहिला चरणः -- "चल शिंगीबाअी"

५ ६१० या मातेवरून गाअिलेल्या ओवीप्रमाणेच भावावरून खालीलप्रमाणे ओवी रचलेली मिळतेः-

"जिवाला जड भारी कुणा वैऱ्यानं नेली मात ?
ताअीत माझ्या बंधु आडवा डोंगर झाली रात ।।

घडोघडीं खंत वाटते माझ्या जीवा ।
माझ्या बंधुराया यावं केसवा माझ्या गांवा ।
मला भेटून जावं भित्रा ॥ ९२९
बहिणीच्या भावा जाशील कुण्या गांवा ?।
ताअीत माझ्या बंधु येरं माझ्या सैंधवा ॥९३०
अशी सांगून धाडीतें बंधु तुला आल्यागेल्या हातीं ।
तुला निरोप झाले किती ? ॥९३१
आंब्याचा आंब्रस तळतीं माझ्या रस ।
पाठीच्या माझ्या बंधु माया अुगीच लावलीस॥
साखरेचा लाडू मीच अेकली कशी खाअूं ?
शिवशेजारीं गुजभाअू त्याला अंतर कसं देअूं॥
वाटच्या वाटसरा खाली बस मी देतें पाणी ।
सावळं तुझं रूप माझ्या ताअीत बंधुराणी[1] ॥
दूरल्या देशीचं पत्र घेतें मी धाअूनी ।
माझ्या बंधुजीनं कांही धाडिलं लिहुनी ॥९३५
तुपाच्या घागरीला वर गुळाचं लिपण ।
माझ्या बंधुराया सांग येण्याचं टिपण ॥ ९३६
जीवाला हुरहुर काल परवाच्या धरून ।
माझा बंधुराया गेला गांवाच्या वरून ॥ ९३७
जिवाला जड मारी तुला कळलं रानामधीं ।
माझ्या बंधवाला कडू लागलं पानामधीं ॥९३८
जिवाला जड मारी तुला कळलं मळयामधीं ।
माझ्या बंधवाला वाळू रुतली जोड्यामधीं ॥
जीव माझा गेला तुला कळलं माळटेकीं ।
माझा बंधुराया हातीं रुमाल धूम टोकी ॥९४०
माझ्या गांवाकड भिल्लांचं लअी भ्यव ।
ताअीत माझ्या बंधु अेकटं नव्ह यांवं ॥९४१

भावाच्या आगमनाबरोबर बहिणीला झालेला आनंद आणि त्याच्याकरिता हें करूं कीं तें करूं अशी तिची उडालेली धांदल यांचें सुंदर प्रतिबिंब खालील ओव्यांत दिसून येतें. तसेंच कांही ओव्यांमध्ये भावाच्या प्रेमाबरोबरच शेजारणींच्या अेकमेकींबद्दलच्या मत्सराच्या भावनाहि प्रकट झाल्या आहेत—

रात न् दिवसाचं करीतें तुझं ध्यान ।
माझ्या बंधवाला पाहिल्यानं हरसलं माझं मन॥
म्यापल्या येशीवर शिंपीतें दहीभातें[3] ।
ताअीत माझा बंधु आला शिंगी नाचवीत ॥
माझ्या अंगणांत बाअिसिकल कुणाची ?
ताअीत बंधवांनी केली दौड उन्हाची ॥९४४
वाटवरी जिरों त्याचा अुपसा कुणीं केला ?
भाऊ बहिणीच्या गांवीं गेला तिथ चतुर पाणी प्याला ॥९४५॥
बंधव पावणा माझ्या वाड्याला होती कडी ।
माझ्या बंधवाची शिंगी दरवाज्या टापा झाडी॥
बंधव पावणा आनंदलं माझं मन ।
सभेंत बसल माझा भीमार्जुन ॥ ९४७ ॥
बंधव पावणा शेजे तुला कां भरम ? ।
सभेंत बसला सहदेव धरम ॥ ९४८ ॥
पावणा मला आला शेजे तुला कां ग रंभा ?
जेवण करीतें गुळतूपसाखर आंबा ॥९४९॥
बंधुजी पावणा शेजी नारीला कसं कळ ?
माझा बंधुराया ढग आकाशांत गळें[6] ॥९५०॥
बंधव पावणा शेजी म्हणती कोण तुझा ?
आधीं भेटती दंडभुजा मग सांगीन बंधु माझा
उभ्या ग गलीं जातें कोण ग गलींनं गेली दोघं !
सया मजल्या पुशित्या भर्म माझ्या पाठीं माग॥
पावणा मला आला जीण खोगीर शेजी घरीं ।
पाठीचा माझा बंधु रुसला माझ्यावरी ॥९५३

---

१ किंवा २ री ओळ:-- "माझा बंधुराया गांवा गेलेला तुफ्यावाणी ॥"
२ किंवा:-- "माझ्या गांवाकड भिल्लाच्या भिल्लवाड्या ।
बंधवासंगतीनं लवअंकुशाच्या जोड्या ॥"
३ दृष्ट काढण्याकरिता. ४ झरा.
५ किंवा २ री ओळ:— "माझा बंधुराया हासत जोत चढी ॥"
६ पावसाप्रमाणे अचानक आला.

डोकं ठेवितें चरणावरी चल घराला आता तरी
वाकरी गांवच्या पारावरी कुणीं सांडला दवणा ?
माझा बंधुराया पट खेळला पावणा ॥९५४॥
साळीचे तांदुळ माझ्या आधणीं बोलत्यात ।
माझा बंधुराया वाट सरदार चालत्यात ॥९५५
पावणा मला आला बसाया टाकी चौरंगपाट ।
निखळ साळियेचा भात झारी बुडवी रांजणांत।
पिकल्या पानाचं तोडी देठ बंधु चुना काळे-
यीचा दाट ॥९५७॥
बंधुच्या भोजनाला जिरसाळीचा येळ भात ।
चूळ भरायाला चंद्रभागेचं उदयक ॥९५८॥
बंधु माझा ग पावणा माझ्या डुबळीच्या घरीं ।
साळीते तांदळाच्या दोन्ही आल्या बरोबरी ॥
बंधुजी पावणा करतें न्याहारीला डाळरोटी ।
मगरमाशासाठी मी का पुण्याला[1] धाडी चिठ्ठी ॥
मुंबअीचा मासा त्याला पुण्याचा मसाला ।
बंधु जेवाया बसला घोडनदीच्या तासाला ॥
दुरल्या देशीच्या पावण्याला दुरडी येळीतें
शेवयाची ।
माझ्या बंधवाला ओढ माघारीं जायाची ॥
बारिक शेवया दूध घालीतें निवाया ।
वाणीच्या बंधुराया बिगी बसावं जेवाया ॥९६३
आंब्याचा आंबरस ताटीं दिसे सोन्यावाणी ।
काय सांगूं बाअी माझ्या बंधूची मेजवानी ॥
पावणा मला आला आंब्याच्या दिसामधीं ।
म्यापल्या बंधवाला तूप वाढतें रसामधीं ॥
पावणा माझ्या घरीं शेजीला खुणवीतें ।
म्यापल्या बंधवाला लाडू बुंदीचे बनवितें ॥
घोडीला घासदाणा शिंगराला चारी मेवा ।
माझ्या बंधवाची शिंगी नाचती जागा नवा ॥
घोडीला घासदाणा घेतें खोबर किसुनी ।
सबर[3] तुझी शिंगी आली वडोद्यापासुनी ॥
सबर तुझी शिंगी पाणी पिअीना लवाळ्याचं ।
माझ्या बंधुजीचं म्हेर गांव जिव्हाळ्याचं ॥
घोडीला घासदाणा साखर मागते नुसती ।
ताअीत माझ्या बंधु माझी खेड्याची वसती ॥
सबर तुझी शिंगी नको डाळीची सव लावूं ।
खेडं माझं गांव वाणीउदमी कुठ पाहूं ? ॥

बहिणीच्या सासरचीं माणसें नेहमी तिच्या माहेरच्या माणसांचा ठेवावा तसा मान ठेवीत नाहीत तरीसुद्धा तिचा भाअू केवळ बहिणीसाठी म्हणून अपमान सोसूनहि तिच्याकडे येतो—

बहिणीचा भाअू झालाया पंडीत ।
बहिणीच्या जीवासाठी आला परगणा धुंडीत ॥
सोयऱ्या मनुष्याचें बोलणें तेंगाराचें ।
माझ्या बंधवाचें सदा येणें सरदाराचें ॥९७३
सोयऱ्याच बोल असडीतुसडी ।
अता माझा बंधु पासोडी पसरी ॥९७४
सोयऱ्याच बोल कडु लिंबायाची वाटी ।
माझ्या बंधुराया घोटावं बहिणीसाठी ॥९७५
सोयऱ्याच बोल जस दगडाच्या तोडी ।
बंधुला माझ्या ठावं मन माझं अेकमोडी[4] ॥९७६

लग्नानंतरहि आअीच्या खालोखाल बहीण जर कुणाजवळ आपलें सुखदुःख अत्यंत मोकळेपणाने सांगत असेल तर तें भावाजवळच. भाअुहि तिच्या सुखदुःखाशीं पूर्णपणें समरस होअून जातो——

पावण्याला पाहुणचार कालच्या काल केला । आपल्या बंधवाला गुजासाठीं होकारला ९७७

१ पुण्याच्या जवळच्या खेड्यांतील स्त्रीने ही ओवी म्हटली असल्याने मगरीसारखा मोठा मासा आणायला ती पुण्यासारख्या शहरांतच चिठ्ठी पाठवते.

२ किंवा १ ला चरण:— "सांगून धाडियितें" ३ सभार = गाभण.

४ किंवा २ री ओळ:— "घराला माझ्या येअीना बंधु माझा अेकमोडी ॥"

बंधव पावणा माझ्या जिवाला अुल्हास ।
गुज बोलायला सोप्या लावितें गलासें ॥९७८
चांदण्या रातीची बसलें हवेला ।
माझ्या बंधवाला चंद्रासारख्याला गुज बोलतें
भावाला ॥९७९
मनींचा पस्तावा म्यां रानांमधीं केला ।
बंधवानीं माझ्या रैजानं कान दिला ॥९८०
जिवाला जड भारी तरी मी पुसतें ज्याला त्याला
माझ्या भावानं कान दिला ॥९८१
सुखदुःखाअीच्या म्यां भरल्यात गोण्या ।
माझ्या बंधुराया खेपेला यावं वाण्या ॥९८२
माझें सुखदुःख तुला सांगतें बंधुराया ।
बयापरास तुला माया ॥९८३
सुख सांगतांना दुःख ठेवितें झाकुनी ।
हरस झालं मन माझं बंधुला देखुनी ॥९८४
माझं सुखदुःख बंधु सांगतें वाटचालीं ।
वाणीच्या माझ्या बंधु नेत्र भरलीं बस खालीं॥
बहिणीचा सासुरवास भाअू अैकतो चोरावाणी।
पाठीचा माझा बंधु औसें गाळितो मोरावाणी॥
९८६

अेका ओवींत मात्र लेकीच्या मायेपुढे भावाचें बहिणीबद्दलचें प्रेम फिकें पडतें असें सांगितलें आहे--

बहिणीच्या गांवा जाया भाअू सांगतो बारवडी । लेकीच्या गांवा जाया धुरीच बैल सोडी॥९८७

बहीण आपल्या सासरच्या जीवनांत पूर्णपणें अेक होअून गेली आणि मुल्हारी म्हणून भावाची भूमिका संपली, तरीहि पुढे बहीण-भावांचा संबंध कायम राहावा असा अेक संप्रदाय या जातींतून प्रचलित आहे. बहिणीचा मुलगा व भावाची मुलगी यांचा विवाह करून देण्याची प्रथा हिंदु समाजांतील पुष्कळच जातींत रूढ आहे. भावाने आपल्या घरीं वारंवार यावें म्हणूनच बहीण त्याच्या मुलीला आपली सून करून घेते. विशेषतः भावजय किंवा भावाची मुलगी या दोहोंबद्दलहि विशेष चांगले ग्रह नसतांनासुद्धा भावाला व्याही करण्याची कल्पना बहीण अंमलांत आणते त्यावरून तिचा हाच हेतु प्रमुख दिसतो—

अिवाअी करीतें मी आपल्या डमतीचा ।
माझ्या बंधवाच्या श्रीमंताच्या जमातीचा[१] ९८८
लगीन अुतरलं आंबा सोडून चिंचखाली ।
गांवांत वर्दी गेली बहीण भावाची विहीण झाली
तुझी माझी बोलाचाली चंदनबेलाखाली ।
पुशीत्या नगरनारी बहीण भावाची विहीण झाली?
बंधु इवाय करूं गेलें म्यां कां तुळशी दिला तक्या
माझ्या बंधुराया अून झाल्या बोल सख्या ॥
बंधु करीतें अिवाअी लअिंदी गाजत ।
गाड्यावरी रुखवत हंडा कडीचा वाजत॥९९२
अिवाय माझ्या दादा नको भिअूस करणीला।
सोनियाची सरी घालीन तुझ्या हरणीला॥९९३
माअू करीतें अिवाअी माचेबाअी तुझा बाप ।
पोळयाचं जेवण गांवाला देतें थाप ॥९९४
अिवाय करूं गेलें जोत्याखाली अुभी ।
ताअीत माझ्या बंधु तुला पित्याची सअी होती
सांगून धाडीतें वाअी देशाच्या अिवायाला ।
माझ्या बंधुराया कीड लागली शेवयाला ॥
घोडीला घासदाणा देती तोबरा शेवयाचा ।
माझ्या बंधुयाचा घोडा आबंड अिवायाचा ॥
बंधु करतें अिवाअी बाप म्हणे नको बाअी ।
आताच्या भावजया मान राखायाच्या नाहीं ॥
भाची करते सुन काम सांगायाची चोरी ।
सांगतें बंधु तुला परव्याची लेक बरी ॥९९९
बंधु करितें अिवाअी मीं न अेकल्या गोठीसाठी
येअील माझ्या घरीं तोही आपल्या लेकीसाठी ॥

१ हंडी. २ किंवा "हौशानं" ३ आसवें.

४ किंवा १ री ओळः— "वयाचा बाळराज कवळा फोक शेवंतीचा ॥"

भावावरील अमूल्य प्रेमामुळे बहीण त्याच्यावर ओव्या रचतांना नाना तऱ्हेचे गुण त्याला बहाल करीत असते. पुष्कळशा ओव्या वाचून तर असें वाटूं लागतें की हें प्रेम आंधळेंच असलें पाहिजे. कारण त्यांत त्याचे दोष सुद्धा गुण समजून त्यांचे गोडवेच गायलेले असतात. भावावरील अनेक ओव्या वाचून भावाचें चित्र तयार करायचें म्हटलें तर भाअू म्हणजे सौंदर्याचा पुतळा, सर्व कांही कलांमध्ये प्रवीण, श्रीमंत, शूर, धार्मिक, विद्वान् आणि अत्यंत आनंदी असा जीव—सर्व कांही गुणांचा सागरच असें दिसून येअील.

जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत वावरणाऱ्या भावाचें चित्र ओवींत रंगविलेलें सांपडेल. खेडे-गांवांतील लोकांची मुख्य संपत्ति म्हणजे त्यांची जमीन. भावाची श्रीमंती दर्शविण्याकरिता भावाच्या मालकीची जमीन पुष्कळ, त्याचीं शेतें पिकांनी भरलेलीं, त्याचीं गुरें अुत्तम, अशींच वर्णनें नेहमी सांपडतील. शेतावर भाअू म्हणजे अेक हौशी कार्यकर्ता असतो आणि शेतावरच्या माळ्याशीं (हा माळी म्हणजे ओव्यांतील अेक अत्यंत आवडतें पात्र दिसतें) त्याचा चांगला स्नेह असतो[1].

काय सांगूं बाअी बंधु माझ्याची नांदणूक ।
वाडा सुर्व्यासम्मुख रांजणीं गायमुख ॥१००१
थोरलं माझं घर घरासारखं कौल ।
माझ्या बंधवाचा कुणब्यासारखा डौल॥१००२
चल सया पाहूं माझ्या बंधुची नांगरट ।
शाळु बसलं काळेकीट[2] करडीबाअीचं पिवळं पाठ
हरभऱ्याला आला घट तुरीबाअीला शेंगा दाट
वाटवरी शेत त्यांत हरभरा हिरवागार ॥
आंत जवास जिणस्वार तुरीला आला भार ।
बंधु करडीला बोंड फार ॥१००५॥
शेताआड शेत मी शेताला कोणच्या जाअूं ।
पाठीच्या माझ्या बंधु बांधाला जाअी लाअूं ॥
पिकलं तुझं शेत दाण झाल खंडोपिंडीं ।
हालविल्या गाड्या म्होर शिंगोळ्या[3] मागं दिंडी
बारामतीचीं लोकं नट अूसाच्या चोयाला ।
माझ्या बंधवाच्या आंबा लोळत भुअीला ॥
वाटवरी शेत घ्या बायांनो होळांना[4] ।
माझा बंधुराया कुणबी भीडचा बोलना ॥

वाटवरी शेत घ्या बायांनो हुरडाअूस ।
माझा बंधुराया कुणबी पिकला राजवस ॥
वाटवरलं शेत नार झटते ताटाला ।
असा बंधुजी हटेला कास्या लावतो वाटला ॥
आंब्याची आंबराअी पाडाला झाली लाल ।
बंधु बोलतो बहिणी चौथाअी घे चलें[5] ॥
माझ्या बंधवाचा शेतीं नांगर वाघाचा ।
ताअीत बंधवाचा आहे आसूड तागाचा ॥
जाअीन शेताला अुभी राहीन बांधाला ।
किती हाका मारूं माझ्या नवतीच्या चांदाला॥
वाटवरील मळा चिमण्या बायानं शेकारला ।
भाअू बहिणीनं होकारला ॥१०१५॥
माळ्यानं केला मळा बंधुनं केल्या केळी ।
लिंबुणीला आळी करी पलाणीला सीताफळी ।
अुंच गेलीया नारळी ॥१०१६॥
हौशानं केली हौस बंधुनं केली बाग ।
ये ग सयाबाअी मला अंजीर तोडूं लागं[6]
॥ १०१७

१ ७७५ या मुलावरून गाअिलेल्या ओवीप्रमाणे खालीलप्रमाणे भावावरहि ओवी गायली जाते:—

"पिकलं तुझं शेतं मात गेली कोंकणांत ।
आता माझ्या बंधु घाल कातर लवणांत ॥"

२ जोंधळ्याचीं कणसें पिकून काळीं झालीं आहेत. ३ शिंग वाजवणारा. ४ सोलाणा.

५ किंवा १ ली ओळ:— "अुंबर पिकलं शेंड्या बुडख्याशी लालीलाल"

६ किंवा:— "माळ्यानं केला मळा बंधुनं बाग केली ।
पोटीचीं माझीं बाळं अंजीर तोडूं लागलीं ॥"

माळ्यानं केला मळा बंधुनं केली शारी[1] ।
भाअूपण्यानं बैल चारी ॥१०१८॥
पाटपाट पाणी पाटांत पडला पाय ।
सावळा बंधु माझा अूसाचा पेण लावी ॥
शिताळ सावली पळसपांगोऱ्याची ।
बंधवाची माझ्या खाली बैठक नांगऱ्याची ॥
गाड्यामाग गाड्या धटल्या अंधाराला ।
माझ्या बंधवाच्या किल्या गेल्या कंबरेला ॥
जोंधळ्याचा गाडा माळाला घेर घेतो ।
वाणीचा माझा बंधु गौळणीचा गळा गातो ॥
जोंधळ्याचा गाडा बैलाला गेला जड ।
माझ्या बंधुराया धन्या कासर सैल सोड ॥
गाडीच्या गाडीवाना गाडी जाअूं दे दमानं ।
माझ्या बंधवाची बंडी भिजली घामानं १०२४
पडत पाअूस फळी धरुनी अुमाठीं ।
ताअीत माझा बंधु सखा रासण्या दामटी ॥
पाणी भरत्या बाया पाणी भरूनी व्हा ग दूरी ।
बंधुच्या हिरीकड[2] चाफाचंदन दोहीकडे १०२६
पाणी भरत्या बाया तुम्हा देतें हारकी[3] ।
विसरून गेला बंधु दोन्ही धोतरं सारखीं ॥
हात मी जोडीतें [4]हिरीबाअी सवंदरीं ।
माझा बंधुराया सोनं तुझ्या त्या आवारीं ॥

बैलांचीं नांवं चाबूक चिंतामणी ।
माझा बंधुराया ताअीत त्यांचा धनी ॥१०२९
हलकेऱ्या बैलानं शिवारीं केला दंगा ।
धनी गांवाला गेला सांगा ॥ १०३०
बैल नंदी याचं चंद्रुवाणी पाअूल ।
ताअीत बंधवाचा माझ्या धन्याचा डौल ॥
पाळीच्या बैलाच कशानं डोळ लाल ?
बयाचं माझ्या बाळ पाळ हाणीत तान्हं बाळ ॥
बैलामधीं बैल गणग्या दूधप्याला ।
सडक लावून शेतीं नेला दीड खंडीचा पेरा केला ।
पाठीचा माझा बंधु माझा रासण्या दृष्टवीला ॥
येशीच्या येसकरा येस कोंडून केलं काय ?
बंधवानीं माझ्या बैलांमधीं नेली गाय ॥१०३४
पड मृगराजा पडून बरं केलं ।
माझ्या बंधवाच नंदी तासाला पाणी प्याल ॥
कितीक शिकवावं ग्यान गेल्याला ?
गोफाची साखळी केली दाराच्या बैलाला ॥
गायीला झाला गोऱ्हा म्हशीला झाली रेडी ।
वाणीच्या माझ्या बंधु घाल साप्याला बहुरकडी ॥
नेणत्या गुरराख्या काठी घोंगडी माळावरी ।
माझा बंधुराया गाया पांगल्या गोळा करी
॥१०३८

खेड्यांतील अितरहि महत्त्वाचीं कामें पुष्कळदा भाअू करीत असतो. अर्थात्च तो नेहेमी वरिष्ठांच्या मर्जींतला माणूस असतो—

तातगडीच्या[6] कामा आडवं लागलं हडपसर ।
बंधवाची माझ्या शिंगी निघाली चौड्यावर ॥
तातगडीच्या कामा आडवी लागली वागुल्कास ।
बंधवाची माझ्या शिंगी निघाली सवा कोस ॥
तातगडीच्या कामा आडवी लागली भवानपेठ ।
बंधवाची माझ्या शिंगी वाड्याला आली नीट ॥
तातगडीच्या कामा लोणी लागली कंदायाची ।
बंधवाला माझ्या चिरी शोभते गंधायाची ॥
गांवकीचं काम तुला आलय नागर ।

कुण्या हौशाची बिगार[7] संग दारुची घागर ॥
चल शिंगीबाअी अेवढ्या वारीला ।
माझा बंधुराया नवा निघाला स्वारीला ॥
चल शिंगीबाअी तुझं कुठवरी जाणं ?
माझ्या बंधवानं दिलं बडोद्यावरी ठाणं ॥१०४५
सबर तुझी शिंगी शिंगा झालाया वाघावार्घा ।
बंधुच्या स्वारीजोगा ॥१०४६
चल शिंगीबाअी गोंड तुझ्या चाबुकाला ।
माझ्या बंधवाला अून लागतं नाजुकाला ॥

---

१ कुंपण. २ किंवा १ ली ओळ:— "हातांत बेलतांब्या नार हिवड कुणीकड "
३ बक्षिस (हरकी). ४ विहीर.
५ किंवा "अरमानी" (नांव). ६ तातडीच्या ('ग' हें अक्षर ओवी गातांना घातलेलें दिसतें).
७ बिगारी काम. ८ अुतावीळ.

सममधीं अुभा माझ्या फुलाचा गजरा ।
माझा बंधुराज घाली सभला मुजरा ।। १०४८
वाकरी गांवच्या पारावर बसला लहानथोर ।
माझा बंधुराया वाकून घाली मुजर ।। १०४९
कावळा ग कुरुकुरुकाअी पिंगळा बोलला वाणी ।
चंदन ग बंधु माझा खेपेला ग गेला वाणी ।।
हजाराची घोडी त्यानं बाजाराला नेली ।
माझ्या बंधवाला दृष्ट हंबीराला झाली ।।१०५१
विसाअीची घोडी वर तीसाअीचं जीण ।
माझ्या बंधुराया माझ्या शिपाया कवळी शीण।।
पंचयिसाची घोडी तिला तिसाचा तोबरा ।
बंधूला देखून झाला वकील घाबरा ।। १०५३
शिपायाचा साज अखंड माझ्या घरीं ।
माझा बंधुराया पोलिसाच्या कामावरी ।।१०५४
आखुड बंदूक त्याला रुप्याची रंजक ।
बंधु जपून खेळ डाव तुझी कंवर नाजूक ।।
भरिला बाजार बारामती हवालदार ।
हौशा माझ्या बंधुनं पहिल्या बंदुकीचा केला वार।।
शिपाअी शिलेदार मुजऱ्याला गेला काल ।
बंधुच्या अंगावरी हमरावाजी शेला लाल ।।
तीनं[1] खंजीलाच्या पार्शी शिपायाचा पहारा ।
माझ्या बंधुराया माझ्या ओळखीच्या जमादारा ।।
अंघुळीला पाणी हंड्या शेजारी तपेल ।
माझा बंधुराया कणी अंघुळ वकीलें ।। १०५९[2]
पाअूस पाण्याच्या वाटा झाल्या चिखलाच्या ।
माझ्या बंधवाच्या गाड्या आल्या वकीलाच्या ।।
दिवाणांत गेला दिवाण तुला खुषी ।
मोहिनी माझ्या लालापार्शी ।। १०६१
सासवड गांवींच्या कचेरी कोण अुभ्यानं पानं खातं ?
माझा बंधुराया वकीलाला जाब देत ।। १०६२
दिव्याच्या चावडीवर समया जळती ढनूढना ।
बंधवाचा माझ्या वकीलाशीं माअूपणां ।।१०६३[3]

बदलत्या औद्योगिक परिस्थितीस अनुसरून खेड्यांतील कामकऱ्यांचें क्षेत्र जास्त व्यापक होत आहे. जमीन सोडून शहरांतील कारखान्यांत अुद्योग शोधण्यास आज शेतकरीवर्ग मरा-मर बाहेर पडत आहे. या नव्या जीवनावरहि थोडयाफार ओव्या रचलेल्या आढळतातः—

चालली गिरणबाअी चाल तुझी अवखळ ।
माझ्या बंधवाची बाजुवाल्याची तारांबळ ।।
गिरणीबाअीमधीं साच्याला साचा भिड ।
माझ्या बंधवाचा बाजुवाल्याचा शालु उड ।।
गिरणीबाअीमधीं कापुस आला शेवतीचा ।
बयाचं माझ्या बाळ बाजुवाला नवतीचा[4] ।।
हाकावरी हाका बारशीच्या लेका ।
गिरणीवरला माझा सखा ।।१०६७।।
आली आगिनगाडी दिसती आवोबावो ।
नगनारी भिअू आगवाला माझा भाअू ।।
आली आगिनगाडी दिसती काळीनिळी ।
बंधुनं ढासळली शिगनळा तुझी फळी ।।
आगिनगाडी आली हिचं अिंजिन फकाफका ।
अिंजिनमागल्या डब्यामधें बंधु बसला माझा सखा ।।१०७०।।
आली आगिनगाडी शिट्टी मारी ठेसणांत ।
आता माझा बंधु चाअीवाला कटिणांत[5] ।।
आली आगिनगाडी शिट्टी मारी जंगलांत ।
आता माझा बंधू पोटर बंगल्यांत ।।१०७२।।
पायांतील वहाणा कशानं झाल्या काळ्या ?
माझीया बंधुला हमालाला रातपाळ्या ।। १०७३

---

१ "तीन खंजील" हें बारामतीतील अेका चौकाचें नांव आहे.

२ किंवा:— "हौस मला मोठी हंड्याशेजारीं तपेल्याची ।
अंघुळ होती बंधुशेजारीं वकीलाची ।।"

३ किंवा १ ली ओळ:—"दिवाणवाड्या गेला दिवाणवाडा ढनुढना ।"

४ किंवा "शेवतीचा" व "नवतीचा" यांअैवजी अनुक्रमें 'पिवळा' व "कवळा" असेहि शब्द-प्रयोग मिळतात. ५ "कँटीन" या शब्दाचा हा खेडवळ अपभ्रंश असावा.

काय सायकिलीपरास मोटारी तुझी घाअी ?
बाअी ताअीत माझा बंधु नवा झाला डाअीवर ।।
मोटरीपरास बाअी सायकिली तुझी घाअी ।
ताअीत माझा बंधु बुटासकट टाकी पाय ।।
शेजारिणीबाअी घाल अुसने येलदोडे ।
ताअीत बंधु माझा यानीं मोटार उभी केली
माझ्या दारापुडे ।।१०७६।।
आलीया मुकादमी तुला असल्यापणांत[1] ।
माझ्या बंधुराया ठेव मनुष्य ध्यानांत ।।१०७७
भाअूच्या धक्क्याला आल पडाव गुलालाच ।
माझ्या बंधवाचं वर नांव दलालाचं ।।१०७८
नव्या गोदीमधीं कोळशाला आला भाव ।
हौशा माझ्या बंधु मुकादमा काटा लाव ।।
नव्या गोदीमधीं काटवाल्याची होटबाजी[2] ।
हौशा बंधवाला मुकादमाला दारु पाजी ।।
ममअी शहरामधीं आंब हप्पुसपायरी ।
आता माझा बंधु निघल व्यापारी बाहेरी ।।
नारिंग्याबाअीचा करंडा ममअीला जातो ।
सर्ज्या माझ्या बंधु कागदी लिंबू कोण खातो ?
।।१०८२

खालील ओव्यांत बंधु कुशल कारागीर आहेः—

शेता गेली खुरी पंचांग नाही घरीं ।
बंधु अंगींचा कारागिरी वाडा बांधिला चौखुरी ।
खांब काढिल कोथमिरी[3] ।।१०८३।।
गंवड्यापरास सुताराची कारागिरी ।
बंधुनं बनवला रथ कातीव कोथमिरी ।।१०८४
सुतारापरास गवंडी चढला भीतीवरी ।
माझ्या बंधवाच्या कंठी लालाच्या छातीवरी ।।
१०८५।।

गायन आणि चित्रलेखन या कलांत निपुण असलेल्या भावाचें कौतुक—

अुपर माडीवरी कोण हौशा गाणं गातो ?
हौशा माझा बंधु पेटी सुराची वाजवितो ।।
डफा गं वरी हात कोण मारी तो नवा नवा ?
मारितो नवा नवा बंधु शाहीर आला कवा ?।।
लावणीचा गळा मोडितो पाण्या जातां ।
माझा बंधुराज शाहीर गात होता ।।१०८८।।
गाणार गाणं गात बसना माझं चित्त ।
माझा बंधुराया शाहीर नाही त्यांत ।।१०८९।।
गाणार गाणार निघून चालल देशाला ।
माझ्या बंधुच्या डफसारंगी अुशाला ।।१०९०
किती गाणं गाशी गाणाऱ्याची दासी ।
तुझ्या गाणाऱ्याच गळे आहेत माझ्या बंधुपाशीं
गाणाऱ्या गाणाऱ्याच्या पडल्या पैनी ।
माझ्या बंधुनं जितल्या तुरवाल्याचर्‍यॉ[4] बहिणी ।।
सारविल्या भीती चित्र काढुनी चितागती[5] ।
नटव्या बंधुजीची घडुघडीला याद होती १०९३

शरीरसंपत्तींतहि भाअू कमी नाही. खालील ओव्यांतील भाअू पट्टीचा पोहणारा किंवा पहिल्या प्रतीचा पहिलवान आहे. कुस्ती हा खेड्यांतील लोकांचा अेक अत्यंत आवडता करमणुकीचा खेळ असल्याने कुस्तीच्या फडाचीं जिवंत वर्णनें ओव्यांत आहेत—

नीरेचा पोवणार करेला[6] नाही भ्याला ।
माझ्या बंधवानं नाही मंदील भिजूं दिला ।।

---

१ अितक्या लहान वयांत. किंवा पहिली ओळः—
"पाटिलकी आली तुला अेवढपणामधीं ।"

२ "होटबाजी"—निवडणुकीच्या वेळीं मतें मिळविण्याकरिता कुठल्या प्रकारांचा अवलंब केला जातो याची कल्पना या अशिक्षित स्त्रियांनाहि दिसते. ३ कोथिंबिरीच्या कातऱ्यांपानाप्रमाणे सुंदर नक्षी असलेले.

४ तुरा व कलगी असे लावणीचे दोन प्रकार आहेत. तुरा लावणी गाणाऱ्यांना तुरेवाले किंवा हरिदास म्हणतात व कलगीवाल्यांना नागेश म्हणतात. लावणीगीतांत अनादिकालापासून चाललेला प्रकृति व पुरुष यांच्यांतील झगडा वर्णिलेला असतो. कलगीवाले प्रकृति श्रेष्ठ मानतात व तुरेवाले पुरुष श्रेष्ठ मानतात. ५ चित्रकथी– पौराणिक कथांचीं चित्रें काढून त्यांच्या मदतीने कथा सांगणारे. ६ नीरा व करा– पुणें जिल्ह्यांतील दोन नद्या.

अंगांत अंगीरखा तुझ्या छातीला पिवळी माती
माझ्या बंधुराया तुला तालीम शोभा देती ॥
भरल्या बाजारांत कुठ ओळखूं मी चतुराला ।
माझ्या बंधवाच्या लाल हुरमुजे धोतराला ॥
लागली ठेच तिथ विमा कळ मारी ।
सांगतें माझे बाओ माझ्या बंधुचं बळ भारी ॥
मारवतीराया तुझ्या पायाला सोनं ।
दर्शनाला येती बंधु माझे पहिलवान ॥१०९८
मारवतीची सेवा नाहीं तुझ्यानं व्हायाची ।
सांगतें बंधु तुला माळ अेक्कीस दुर्व्यांची ॥
सांगून धाडीतें आल्यागेल्याच्या जवळी ।
बंधुची बैठक मारवतीच्या देवळीं ॥११००
वाघ मारिला वाघजाळीं ससा मारिला बाणांनीं ।
ताअीत बंधवांनी माझ्या पहिलवानांनीं ॥
शंभुच्या शिखरावरी पहिलवानाची झाली दाटी
माझ्या बंधवानं गोटी अुचलली धावलोटी[2] ॥
खारीक खोबअीर बंधु माझ्याअीचा मेवा ।
कुस्ती नेमिली कुण्या गांवा ? ॥११०३
कुस्तीच्या फडामधीं शिंग वाजवी गुरव ।
माझ्या बंधवाला होतो कुस्तीचा पेरवं[3] ॥११०४
कुस्तीच्या फडामधीं कुस्ती होअूं द्या झटक्याची
माझ्या बंधुराया घडी अुचल पटक्याची ११०५

या खेडवळ बहिणीला तर आपल्या शिकल्यासवरलेल्या भावाचें फारच कौतुक--

माझ्या घरचा घरधंदा चालला सदा नित ।
गिन्यानी बंधु माझ्या सोड पोथी देतें चित्त ॥
बहिणीभावंडाचा मेळा बसला ओसरीं ।
माझ्या बंधुराया पोथी वाचून दाव सारी ॥
अर बामणाच्या मुला नको कागदीं करूं चोरी ।
लिवणार माझा बंधु येणार तुझ्या दारीं ॥
शाळेंतल्या पंतोजीला देअूं केलं मीं वाटीलोटी ।
बंधवाला माझ्या लिवणं विंग्रजी यायासाठीं ॥

देवधर्म करण्यांत भाअू गुंतला आहे त्याचें कौतुक—

नाशिकीचा देव हौशा बंधूनं दाविला ।
शेंडीचा नारळ पंचवटीला वाहिला ॥१११०
काशीच्या पलीकड बनारशीला पायऱ्या ।
वाणीच्या बंधुराया चल तीर्थाला सोयऱ्या ॥
शंभुच्या शिखरीं बेलराणा झाला महाग ।
माझ्या बंधुराया कावड्या विगी नीघ॥१११२
भोळ्या शंभुदेवा मोळं तुझं देणंघेणं ।
माझा बंधुराया देअील दवण्यामधीं सोनं ॥
टाळ माझ्या घरीं भीव मृदुंग घेतें आता ।
माझा बंधुराया दिंडींत गेला होता ॥१११४
टाळ माझ्या घरीं देतें अिण्याला अिसारें ।
माझा बंधूराया माझा भजन्या हुशार ॥
१११५॥
नवरोजांची[6] नवरात नवरोजाच्या नवमाळा ।
म्यापल्या बंधवाला वरती बसवाळा ॥१११६
माझ्या दारावरनं गोसाव्याचा मेळा गेला ।
ठाअूक नाहीं मला माझ्या बंधूनं गुरु केला ॥
आली मरीबया तांब्यानं ताक प्याली ।
माझ्या बंधवाला गवळ्याला भाक दिली ॥
आली मरीबया शेताशिवरांत ।
माझ्या बंधुराया पाणी कोऱ्या घागरींत ॥
आली मरीबया रुतली चौचाकी ।
वाणीचा माझा बंधु धुरीच बैल हाकी ॥११२०॥
आली मरीबया सारा गांव तिला भ्याला ।
माझा बंधुराया गाडीवरनं म्होर गेला ।
थेसाचा तुरा त्यानं ल्येला ॥११२१॥

खालील ओव्यांतून वर्णन केलेला भाअू म्हणजे अेक अत्यंत आनंदी, चैनी आणि रंगेल

---

१ तालमीतील लाल माती.

२ किंवा २ री ओळ:— "माझ्या बंधवाला गोटी वळीची गेलो जड ॥" (गोटी = देवळांतील कौल पाहण्याचा दगड). ३ पेहराव.

४ किंवा "वाटीलोटी" व "यात्रासाठी" याअैवजी अनुक्रमें "खारीक व बारीक" असेहि शब्द-प्रयोग आढळतात. ५ पैसे ६ अेक स्थानिक दैवत.

प्राणी आहे. जीवनांतील सर्व तऱ्हेच्या विलासांचा पूर्णपणें अुपभोग घेणाऱ्या या भावाच्या रंगेलपणाचें आणि कांही वेळां दोषांचेंहि बहीण कौतुकच करते यावरून भावासंबंधी तिची भक्तिपूर्ण दृष्टि किती आंधळी असते हें दिसून येअील. केसांत फुलें वगैरे घालणें, विड्याने आपले ओठ रंगविणें किंवा तमाशांत भाग घेणें यांसारखीं खेड्यांतील हौशी माणसांचीं सामान्य लक्षणें तर या भावांत आहेतच परंतु त्याबरोबरच तांबुळिणीबरोबर रंगेल वर्तन आणि कैफ चढेपर्यंत दारू पिणें याहि गोष्टींचा अवलंब तो करतो आणि बहीण या सर्व गोष्टींचें कौतुकच गाते. खूप दारू पिअून झिंगल्यानंतर कांही ठिकाणीं त्याचा कैफ अुतरावा म्हणून जरी ती प्रयत्न करीत असली तरी प्रत्यक्षपणें ती त्याला मुळींच दोष देत नाही; अुलट त्याचें अप्रत्यक्षपणें कौतुकच करते.

या ओव्या खेडेगांवांतील लोकांच्या संस्कृतीचें व नैतिक जीवनाचें स्वच्छ प्रतिबिंब दाखवितात. खूप परिश्रम केल्यानंतर ज्या वेळीं खेड्यांतील कामकरी लोक जिवाच्या चैनीकरिता अेकत्र जमतात त्या वेळीं अर्थात्च शहरांतील सुसंस्कृत लोकांचे नीतिविषयक निर्बंध त्यांना लागू पडत नाहीत. विशेषतः पुरुषांच्या बाबतींत तर नीति-अनीतीच्या मर्यादा बऱ्याच सैल सोडण्यांत येतात. पानपट्टीच्या दुकानांत बसणाऱ्या बायका किंवा दारूच्या गुत्त्यांत कलालांना मदत करणाऱ्या स्त्रिया यांच्या रंगेल वर्तणुकीसंबंधीहि अुल्लेख कांही ठिकाणीं स्पष्टपणें दिसतात.

पुणं शहरामधीं पैशाचीं फुलं चार ।
बंधु गुलजार तुरा लेतो मजेदार ।।११२२।।
माझ्या अंगणांत बाअिसिकिलीचा साज !
ताअीत माझा बंधु रातीं आला चैनाबाज ।।
वाटनीं कोण येतो बनाव सुरतीचा ।
हिरा माझ्या गरतीचा ।।११२४।।
सांगत होतें तुला नको लेअूस गंधकाड्या ।
माझ्या बंधुराया तुला जायाचं राजवाड्या ।।
बहिरीससाणा सऱ्यां पांखराचा काळ ।
माझ्या बंधुराया हौशा माझ्या राघू पाळ ।।
दिवाणांत गेला वैऱ्याचीं तोंड फिकीं ।
बंधु माझ्या गुजराऱ्या विडा रंगला त्याच्या मुखीं·
पानाचा खातवणा याला सुपारी झाली थोडी।
बंधुच्या अिड्यामधीं लवंग ताल तोडी।।११२८
नागिलीबाअी तुला कोणीं नागविली ?
केशवबंधुनं रुमालीं वागविली ।।११२९।।
पानखातवण्या पानमळ्याला नाहीं वाट ।
वाणीऱ्या माझ्या बंधु नवती खुडाया आली दाट
पानखातवण्या तुझी अिळाची झाली किती ?
माझा बंधुराया पानमळ्याची घेतो खोती ।।
बाजिंदी अेवढी नार नसावी वाड्यामधीं ।
माझ्या बंधवाला कैफ चारील अिड्यामधीं ।।
तांबुळीणबाअी पानं कशीं हीं शेंकडा ?
पान खाणारा ठिकडा हातीं रुपया रोकडा[1] ।।
तांबुळीणबाअी पानं द्यावीं वीसनव ।
खाणार माझा भाव आणिक दोन लाव ११३४
तांबुळीणबाअी पानं पैशाचीं द्यावीं चौदा ।
माझा बंधुराया खाणार पोरसवदा ।।११३५।।
तांबुळीण भैना पडदा लाव दुकानाला ।
माझा बंधुराया राजा यायचा मुक्कामाला ।।
तांबुळिणीबाअी दुकानीं झोपीं गेली ।
माझ्या बंधवानं शेला टाकून जागी केली ।।
माझ्या दारावरनं लेजिम गेलं नवं ।
ताअीत माझ्या बंधु खेळ्या माझ्या बिगी जेव ।।
अंगींचा कबजा कशानं मळला ?
माझा बंधुराया रातीं लेजिम खेळला ।। ११३९
शेजी आअीबाअी अुसना घाल मेवा ।
माझ्या बंधवाचा राधवाल्याचा आला जेवा ।।
सावळी सुरत पहाया जातें मी धावत ।
माझा बंधुराया आला गोंधळी गांवांत ।।
बारीक शेवया रूमालीं झाला भात ।
आता माझ्या बंधु नाटकीं झाली रात ।।११४२
चिठ्यावरी चिठ्या किती टाकूं टपालांत ?
माझ्या बंधवाचा अुभा तमाशा नाटकांत ।।

---

१ किंवाः— "शेकडा" याअैवजी "शंभर" व २ री ओळः—
"पान खाणार सुंदर बारा वर्षांची अुंबर"

तमाशा तमाशा रातीं तमाशा कुठ झाला ?
बयाचं माझ्या बाळ माझा ढोल्या दष्टवीला ॥ ११४४

कलालिणीबाओी तुझा कलालवाडा रुंदु ।
बंधु कैफानं केला धुंदु ॥ ११४५

कलालिणीबाओी दारू मरली वाटीलोटि ।
माझा बंधुराया दादा कैफांत सांगी गोठी ॥

कलालिणीबाओी नको करूं कलाकलां ।
बंधु दारूचीं मापं प्याला त्याचा अुतार सांग मला ॥ ११४७

सर्वसाधारण स्त्रियांसंबंधी भावावरून गातांना बहिणीची तीच कौतुकपूर्ण दृष्टि दिसून येते. भावाचें रूप आकर्षक असून तो सगळ्या स्त्रियांचें चित्त वेधून घेतो आणि यांत नखरेल स्त्रियाच येतात असें नाही तर कुलीन स्त्रिया पण येतात अशा कल्पना खालील ओव्यांत आहेत. सौंदर्य व गुण या बाबतींत सर्व स्त्रियांवर भावाचें वर्चस्व कायम ठेवलेलें आहे. पुष्कळदा भावाला भावडेपणाच्या बुरख्यांत ठेवून अितर स्त्रियाच त्याचें मन आकर्षून घेण्याचा प्रयत्न करतात असें दाखविलें आहे. परंतु कांहीं ठिकाणीं भाअूहि नखरेल स्त्रियांच्या वर्तनास अुत्तेजन देतो हें स्पष्ट दिसतें. अकुलीन स्त्रियांबरोबर गैरसंबंध तो ठेवतो. अेका ओवींत तर अेका वेश्ये-बरोबर संबंध ठेवण्यास बहीण भावाला स्पष्टपणें अुत्तेजन देत आहे. खेड्यांतील वेश्याव्यवसाया-वरचे अुडते अुल्लेख कांहीं ओव्यांत दिसून येतात—

"पाणी भरत्या बाओी वरल्या नओीचं नांव काये ?
"हातांत छत्री तुमच्या बोलण्याची चतुराये ॥

तुला झाली दृष्ट पाणी भरत्या बायाची ।
बगलेला धोतर सव नदीला जायाची ॥ ११४९

गांवाला गेला कुण्या खरं सांग सखीबाओी ।
कुणी होकारिला मनमोहन शिपाओी ? ११५०

संगत कर नारी शिण पाहुनी कवळी ।
माझा बंधुराया लिंबं झाडाला पिवळीं ? ११५१

सावळ्या सुरतीसाठी नार धुंडीतें बंदर ।
माझ्या बंधवाची सुरत लालाची चंदर ११५२

सावळ्या सुरतीकड नार बघती भरभरा ।
माझा बंधुराया कवळा राजीगरा ॥ ११५३

गांवकीचं काम तुला वाओीची वसती ।
डोओीला गंगवान नार बाजिंदी पुसती ॥ ११५४

चंचाळ नारीची हिची नजर चळली ।
बंधुला देखून डाळ दुधांत येळिली ॥ ११५५

चंचाळ अेवढी नार चंचाळ तिचा थाया ।
बंधुच्या संग जाती अमरावती पहाया ॥ ११५६

चांगुल अेवढं पण नसावं पुरुषाला ।
माझ्या बंधुसंगं नार निघाली अुरुसाला ११५७

बाजिंद्या नारीनं अूस मोडला कवळा ।
लाजिक लवाळा रश्शी मरूं दे सावळीं ११५८

मौनानारें रड मोत्यांच आसू पड ।
बंधु माझ्या पाठीचा दिल्लीच्या पलीकड ॥

बारनच्या कड मौनानार धुणं धुती ।
माझ्या बंधूला पुसती जानीला वर्सं किती ?
"जानीला वर्सं बहु खाली बघुन धुणं धुअू" ॥

चिकणी सुपारी अडकित्यानं दाटली ।
माझ्या बंधवाला नार वाण्याची बाटली ११६१

गांवाला गेला कुण्या बंधु माझा कारकून ।
येडी झाली भोरपींणें ॥ ११६२

संगतीच्या गुणा वनामधीं दोघं ।
सोडी धोतराच सोग बंधु नारीच्या मनाजोग ॥ ११६३

तातगडीच्या कामा आडव लागलं चांदनांदें ।
बंधूच्या खीशांमधीं कुण्या नारीचा नथ गेंद ?॥

गांवाला गेला कुण्या बंधु माझा राओीरंध ?
त्याला नारीचा मोठा छंद ॥ ११६५

---

१ किंवा २ रा चरण:— "तुझा कलाल कुठं गेला ?"
२ भावाचा प्रश्न. ३ बायांचें अुत्तर. ४ कवळा अूस, लवाळा, सावळा हे सर्व भावाला अुद्देशून.
५ मोहनाराणी. छेलवटाअू व मोहनाराणी यांच्या कहाणीवर रचलेल्याहि कांहीं ओव्या मिळतात.
६ बहुरूपीण. ७ गांवाचें नांव.



अनुक्रमणिका

लावणीचा गळा मोडीतो मोडना ।
छंद राधेचा सोड ना ॥११६६
जातीची कळवातीण भल्याभल्याला होअीना राजी ।
बंधुनं माझ्या जातां जातां केली ठकबाजी ?
भोग भोग नारी माझ्या बंधूची नवती ।
पलंगाभोंवती जाअीमोगरा शेवती ॥११६८
धुंदधुंद नारी तुला धुंदाअी चढली ।
बंधूच्या पलंगावर रातीं जागल घडली ॥११६९.
बाजिंदी अेवढी नार कवाडा देती थाप ।
आता माझ्या बंधूची श्रीमंताची पहिली झोप ॥
आअीन्याची नारी पअीन्याला लावी ध्वजा ।
माझ्या बंधवानं रंग अुडवीला तुझा ॥११७१
काळी कळवातीण वाड्याला येती जाती ।
आता माझा दादा घरीं नाहीं सांगूं किती ? ॥ ११७२
काळी कळवातीण अंगणीं लावी ध्वजा ।
आता माझा बंधु नारीपाशीं माग रजा ॥
चंचाळ नारीच्या हिच्या वाड्याला नाही रीव ।
आता माझ्या बंधु चंपाळा बिगी नीघ ॥११७४
काळी कळवातीण रुपये रातीच घेती दोन ।
आता माझ्या बंधु जातीची होती कोण ? ॥
भोग्यानं भोगिल्या वाटेच्या कारीबोरी ।
बंधुनं भोगिल्या सवाषिणी नारी ॥११७६॥

भाअू व बहीण यांच्या परस्परविषयक भावना दर्शविणाऱ्या ओव्या अशा तऱ्हेने शेकडेवारी मिळतात. दोन बहिणींमधील परस्परभावना व्यक्त करणाऱ्या ओव्या मात्र फार थोड्या मिळतात. यांतील बहुतेक धाकट्या बहिणीवरच रचलेल्या असतात—

जिवाला देतें जीव प्राणागळं कुठ ठेवूं ?
माझी मायाबहीण गळ्याला गळा लावूं ॥
अग अंतराचं गुज गुज ग बोलाया सकअीली
अग माझी ग मायाबहीण तुझी ग परास धाकली ॥११७८॥
जिवाला जड भारी माझी दुखतीं नखबोटं ।
पाठीची मायाबहीण कळवेदना[2] गेली कुठ ॥
भूक लागली पोटाला त्यां तर तहान सांगितली
पाठीची मायाबहीण खुणला पोचली ॥११८०
हासत बोलण्याचा जनालोकाला येतो राग ।
माझी मायाबहीण मला पडून गेला राग ॥
गाणाऱ्यापरास साथ देणारा हरबाशी ।
मायाबहिणीये किती सांगूं गळा राधेचा चवरशी
बारीक तुझा गळा माझ्या गळ्याला लावणी ।
माझी गवळण आण सारंगी जाअूनी ॥११८३
पाअूस पडतो फळी धरूनी कोंकणी ।
माझी मायाबहीण वाणीण भिजली दुकानीं ॥
वैरायाळ्या दादा तुला जायाचं कोठवरी ?
माझी मायाबहीण तुला भेटल वाटवरी ॥११८५
बाळफटी चोळी तुझ्या अंगाला दाटली ।
पाठीची मायाबहीण शिव राधानं गांठली[3] ॥
बाळफटी चोळी तुझ्या अंगाला आली कशी ?
पाठीची मायाबहीण बोलूं नको कुणापाशीं ॥
आगाशी वावडी चंग लावून सोडीयिली ।
माझी ती बहिणाबाअी दूरल्या देशीची अंतरली[4]
सांगून धाडीतें चिचेच्या पानावरी ।
माझी मायाबहीण कुकु शोभत भेणावरी ॥
सांगावा धाडीतें अेवढा सांगावा जाअूं राहूं ।
माझी मायाबहीण आडवळणी तुझं गांव ॥
भाजीमधीं भाजी भाजी घेती पालकाची ।
माझी मायाबहीण पावणी मला आली वाअी देश तालुक्याची ॥११९१
सासुरवासानं कांकणं झालीं ढिलीं ।
पाठीची मायाबहीण अशीलजात मली ११९२

---

१ ९३७ ही मुलावरून गाअिलेली ओवी वहिणीवरूनहि रचलेली असते:—

"हासत बोललें तुला खरंच वाटलं ।
माझी मायाबहीण पाणी नेतरा दाटलं ॥"

२ बहीण हीच जणुं कळवेदना.

३ किंवा :— "माझ्या अंगाची चोळी मायाबहिणीच्या अंगा आली ।
शिव राधानं गांठली ॥"

४ ओवीतील अुपमा फार सुंदर आहे. पतंगाला दोरी लावली कीं आकाशांत तो केव्हाच दूर अुडतो. आपली बहीण लग्नानंतर तशीच आपल्याला दुरावली.

# ग्रंथसंपादन

(लेखक— श्री. ग. वा. तगारे)

म. सा. पत्रिकेच्या मागील अंकांतील[1] 'संहिताचिकित्से'वरील लेख संस्कृत, प्राकृत व मराठींतील ख्यातनाम संशोधक-संपादकांना आवडलेला दिसतो. भाण्डारकर अिन्स्टिट्यूटनर्फे प्रसिद्ध होणाऱ्या महाभारताचे प्रमुख संपादक डॉ. सुखटणकर लिहितात[2]—"You are doing very useful work indeed in spreading the knowledge of "saṁhitā-cikitsā" among the literati of Mahārāṣṭra who are as a rule sadly ignorant of the subject." त्यानंतर त्यांनी मागील लेखांतील परिभाषा व अुदाहरणें यांतील अेकदोन दोष दाखवून[3] या विषयासंबंधी आपण कांही लिहिलेले लेख पाठवून दिले. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांतील प्राध्यापक डॉ. अुपाध्ये यांनी हा विषय मराठींत नवीन असल्यामुळे मीं याची चर्चा अधिक सविस्तर करावी असें सुचवलें आहे[4]. याशिवाय संहिताचिकित्सेच्या तात्त्विक चर्चेपेक्षा प्राचीन ग्रंथ संपादन करतांना काय काय करावें याबद्दल मीं कांही विधायक सूचना कराव्यात असें अेक मत आहे. माझा लेख आस्थेवाअीकपणें वाचून त्याबद्दल मतें, सूचना, सुधारणा कळविणाऱ्या सर्वांचा मी आभारी आहें.

प्रथमतः मी संहिताचिकित्सेच्या अुरलेल्या अंगांचा विचार करून ग्रंथसंपादकांनी मुख्यतः कोणकोणत्या गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे त्यांचें संक्षिप्त दिग्दर्शन करीत आहें.

मागील लेखांत वर्णन केलेल्या पद्धतीने मूल-संहिता ठरवतांना पाठभेददर्शक प्रती (variant bearers)मधून कोणता पाठ स्वीकारावा असा प्रश्न पडतो. पूर्वानुभवावरून बसलेला आडाखा असा आहे की संहितानिश्चिति करतांना अधिक अवघड पाठ स्वीकारावा. याला शास्त्रीय परिभाषेंत Lectio difficilor (कठिनतर पाठ) स्वीकार असें म्हणतात. हा

---

१ म. सा. पत्रिका जुलै १९४२, पृ. २५९-२६६.

२ दिनांक २८ ऑगस्टचें पत्र.

३ डॉ. सुखठणकरांच्या मतें 'Haplography' याला 'अक्षरलोप' हा तितकासा समर्पक प्रतिशब्द नाही. तसेंच पृ. २६२ वरील (३) मधील अुदाहरणांत शब्द केवळ तोडले गेले नसून त्यांत आणखी बदल झाला आहे. प्रस्तुत विषय नवीन असल्यामुळे त्याची परिभाषा निश्चित झाली नाही व ज्या वेळीं भाषाशास्त्रांत येणारे पारिभाषिक शब्द मी जमवीत असतां 'Haplology'ला 'समानाक्षरलोप' हा शब्द वापरावा असें वाटून संहिताचिकित्सेला निराळा—जरा व्यापक—शब्द वापरला गेला. दासबोधाच्या हस्तलिखित प्रतींचे पाठ तपासतांना शब्द नुसते तोडले गेल्याचें अुदाहरण न आढळल्यामुळे अगदी किरकोळ बदल झालेलीं अुदाहरणें मीं घेतलीं आहेत. प्रस्तुत लेख बारकाअीने वाचून सुचवलेल्या सुधारणांबद्दल मी डॉ. सुखठणकरांचा आभारी आहें.

४ दिनांक ३०-८-४२ चें पत्र.

अनुक्रमणिका

पाठ ओखादा जुना प्रयोग, अपप्रयोग अथवा आज अुपयोगांत नसलेली वाक्यरचना असेल. अुदाहरणार्थ, महाभारताच्या आदिपर्वांत (१.५७.२१) पुढील श्लोक आहे —

भगवान् पूज्यते चात्र **हास्यरूपेण शंकरः** ।
स्वयमेव गृहीतेन वसोः प्रीत्या महात्मनः ॥

या श्लोकांतील जाड टशांतील शब्दांबद्दल पुढील पाठभेद आढळतात. (अिंग्रजी संक्षेप महाभारताच्या निरनिराळ्या हस्तलिखितांचे द्योतक (siglum) आहेत.

| | | |
|---|---|---|
| N ($K_1$ खेरीज) | हंसरूपेण | } शंकरः ($B_5$ Dn. चेश्वरः) |
| $K_1$M (= स्वीकृत पाठ) | हास्यरूपेण | |
| TG | यष्टिरूपेण | वासवः । |

राजा अुपरिचरवसु अिंद्राच्या विनंतीप्रमाणे तपश्चर्या सोडून चेदि देशावर राज्य करण्यास कबूल झाल्यावर अिंद्राने त्याला कांही देणग्या दिल्या त्यांत बांबूची काठी होती. त्यामुळे बांबूच्या काठीला फुलांच्या माळा, पताका अि. लावून तिची पूजा करण्याची चाल पडली व भगवान् अिंद्राने वसुराजावरील प्रेमाने हें रूप धारण केल्याने ही अिंद्रपूजा होय असें महाभारतकारांना म्हणावयाचें आहे.

अुपलब्ध असलेल्या पाठांत हा कठिनतम असल्यामुळे स्वीकारला गेला व या पाठस्वीकारानंतर नेपाळमध्ये सांपडलेल्या ८०० वर्षांपूर्वीच्या महाभारताच्या सर्वांत जुन्या हस्तलिखितांत हाच पाठ आढळून ज्या तत्त्वावर हा पाठ स्वीकारला गेला त्याची सत्यता प्रचितीस आली.

सुलभतेकडे असणाऱ्या मानवी प्रवृत्तीमुळे लेखकाला प्राचीन रूपें वा रचना बदलून अधिक अर्वाचीन रूपें वापरण्याचा मोह साहजीकच पडतो. प्राचीन मराठी ग्रंथांत अर्वाचीन रूपें आढळण्याचें हें अेक कारण आहे.

पण कठिनता हा पाठस्वीकाराची केवळ अेकच कस नव्हे, कारण लेखकाच्या चुकीने मूळ ग्रंथांतील शब्द अुतरत असतां दुर्लक्षामुळे वा हस्तदोषामुळे मूळ पाठापेक्षासुद्धा विचित्र व अवघड पाठ निर्माण होणें शक्य आहे.

पाठस्वीकार हा वैयक्तिक अिच्छेचा प्रश्न नसून व्यक्तिनिरपेक्ष पुराव्याची—हस्तलिखितावरून शाबीत होणारी— गोष्ट आहे. त्यासाठी त्या ग्रंथाचीं निरनिराळीं हस्तलिखितें, त्यांच्या परंपरा व आवृत्त्या, यांचा परस्परसंबंध लक्षांत घेणें जरूर असतें. अशा व्यक्तिनिरपेक्ष पुराव्याने (objective evidence) ठरणारा पाठ व्याकरणदृष्ट्या अशुद्ध असेल, काव्यदृष्ट्या रसहीन असेल, पण तो लेखी पुराव्याने ग्रंथकाराचा ठरल्यास तो शुद्ध करण्याचा संपादकास अधिकार नाही.

डॉ. सुखटणकरांनी वरील श्लोकांत 'हास्यरूपेण शंकरः' हा पाठ कां स्वीकारला तें पाहूं. या पाठांतील 'शंकरः' शब्द अुत्तरेकडील संहितेंत असून महाभारताच्या मल्याळम् आवृत्तींत आढळतो. याचा अर्थ असा की तामील-तेलगुविभाग सोडल्यास (कारण त्यांचा पाठ अजिबात भिन्न 'वासवः' आहे) काश्मीर ते मलबार व गुजरात ते बंगालपर्यंत आढळणाऱ्या महाभारताच्या पोथ्यांत 'शंकरः' हा पाठ आहे. 'चेश्वरः' पाठ १७व्या शतकांतील टीकाकार नीलकंठ याच्या सदोष पोथींतील असून त्याला अेका महत्त्व नसलेल्या बंगाली प्रतीचा आधार

आहे. यावरून 'चेश्वरः' हा मूळ पाठ नसून 'शंकरः' असावा ही गोष्ट स्पष्ट होते. कारण जिचा सदोषपणा सिद्ध झाला आहे अशा पोथीचा पुरावा अखिल भारतांत आढळणाऱ्या भिन्न परंपरेच्या पोथ्यांतील पाठापेक्षा ग्राह्य धरणें अव्यवहार्य होअील.

अुरलेल्या पाठांपैकी— 'हास्यरूपेण', 'हंसरूपेण' व 'यष्टिरूपेण' पैकी शेवटचा पाठ अर्थदृष्ट्या सोपा असला तरी TG पोथ्यांपेक्षा अधिक विश्वसनीय ठरलेल्या मल्याळी पोथींत दिसत नाही आणि लेखनदृष्ट्या 'यष्टि'बद्दल 'हास्य' किंवा 'हंस' गैरसमजाने लिहिलें-वाचलें जाणें शक्य नाही. पुढे दाखविल्याप्रमाणे TG पाठ हा मूळपाठाचें रूपांतर (paraphrase) आहे. अुरलेल्या पाठांपैकी 'हास्य' कीं 'हंस' या शब्दांपैकी हास्य शब्द $K_1$ M या प्रतींत (व नवीन अुपलब्ध झालेल्या नेपाळी प्रतींत) आहे व 'हंस' शब्द ($K_1$ खेरीज) N प्रतींत आहे. याचा अर्थ असा की अुत्तर व दक्षिण या स्वतंत्र संहितापरंपरेंत 'हास्य' शब्द आढळत असल्यामुळे मध्यविभागांतील अुपसंहितेंतील (sub-recension) 'हंस' शब्दापेक्षा अधिक स्वीकारार्ह आहे. 'हंस' व 'हास्य' यांत अर्थदृष्ट्या 'हास्य' हा पाठ अवघड असल्यामुळे व 'हंस' या शब्दास अनेक अर्थ असल्यामुळे कुठला तरी अर्थ जमेल या अपेक्षेने (डॉ. सुखठणकरांनी डेक्कन कॉलेज रीसर्च अिन्स्टिट्यूटच्या बुलेटिन वर्ष १ अंक १ पृ. ५-६ मध्ये दाखविल्याप्रमाणे 'हंस'चा कुठलाच अर्थ जमत नाही) 'हास्य'चें कोणातरी लेखकाने 'हंस' केलें अन् लेखकाने केलेल्या सुधारणेने वस्तुतः पाठ सुधारत नसून तसा आभास निर्माण होतो. 'हंसरूपेण' या शब्दाचें थेट तसेंच झालें आहे.

सारांश, अंतःप्रामाण्य आणि हस्तलेख्यादि पुराव्यावरून 'हास्यरूपेण' हा पाठ सिद्ध होतो. व महाभारताच्या (त्या वेळीं अनुपलब्ध असलेल्या) प्राचीनतम नेपाळी राजगुरु हस्तलिखिताने हाच पाठ खरा आहे असें दाखविलें आहे. महाभारताचा प्राचीनतम टीकाकार देवबोध हाच पाठ स्वीकारतो. व 'मजेदार स्वरूप'– 'क्रीडावतार रूप'– असा त्याचा अर्थ देतो. TG हस्तलिखितांनी हा विवाद्य प्रयोग टाळून 'यष्टिरूपेण वासवः' असें शब्दांतर (paraphrase) केलें[1].

मूळ पाठ ठरवितांना किती विचार करावा लागतो याचें अेक अुदाहरण म्हणून ही चर्चा केली. महाभारताच्या तोडीची कुठल्याच मराठी ग्रंथाची चिकित्सित संहिता मला अुपलब्ध झाली नाही म्हणून मी त्या संस्कृत ग्रंथाचं अुदाहरण घेतलें आहे.

या प्रश्नाशीं संबद्ध पण संहिताचिकित्सेंतील अेक अत्यंत अवघड व जिकिरीचा प्रश्न म्हणजे ग्रंथांतील विसंगतीची किंवा अपूर्णतेची ग्रंथकार व लेखक यांमधील विभागणी. स्वलिखित (auto-graph) अुपलब्ध नसेल तर लेखकाने अनिच्छेने केलेल्या चुका व ग्रंथकाराचे हस्तदोष (slips of the pen) किंवा अज्ञानजन्य वैगुण्यें यांतील भेद ओळखणें अवघड आहे. पण स्वलिखितावरून किंवा अितर विश्वसनीय पुराव्यावरून ग्रंथकार अशुद्ध शब्दप्रयोग वा वाक्यरचना करीत असेल तर ते जसेच्या तसे ठेवले पाहिजेत. मराठींत प्रसिद्ध होत असलेलें प्राचीन किंवा मध्यकालीन वाङ्मय 'शुद्ध' करण्याची जी खोड आढळते ती आक्षेपार्ह आहे. मला तुकारामांच्या शब्दांत तुकाराम किंवा रामदासांच्या भाषेंतील रामदासांचे बोल हवेत.

---

१ या प्रश्नाची सविस्तर चर्चा Annals of the Bhandarkar Institute XVI P.100 ff व Bulletin of the Deccan College Research Institute I. 1. pp. 1–7 मध्ये केली आहे ती जिज्ञासूंनी मूळावरून पाहावी.

१९ व्या किंवा २० व्या शतकांतील कोणत्याहि शास्त्री पण्डितांनी त्यांच्या नांवांवर भेसळ केलेली– 'शुद्ध केलेली'– भाषा नको. हे शब्द मी भावनेच्या भरांत लिहीत नसून भाषाशास्त्राच्या शुद्ध भूमिकेवरून लिहीत आहें. कोणताहि पण्डित कितीहि व्युत्पन्न असला तरी तो आपल्या शब्दांत प्राचीन संतांचें व्यक्तिमत्व निर्माण करूं शकत नाही, आणि तें करूं शकला तरी त्याला तसें करण्याचा अधिकार नाही. भगवद्गीतेंत वेदभाषेंतील रूपें किंवा वेदभाषेंत भारतयुरोपीय रूपांची भेसळ करून ती 'शुद्ध' करण्याच्या प्रयत्नासारखें तें दोषास्पद व हास्यास्पद आहे.

शिवाय विद्वत्तेबद्दल तिरस्कार दाखविणाऱ्या लोकांवर संस्कृतज्ञतेचा वृथा आरोप करून त्यांच्या मोठेपणांत भर पडत नाही. व 'चिकिछा', 'संवसार' किंवा 'राज्या' या शब्दप्रयोगांतून व्यक्त होणाऱ्या भाषिक प्रवृत्तींचे पुरावे निष्कारण नाहीसे केले जातात.

वरील विवेचनावरून संहिताचिकित्सेंत पाठशुद्धीला (Emendation) स्थान नाही असा अर्थ नव्हे. पण याबद्दल दोन मतप्रणाली आढळतात : अेक परंपरागत पाठांना चिकटून राहून मूळ पाठ मिळाला नाही तरी निदान त्याचा परंपरागत चालत आलेला वारस परवडला पण आधुनिक संपादकांचें कल्पित शुद्धीकरण (conjectural emendation) नको असें म्हणते. कुंटे, माडगांवकर, राजवाडे, आठल्ये यांच्या ज्ञानेश्वरींतील पाठ पाहतां त्रिचाऱ्या ज्ञानेश्वरांचा आवाज कोठल्या कोठेच विरून जातो. हें विधान मराठीपुरतेंच मर्यादित नसून संस्कृत-प्राकृत ग्रंथांच्या आवृत्त्यांनाहि लागू पडतें.

दुसरी मतप्रणाली शंकास्पद पाठांचें शुद्धीकरण करावें असें प्रतिपादते. पण असें करतांना अंतर्बाह्य प्रमाणांचा विचार करावा लागतो. परंपरागत पोथ्यांमध्ये अेखादा पाठ निरर्थक, अर्थहानिकारक, संदर्भशून्य, निष्कारण पुनरुक्तिकारक, ग्रंथकारास प्रिय असलेले प्रयोग वा अितर वैशिष्ट्यांस सोडून असला किंवा त्यांत विचारविसंगति असली (मग त्यांत वृत्तदोष, यतिभंग असो वा नसो) अंतर्गत प्रामाण्याच्या दृष्टीने तो पाठ संशयास्पद होतो, व तो शुद्ध करतांना अर्थ, संदर्भ, तत्कालीन व्याकरण, ग्रंथकाराची भाषाशैली, वृत्तरचना अित्यादि गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें. मीं मागील लेखांत वर्णन केलेल्या पाठभेदाच्या कारणांपैकी कोणत्यातरी कारणाने समोर असलेला पाठ रूढ झाला असें दाखवतां येत असेल तर palaeography किंवा ध्वनिसाम्याच्या पुराव्यावरून सिद्ध होणारा पाठ बाह्य संभवनीयतेचें (extrinsic probability) अुदाहरण होअील.

अंतर्बाह्य प्रमाणांवरून योग्य ठरलेली सुधारणा निरनिराळ्या पाठभेदांचे लेखनपद्धतिदृष्ट्या योग्य समाधान करणारी असल्यास ती पाठशुद्धि मूलपाठ म्हणून स्वीकारण्यांत यावी. पाठशुद्धीच्या दृष्टीने अंतर्बाह्य प्रमाणांत फरक पडल्यास अंतःप्रमाण श्रेष्ठ आहे. A good critic must be something more than a mere palaeographer या दण्डकाचा हा भावार्थ आहे.

मराठींत वैयक्तिक ग्रंथकारांच्या संहितांशीं संबंध आल्यामुळे महाभारत-रामायणादि पौराणिक संहितांप्रमाणे अनेक लोकांनी निर्माण केलेल्या संहितांतील गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण होअूं नयेत अशी अपेक्षा आहे. तसेंच मराठींत लघुसंहिता (Textus simplicior) व बृहत्संहिता (Textus ornatior) असलेले ग्रंथ नसल्यामुळे आपलें काम अधिक सुलभ आहे. डॉ. सुखठणकरांसारखे मुरब्बी संपादक केवळ नाअीलाज म्हणून पाठशुद्धीच्या फंदांत पडतात (७०००–

१ म. सा. पत्रिका, जुलै १९४२, पृष्ठें २६०-२६२.

८००० श्लोकांच्या आदिपर्वांत फक्त ३६ ठिकाणीं त्यांनी पाठशुद्धि केली आहे). ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

## संदर्भ-निश्चिति

डॉ. कत्र्यांनी आपल्या Introduction to Indian Textual Criticism या पुस्तकांत उल्लेखलेलें ल्यूडर्सकृत Die Sage von Ṛṣyas'ṛnga मला पाहावयास मिळालें नाहीं आणि आपल्याकडील ग्रंथांचे समाधानकारक रीतीनें चिकित्सित संपादन झालें नसल्यामुळे या विभागासंबंधी लिहिण्याची वेळ आली नाही हें त्यांचें मतें मला मान्य असलें तरी या विषयावरील माझी कल्पना मी कांहीं अुदाहरणें घेऊन थोडक्यांत मांडत आहें.[1]

महाभारत व रामायण यांचे संबंध बरेच गुंतागुंतीचे असून त्यांवर याकोबी, हॉप्किन्स, विंटरनिट्झ, सुखटणकर वगैरे विद्वानांनी बरेंच लिहिलें आहे. तेव्हा त्या प्रश्नांत न शिरतां महाभारतकारांनी रामायणाचा कसा उपयोग केला आहे तें दाखवतों. महाभारताच्या वनपर्वांत (आरण्यक पर्व हें त्याचें खरें नांव आहे) रामोपाख्यान म्हणून रामकथा सांगण्यांत आली आहे. त्यांत आज आपल्यास अुपलब्ध असलेल्या रामायणांतील श्लोकचे श्लोक जसेच्या तसे घेतलेले आढळतात. सुखटणकरांनी आपल्या Epic Studies (VIII) मध्ये अशी ८६ ठिकाणीं अुसनवारी झाल्याचें दाखविलें असून रामोपाख्यान हा आजच्या आपल्या रामायणाचा सारांश आहे असें आपलें मत दिलें आहे.[2]

दोन कवींना स्वतंत्रपणें सारख्याच कल्पना सुचतील पण अेकाच विषयावर लिहितांना अेकच शब्दप्रयोग ते करीत नाहीत. पण असे अुतारे केवळ रामोपाख्यानांतच नव्हे तर नलोपाख्यानें, कच्चित्प्रश्न (सभापर्व अध्याय ५) अि. ठिकाणीं आढळतात. ज्ञानेश्वरींतील ओव्या अेकनाथी भागवतांत पुष्कळ अंशीं जशाच्या तशा घेतल्या असल्याचें प्रसिद्ध आहे.

कै. पांगारकरांनी आपल्या अेकनाथी भागवताच्या प्रस्तावनेंत पुढील अुदाहरणें दिलीं आहेत (पृ. ४-५).

| ज्ञानेश्वरी | अेकनाथी भागवत |
|---|---|
| (१) विषय विषाचा पडिपाडू । गोड परमार्थ लागे कडू । कडू विषय तो गोडू । जीवासी जाहला ॥ अ. १०.१५९ | केला विषप्राय विषयो कडू । तो प्रपंचिया जाला गोडू । अमृतप्राय परमार्थ गोडू । तो जाला कडू विषयिकां ॥ अ. ८.२८२ |

१ डॉ. कत्रे, Introduction to Indian Text Criticism पृ. ३४.

२ सविस्तर विवेचन Epic Studies (VIII) — A Volume of Studies in Indology Presented to Prof. P. V. Kane पृ. ४७२–४८७ पाहावें. लाहोरचे डॉ. रघुवीर रामायणाची चिकित्सित आवृत्ति काढीत आहेत ती पूर्ण झाल्यानंतर रामायण व महाभारताच्या संबंधाबद्दल अधिक लिहितां येईल. डॉ. सुखठणकरांनी दिलेली यादी अपुरी आहे. वस्तुतः कल्पनासादृश्य सोडून चालणार नाही पण शब्दसादृश्य असणारे श्लोक दोन्ही महाकाव्यांत कितीतरी आहेत.

३ डॉ. सुखठणकर– 'The Nala Episode and the Rāmāyaṇa : A Volume of Eastern and Indian Studies in honour of F. W. Thomas, C. I. E., पृ. २९४-३०३ पाहा.

| | |
|---|---|
| (२) आणि अुदोअस्तांचनीप्रमाणें । जैसे न चालतां सूर्याचें चालणें ॥ अ. ४.९९ | अुदो अस्ताचेनिप्रमाणें । जैसें सूर्यासी पडे मंवणें ॥ ३.१४२ |
| (३) डोळा हरळ न विरे । घाई कोत न जिरे ॥ अ. १३.५३९ तसेंच ज्ञानेश्वरी ९.२०६, १६.८ अि. | डोळा हरळू न विरे । घायीं कोत न जिरे ॥ अ. १२.२५० अेकनाथी भागवत २-२७१ १२.२५९ अि. |
| **अेकनाथ** | **तुकाराम** |
| (१) जैं माझे भक्त आले घरा । तैं सर्व पर्वकाळ आले द्वारा । वेष्णवा तो दिवाळी दसरा । तीर्थें घरा पैं येती ॥ अेक. भाग. ११.१२६६ | साधुसन्त येती घरा । तोचि दिवाळी दसरा ॥ |
| (२) बाळ पालवी घाली पिळा । तेणें बापू राहे थोकला ॥ अेक. भाग. २.७८४ | पदरीं घाली पिळा । बाप निर्बळ साटीं बाळा ॥ |

ज्ञानेश्वरांनी भगवद्गीतेवरील शांकरभाष्याचा अनुवाद केलेला प्रा. शं. दा. पेण्डशांनी दाखविलें आहे. अेकनाथ, ज्ञानेश्वर, महाभारतकार यांच्यासारखे मोठे ग्रंथकार जर अुसनवारी करतात तर सामान्य लेखकांची काय कथा ?

संस्कृत, प्राकृत व मराठी लिखाणांत असलेली अुसनवारी ही प्राचीन वाग्भटांच्या लेखनाच्या आलोडनाने आली असो वा डोळ्यासमोर पोथी ठेवून केलेली असो ग्रंथ-सम्पादकाने ते संदर्भग्रंथ धुंडाळून त्यांतून कोणत्या भागाची कशी अुसनवारी आपल्या सम्पादनार्थ घेतलेल्या ग्रंथांत आहे हें निश्चित केलें पाहिजे. ग्रंथसंपादन करतांना ग्रंथकाराने वापरलेले संदर्भग्रंथ, त्यांतील अुतारे व आपल्या ग्रंथकाराने त्यांचा केलेला अुपयोग यांचें अेक तुलनात्मक कोष्टक देणें हें सम्पादकाचें अेक महत्त्वाचें कर्तव्य आहे. त्या योगाने ग्रंथकाराची लेखक या दृष्टीने विद्वत्ता, बुद्धिवैभव लेखनकौशल्य व व व्यक्तिमत्व यांचें वैशिष्ट्य व मर्यादा स्पष्ट होतात.

वर वर्णन केलेल्या चतुर्विध अंगांनी निश्चित केलेली संहिता, ग्रंथकाराच्या स्वलिखिताला बरीच सदृश असेल अशी अपेक्षा केल्यास तें वावगें होईल काय ?

संहिताचिकित्सेच्या वरील विवेचनावरून ग्रंथसम्पादन करतांना कोणकोणत्या गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे हें स्पष्ट झालेंच आहे. त्याच गोष्टी पुढीलप्रमाणे क्रमशः मांडतां येतील.

ग्रंथाच्या हस्तलिखिताच्या प्रती कोठे आहेत हें कळल्यानंतर त्या प्रती किंवा स्वतःच्या देखरेखीखाली लिहवलेल्या व स्वतः अक्षरशः तपासलेल्या त्या हस्तलिखितांच्या नकला किंवा त्यांचे प्रकाशलेख (फोटोग्राफ, मायक्रोफिल्म अि·) मिळवून प्रस्तावनेच्या सुरवातीस हस्तलिखितांची सामान्य माहिती– अेकूण संख्या, चिकित्सित संहितेसाठी वापरलेले हस्तलेख, लेखतुलने(collation)साठी वापरलेलीं हस्तलिखितें व तींच कां वापरलीं यांचीं कारणें (अुदा० हस्तलिखितांचें मूलस्थान, काल, लेखनपद्धति किंवा अितर विशेष संपादकाने द्यावीं. लेखतुलनेने सिद्ध झालेले हस्तलिखितांचे गट (recensions व versions) कोणते हें थोडक्यांत दर्शवून आपल्या चिकित्सित साहित्यांत (apparatus criticus) घेतलेलीं हस्तलिखितें, त्यांचीं संक्षिप्त चिन्हें (siglum)[1], स्थानें, शक व ज्या ग्रंथभांडारांत तें असेल तेथील जंत्रींतील

१ ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान पृ. १८-१७२.

त्यांचा क्रम द्यावा. संक्षिप्त चिन्हें सामान्यतः त्यांच्या मूलस्थानावरून किंवा लिपीवरून ठरवितात. आपण अुपयोगांत आणलेल्या हस्तलिखितांची योग्य कल्पना येण्यास त्यांची पृष्ठसंख्या, प्रत्येक पृष्ठांतील (सामान्यतः असणाऱ्या) ओळी, प्रत्येक ओळींतील अक्षरांची संख्या, अक्षरांचें वळण, लेखकांची संख्या, कागद (भूर्जपत्र किंवा ताडपत्र असल्यास) त्याची लांबी, रुंदी, स्वरूप, लेखनविशेष (orthographical peculiarities), हस्तलेखाचें स्वरूप (खराब झालेला, काळजीपूर्वक जतन केलेला अि.), समासांतील टीपा (marginalia), ओळींतील दुरुस्त्या किंवा टिपणें अि. गोष्टींची खुलासेवार माहिती दिली पाहिजे. याशिवाय हस्तलिखितांची सुरुवात व शेवट, प्रशस्ती, ज्या गृहस्थाकरिता ती पोथी लिहिली असेल त्याची माहिती देण्यास विसरूं नये. कांहीं हस्तलिखितें वगळलीं असल्यास तीं लक्षांत कां घेतलीं नाहीत त्याचीं कारणें, ज्या हस्तलिखितांतील कांही भागांची तुलना केली असेल त्यांचें कोष्टक, प्राचीन टीका, सारांश वगैरे (commentaries, epitomes, adaptations, florilegia), त्या ग्रंथाच्या अभ्यासासाठी वापरलेले अवांतर पुरावे वाचकांपुढे मांडावे.

हस्तलिखितांचा परस्परसंबंध व्यक्त करण्यास मागील लेखांत वर्णन केलेली[1] वंशवृक्षात्मक पद्धत अुपयोगांत आणतात. ते संबंध व्यक्त करतांना अनुमित प्रती तारकांकित करतात. अुदाहरणार्थ, ज्ञानेश्वरीच्या नेवासें येथील प्रतीवरून केलेली अेक नक्कल अुपलब्ध आहे अशी कल्पना करूं, तर तिचें पूर्वलिखित दाखवतांना *ने असें लिहितात.

हस्तलिखितांचें संक्षिप्त चिन्ह वापरतांना तें कोणत्या शतकांतील आहे तें त्याच्या वरील बाजूस लिहिणें सोअिस्कर असतें; अुदा. पै$^{१६}$= पैठण येथील १६ व्या शतकांतील हस्तलिखित, पं$^{१३-१४}$ = पंढरपूर येथील १३ व्या किंवा १४ व्या शतकांतील प्रत, आ$^{१५}$※ = आळंदी येथील काल निश्चित नसलेली पण १५ व्या शतकापेक्षा अर्वाचीन नसलेली प्रत.

हस्तलिखितांच्या संक्षितांचा खुलासा झाल्यानंतर हस्तलिखितांचे जे गट पडतात त्यांचें परस्परांतील साम्य व फरक, त्यांचीं प्रातिनिधिक अुदाहरणें, लोकांत प्रचलित असणाऱ्या प्रतींशीं (vulgate) असणारे पाठभेद, संमिश्र पाठ (conflation) असल्यास त्यांचें मूळ अि. हस्तलिखितांचे गट पाडण्यास आधारभूत असलेले पुरावे खुलासेवार मांडावे. सारांश, चिकित्सित आवृत्ति चिकित्सक वाचकवर्गाचें समाधान करणारी असावी व तिच्या प्रास्तविक भागामध्ये अुपलब्ध हस्तलिखितांची संपूर्ण कल्पना देणारी सोदाहरण चर्चा करणें संपादकाचें मुख्य कर्तव्य आहे.

हस्तलेखांची माहिती दिल्यानंतर आपण संहिताचिकित्सेच्या कोणत्या तत्त्वावर पुढील ग्रंथांतील संहिता बसवली तीं तत्त्वें व त्यास घातलेली मुरड (कारणांसह) द्यावी. प्रक्षितें गाळलीं असल्यास तीं कोणतीं व कां हें सांगावें. आपल्याखेरीज अितर संपादकांनी त्याच ग्रंथाच्या आवृत्त्या काढल्या असल्यास त्यांच्या मर्यादा स्पष्ट कराव्या.

यानंतर ग्रंथकाराबद्दल असलेली अैतिहासिक माहिती, त्याचा प्रस्तुत ग्रंथ व अितर वाङ्मय, त्याचें वाङ्मयीन महत्त्व, वैशिष्ट्यें व स्थान, त्याने वापरलेले पूर्वसूरींचे ग्रंथ व तौलनिक अुताऱ्यांचें संपूर्ण कोष्टक, त्याने दिलेलीं अवतरणें व त्यांचे संदर्भ, ग्रंथांत मधून मधून विखुरलेली अैतिहासिक महत्त्वाची राजकीय व सामाजिक माहिती, ग्रंथावरील टीकाग्रंथ व त्याचें मूल्यमापन, ग्रंथकाराने त्या विशिष्ट वाङ्मयप्रकारांत घातलेली भर व तिचा नंतरच्या वाङ्मयावरील

१ म. सा. पत्रिका, जुलै १९४२, पृष्ठ २६४-२६५.

परिणाम, त्या ग्रंथांतील भाषेचें व्याकरण, तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ असल्यास त्यांतील तत्त्वज्ञान व तौलनिक दृष्ट्या त्याचें स्थान वा वैशिष्ट्य अि. गोष्टींची चर्चा प्रास्ताविक विभागांत असणें आवश्यक आहे.

संहिता तयार करतांना स्वीकृत, स्वीकृत पण संशयित, संदिग्ध पण नाकारलेले, सुधारलेले व अनुमित पाठ दाखवण्याच्या पद्धती निरनिराळ्या संपादकांच्या निरनिराळ्या आहेत; अुदा० डॉ. सुखटणकर अनुमित पाठ तारकांकित (*) देतात व संशयित पण स्वीकृत पाठाखाली नागमोडी रेषा (~~~) वापरतात. कांही सम्पादक आपले अनुमित पाठ < > अशा खुणांमध्ये देतात. भाषाशास्त्रांत वाङ्मयांत प्रत्यक्ष न आढळलेले पण अनुमानाने ठरवलेले शब्द तारकांकित द्यावयाची पद्धत आहे ती संहिताचिकित्सेंत अनुसरण्यास कांही हरकत नाही. अितर प्रकारच्या पाठांचें दिग्दर्शन करण्यास संपादकांनी आपापल्या मर्जीनुरूप पण सुसंगतपणें कोणत्याहि खुणा वापराव्या. पण संहितेच्या प्रत्येक पानावर सम्पादकाने शोधिलेली संहिता (constituted text) व तत्संबंधीचा अितर हस्तलिखितांचा पाठभेदादि पुरावा वाचकांस अेकदम पाहतां यावा अशा पद्धतीने द्यावा. पाठभेदांची परिशिष्टें देण्याची पद्धत चिकित्सक वाचकाला फार त्रासदायक होते.

ग्रंथाचें आधुनिक भाषेंत भाषांतर द्यावें किंवा देअू नये पण मधून मधून महत्त्वाचीं टिपणें देण्यास विसरूं नये. परिशिष्टांत संहितेंतील श्लोक, अभंग किंवा ओव्यांची अकारानुक्रमें सूचि, संहितेंतील शब्दसंग्रह (Index verborum)— निदान महत्त्वाच्या शब्दांची सार्थ सूचि व संदर्भ, स्थल व व्यक्तिनामसूचि, प्रस्तावना व संहिता यांतील अुल्लेखलेल्या व्यक्ति, ग्रंथ व विषय यांची सामान्य सूचि देण्यास चुकूं नये.

संहिताचिकित्सेचा अुद्देश प्राचीन वाग्भटांनी केलेल्या वाङ्मयसेवेचें सत्यस्वरूप संशोधन करून जनतेसमोर मांडणें व त्या महानुभावांचें हृद्गत आत्मसात् करण्यास मदत करणें हा आहे. प्राचीन महानुभावांची ही नम्र वाङ्मयसेवा आहे. मुकुंदराज, ज्ञानदेव, नामदेव, दासोपंत किंवा अेकनाथ या महाराष्ट्रीय संतांच्या वाङ्मयाचें या दृष्टीने आलोडन होअून हे द्रष्टे स्वतःच्या शब्दांत स्वतःचे बोल आम्हा अज्ञानी जनतेच्या कानीं घालतील तो सुदिन.

गेलीं तीन वर्षें अिंग्लिश, फ्रेंच व जर्मनमधील आपल्या ग्रंथांच्या चिकित्सित आवृत्त्या अभ्यासत असतां प्राचीन मराठी वाङ्मयावर असे कां प्रयत्न नसावे या अुद्विग्नतेने प्रस्तुत विषयाकडे माझें लक्ष वेधलें. या विषयावर लिहितांना डॉ. सुखठणकरांनी महाभारताच्या आदिपर्वाच्या प्रस्तावनेंत केलेली चर्चा व डॉ. कत्रेकृत Introduction to Indian Textual Criticism यांचा फार अुपयोग झाला. संहिताचिकित्सेच्या होतकरू विद्यार्थ्याला हीं दोन्ही अत्यंत अभ्यसनीय आहेत. याशिवाय पिशल, याकोबी, वैद्य, अुपाध्ये, जैन, आल्सडॉर्फ, शहिदुल्ला अि० संपादकांच्या चिकित्सित संहितांचा मला बराच अुपयोग झाला.

या विषयावरील लेख व पुस्तकें पुरवल्याबद्दल डॉ. कत्रे व डॉ. सुखठणकर यांचा मी ऋणी आहें.

संहिताचिकित्सा व ग्रंथसंपादन या विषयावरील व्यक्त केलेल्या मतांना मी जबाबदार आहें. यांत कांही दोष, अपुरेपणा वगैरे आढळल्यास माझ्या वाचकवर्गाने तें कळवून मला अुपकृत करावें अशी विनंती आहे.

या दोन्ही लेखांतील अुल्लिखित व अनुल्लिखित ग्रंथकारांचा मी अत्यंत आभारी आहें.

# महीपति आणि नाभाजी व प्रियादास

(लेखक— प्रा. भवानी शंकर श्री. पंडित)

**महीपतीचे चरित्रग्रंथ :**

संतचरित्रें रचण्याचा प्रघात महाराष्ट्रांत प्राचीन कालापासून असला तरी तो लोकप्रिय करण्याचें श्रेय महीपतीकडे जातें. महीपतीपूर्वी अुद्धव चिद्घन व दासो दिगंबर आणि नंतर भीमस्वामी, राजाराम प्रासादी व नरहरि धुंडिराज मालु हे चरित्रकार होअून गेले. पण या सर्वांत आज महीपतीच विख्यात आहे. महीपति हा मोठा साक्षेपी चरित्रकार असून त्याने आपली चरित्रविषयक माहिती परिश्रमपूर्वक मिळविली होती असें म्हणतात; परंतु वस्तुतः चिकित्सेच्या अभावामुळे व आधारभूत ग्रंथाच्या अंधानुकरणामुळे त्याचीं चरित्रें अितिहासदृष्ट्या विशेष अुपयुक्त नाहीत. शिवाय आधारभूत ग्रंथाविषयीची त्याची माहितीहि चुकीची आहे. त्याचा आधारभूत ग्रंथ भक्तमाल हा नाभाजीने लिहिला असून त्यावर भक्तिरसबोधिनी ही प्रियादासाची टीका आहे. वस्तुस्थिति अशी असतांना मूळ ग्रंथ प्रियादासाने संस्कृतांत लिहिला असून त्याचें नाभाजीने ग्वाल्हेरी भाषेंत भाषांतर केलें आहे अशी माहिती महीपति देतो. महीपतीने ही भूल कशी केली असावी तें या लेखांत पुढे पाहूं.

महीपतीने भक्तविजय, संतलीलामृत, भक्तलीलामृत व संतविजय असे अेकंदर चार चरित्रात्मक ग्रंथ रचले आहेत. त्यांत भक्तविजय हा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ रचतांना महीपतीने नाभाजीचा भक्तमाल व अुद्धव चिद्घनाचा चरित्रसंभार आपल्यासमोर ठेवला होता. त्याच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे:—

म्हणाल निजबुद्धीनें त्वरित । आपुलें मतीनें रचिला ग्रंथ ।
तरी तैसे नव्हे जी निश्चित । विकल्प चित्तीं न धरावा ।
तरी अुत्तरदेशीं साचार । नाभाजी विरिंचि अवतार ।
तेणें संतचरित्रग्रंथ थोर । ग्वाल्हेरी भाषेंत लिहीला असे ।
आणि मानदेशीं अुद्धव चिद्घन । त्यांहीं चरित्रें वर्णिलीं जाण ।
दोहोंचें संमत अेक करून । भक्तविजय आरंभिला । [अ० १, ओ० ३७-३९
ग्वाल्हेरदेशीं अति अुत्तम । नाभाजी नागर ब्राह्मण ।
जो वैष्णवांमाजी शिरोमण । अवतार पूर्ण विधीचा ।
भक्तचरित्र अति अद्भुत । त्याणें वर्णिलें यथार्थ ।
त्याचीं पदें पाहूनि निश्चित । ग्रंथ महाराष्ट्र लिहीला । [अ० २, ओ० ४८।४९

यावरून महीपतीने नाभाजीचा भक्तमाल हा 'अति अद्भुत' ग्रंथ पाहिला होता हें स्पष्ट आहे; व संतांच्या अद्भुत आख्यायिकांचें वर्णन करण्यांत त्याने त्याचें आंधळें अनुकरणहि केलें आहे; परंतु तो समग्र ग्रंथ त्यास नीट समजला होता असें दिसत नाही. कारण नाभाजीस तो नागरब्राह्मण व त्याच्या भाषेस ग्वाल्हेरी भाषा म्हणतो. पण हें बरोबर नाही. मात्र अुद्धव चिद्घना-संबंधी 'त्यांहीं चरित्रें वर्णिलीं जाण' असा जो अुल्लेख आहे तो लक्षांत घेण्यायोग्य आहे.

[अनुक्रमणिका](#)

कारण अुद्धव चिद्घनाने संतचरित्रात्मक अेखादा संपूर्ण ग्रंथ लिहिला किंवा नुसतीं सुटीं चरित्रें लिहिलीं याविषयी वाद आहे. (महाराष्ट्रसारस्वत भाग २, पृ० १९०।१९१ पाहा.) या अुल्लेखावरून याने सुटीं चरित्रेंच लिहिलीं असावीं असें म्हणण्यास जागा आहे.

### नारायणदास अुर्फ नाभाजी :

आपल्याकडे ज्याप्रमाणे महीपति आदि संतचरित्रकार होअून गेले त्याप्रमाणे हिंदींत नाभाजी व ध्रुवदास हे दोघे संतचरित्रकार झाले. त्यांत नाभाजी विशेष विख्यात आहे. नाभाजीची ख्याति फक्त हिंदी प्रांतांतच नव्हे तर त्याबाहेरहि आहे. पं. रामचंद्र शुक्ल यांनी आपल्या 'हिंदी भाषा का अितिहास' या पुस्तकांत नाभाजी व त्याचा टीकाकार प्रियादास यांची सविस्तर माहिती दिली आहे. नाभाजी हा संवत् १६५७ च्या सुमारास विद्यमान होता. आपल्या भक्तमाल ग्रंथांत तुलसीदासांची स्तुति करतांना त्याने वर्तमानकालीन प्रयोग केला आहे. त्यावरून तो गोस्वामी तुलसीदासांचा समकालीन होता हें अुघड आहे. त्यांच्या पश्चात्हि तो अनेक वर्षें हयात होता. नाभाजीचें खरें नांव नारायणदास होतें. पण आज तो नाभाजी व नाभादास या नांवांनीच प्रसिद्ध आहे. त्याच्या जातीसंबंधी मतभेद आहेत. त्याच्या भक्तमाल ग्रंथावर ज्या दोन तीन टीका आहेत त्यांत कांहींनी त्याचा डोंब म्हणून तर कांहींनी क्षत्रिय म्हणून निर्देश केला आहे. त्याचा प्रसिद्ध टीकाकार प्रियादास त्यास हनुमानवंशी म्हणतो. मारवाडी भाषेंत हनुमानवंशी हा प्रयोग डोंबांसंबंधी योजतात. त्यावरून तो डोंब असावा असा कांहींचा कयास आहे. नाभाजीच्या गुरूचें नांव अग्रदास. कील्हदास हा त्याचा आणखी अेक गुरु होता. अग्रदास हा जयपूर राज्यांतील गलता या ठिकाणचा राहणारा. हा प्रथम वल्लभाचार्यांच्या परंपरेंतील होता; परंतु पुढे याने रामाची अुपासना चालविली. तेव्हा नाभाजी हा आपल्या गुरूप्रमाणेच रामोपासक होता हें निराळें सांगण्याचें कारण नाही. व्रज व अवधी या दोन भाषांवर नाभाजीचें सारखेंच प्रभुत्व होतें. भक्तमाल या ग्रंथाशिवाय त्याने दोन अष्टयाम रचले असून त्यांपैकी जो गद्यबद्ध आहे तो व्रज भाषेंत आहे व जो पद्यबद्ध आहे तो अवधी भाषेंत आहे. या दोन्ही ग्रंथांत रामाची आराधना आहे. यांशिवाय त्याचा रामभक्तिपर अेक पदसंग्रहहि अुपलब्ध आहे. यावरून महीपतीस नाभाजीसंबंधी अचूक माहिती नव्हती हें स्पष्ट आहे.

### नाभाजीचा भक्तमाल ग्रंथ :

नाभाजीचा भक्तमाल हा संतांच्या सुरस व चमत्कारिक आख्यायिकांचा ग्रंथ जुन्या भाविक मंडळींत फार प्रिय आहे. बाबू राधाकृष्णदास यांच्या मतानुसार तो संवत् १६४२ ते ८० च्या दरम्यान केव्हा तरी रचण्यांत आला असावा. तो रचतांना नाभाजीने सांप्रदायिक क्षुद्र बुद्धि आड येअूं दिलेली नाही. त्याने भिन्न भिन्न पंथांच्या व मतांच्या संतांकडे सारख्याच आदराने व अुदारतेने पाहिलें आहे. या ग्रंथांत अेकंदर १९८ छप्पय (षट्पद्या) असून अदमासें २०० संतांच्या चमत्कारांचें स्तुतियुक्त वर्णन आहे. तें करतांना साहजिकच नाभाजीने सर्व भर भाविकतेवर दिला आहे; त्यांत चिकित्सेचा अंशहि नाही. या ग्रंथांत बहुतेक सर्व प्रसिद्ध संतांच्या आख्यायिका अंतर्भूत झाल्या आहेत. त्यांत आपल्याकडील नामदेव व ज्ञानदेव या ज्येष्ठ व श्रेष्ठ संतांच्या आख्यायिकाहि समाविष्ट झाल्या आहेत. नाभाजीने चमत्कारांचें वर्णन करतांना सामान्यतः अेका संताला अेक छप्पय अशी वांटणी केली आहे. परंतु क्वचित् अेकाच संताच्या वांट्याला अनेक छप्पय आले असून, क्वचित् अनेक संतांच्या वांट्याला अेकच छप्पय आला आहे. संत जितका थोर तितका त्याचा चमत्कारवृत्तान्त विस्तृत व त्यासाठी जास्त छप्पय

अशी साधारण योजना आहे. हे चमत्कारवृत्तान्त सूत्रबद्ध असल्यामुळे त्यांचा अर्थ लावणें कठिण पडतें. शिवाय यांत संतचरित्राचा अंश जवळजवळ शून्य प्रमाणांत असून कोठेहि शक-संवताचा अुल्लेख नाही. निव्वळ भक्तिमाहात्म्यसूचक अद्‌भुत कथांचे अुडते अुल्लेख आहेत. तेव्हा या कथांना अैतिहासिक चरित्र म्हणून कितपत महत्त्व द्यावें हा अेक विचारणीय प्रश्न आहे.

**प्रियादास :**

नाभाजीच्या सूत्रबद्ध रचनेमुळे अुत्पन्न होणारें अर्थकाठिन्य प्रियादासाने भक्तिरसबोधिनी या नांवाची टीका लिहून दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्याच्या ठिकाणींहि चिकित्सेचा संपूर्ण अभाव असून त्याने मुळांतील अद्‌भुत कथांत आणखी अद्‌भुत दंतकथांची भर टाकली आहे. प्रियादासाविषयी महीपति जी माहिती देतो ती अशीः—

प्रियादास नागरब्राह्मण । परम भाविक वैष्णवजन
भक्ति ज्ञान वैराग्य पूर्ण । त्याचे ठायीं जाण असती
कलियुगीं झाले विष्णुभक्त । त्यांचीं चरित्रें अति अद्‌भुत
त्यांचा ग्रंथ संस्कृत । प्रियादासें लिहिलासे
मूळींचा ग्रंथ संस्कृत जाण । प्रियादासें केलें वर्णन
त्यावरी नाभाजीनें जाण । ग्वाल्हेर भार्पेत लिहिला
त्याचीं पद्यें अेकोनी कानीं । ग्रंथ लिहीला महाराष्ट्रवाणी
जैसे दुग्धामाजी धारवणी । अुदक थोडें घालती

[अ० ३, ओ० ३२०-२१ व ३३५-३६

पण ही माहितीहि संपूर्ण बरोबर नाही. प्रियादास हा वैष्णव असून ज्ञानी होता ही या अवतरणांतील माहिती बरोबर आहे. कारण कृष्णभक्त हरिलाल हे आपले गुरु असून आपण वृंदावनवासी आहों या गोष्टीचा स्वतः प्रियादासाने आपल्या टीकेच्या अंतीं अुल्लेख केला आहे. टीकेच्या आरंभीं त्याने निंबार्काचार्यास नमन केलें आहे. यावरून तो निंबार्कसंप्रदायांतील असावा असें दिसतें. तो नागरब्राह्मण होता किंवा नाही हें कळावयास आज कांही मार्ग नाही; परंतु त्याच्या टीकेंत बहुश्रुततेचा व रसिकतेचा जो मधुर मिलाफ झाला आहे त्यावरून तो सुसंस्कृत ब्राह्मण असावा असा तर्क वाहतो. भक्तमालेवरील टीकेशिवाय त्याने बुंदेलखंडी भार्पेत भागवत रचलें आहे.

**प्रियादासाची भक्तिरसबोधिनी टीका :**

नाभादासाच्या मूळ भक्तमालेपेक्षा प्रियादासाची भक्तिरसबोधिनी टीका विस्तृत आहे. आज ज्यास भक्तमाल असें म्हणतात तो ग्रंथ या टीकेसहित ओळखला जातो. ही टीका संवत् १७६९ मध्ये तयार झाल्याचा स्वतः प्रियादासाचा अुल्लेख आहे. म्हणजे मूळ ग्रंथांत व टीकेंत जवळ जवळ अेक शतकाचें अंतर आहे. टीकेच्या आरंभीं आपण नाभादासाच्या आज्ञेवरून ती रचत असल्याचा प्रियादासाने खुलासा केला आहे. त्याचा अर्थ अितकाच की, त्याने नाभाजीच्या भक्तमालेकडून काव्यलेखनाची स्फूर्ति घेतली. प्रियादासाच्या या टीकेंत अेकंदर ६२४ घनाक्षऱ्या आहेत. त्यांत त्याने शब्दार्थ न सांगतां मूळांत जीं वर्णनें संक्षिप्त आहेत तीं सविस्तर कथन केलीं आहेत आणि अनेक स्थळीं स्वतःच्या पदरची नवीन व वैचित्र्यपूर्ण माहिती भरीस घातली आहे. येवढेंच नव्हे तर मूळावर भाष्य करतांना त्याने श्रुतिस्मृतिपुराणादि ग्रंथांतून व रामायण-भारत-भागवतादि काव्यांतून विपुल संस्कृत अवतरणें दिलीं आहेत. यांशिवाय त्याने

मधून मधून हिंदी कवींच्या काव्यांतील अुत्कृष्ट वेंचे दाखल केले आहेत व क्वचित् कांही गोष्टींचें व्रज भाषेंत स्पष्टीकरणं केलें आहे. त्यामुळे भक्तमालेपेक्षा ही भक्तिरसबोधिनी टीकाच अधिक सरस अुतरली आहे. किंबहुना टीकेमुळेच मूळास शोभा येअून भक्तमालसटीक हा ग्रंथ आज-मितीस आपलें लोकप्रियत्व कायम टिकवून राहिला आहे.

### महीपतीची भूल व तिचें निराकरण :

महीपति म्हणतो त्याप्रमाणे त्याने स्वतः हा सटीक ग्रंथ पाहिला होता यांत संशय नाहीं. परंतु त्याने तो 'निश्चित' म्हणजे 'सावध' पाहिला होता असें दिसत नाही. किंबहुना 'त्याचीं पद्यें अैकोनी कानीं' येवढाच त्याचा या ग्रंथाशीं परिचय होता असें वाटतें. कारण वरील अव-तरणांतील तिसऱ्या ओवींत 'मूळ ग्रंथ संस्कृतांत प्रियादासाने लिहीला असून पुढें तो नामाजीनें ग्वाल्हेर भाषेंत लिहीला' असें जें तो सांगतो, तें अुघड अुघड चूक आहे. त्याची अशी ही भूल होण्याचें कारण त्याने भक्तमालसटीक हा ग्रंथ प्रत्यक्ष पाहिला असला तरी अपरिचित भाषेमुळे त्याला तो नीट समजला नसावा, आणि त्यांतील संस्कृत अवतरणें पाहून 'प्रियादासाने तो संस्कृतांत लिहिला व नंतर नाभाजीने प्राकृतांत लिहीला' असा त्याचा गैरसमज झाला असावा. संस्कृत अवतरणें पुराणांतील व प्राचीन काव्यांतील आहेत येवढें जरी त्यास कळलें असतें तरी त्याची अशी भूल झाली नसती. परंतु 'नेणें संस्कृतवाणी निश्चिती' [अ० १, ओ० १८] असा त्याने स्वतःच कबुलीजबाब दिला आहे.

महीपतीचें 'त्याचीं पद्यें अैकोनी कानीं' हें प्रांजल निवेदन प्रमाणभूत धरल्यास हिंदी व मराठी या दोन्ही भाषा जाणणाऱ्या अेखाद्या दुभाष्या पुराणिकाच्या मुखाने त्याने हा ग्रंथ श्रवण केला असावा असें वाटतें. हा दुभाष्या बहुधा ग्वाल्हेरकडील महाराष्ट्रीय असावा. कारण महीपति हा महादजी शिंद्यांचा समकालीन होता. दिल्लीच्या बादशहाला महादजींचा वचक होता. महादजी कृष्णाचे परम अुपासक व कवि होते. ते वर्षोनु कांही महिने मथुरावृंदावनास राहत. त्या सुमारास हा ग्रंथ मथुरा-ग्वाल्हेरकडून महाराष्ट्रांत आला असावा. महीपति नाभाजीच्या भाषेस ग्वाल्हेरी भाषा म्हणतो तें बहुधा हा ग्रंथ त्या प्रांतातून आपल्याकडे आला म्हणून म्हणत असावा. वस्तुतः या ग्रंथांत अवधी व व्रज भाषा आहेत. ग्वाल्हेरी अशी स्वतंत्र भाषाच मुळीं अस्तित्वांत नाही. हा ग्रंथ मथुरा-ग्वाल्हेरकडचा, तेव्हा नाभाजी हा वैष्णव, व तिकडील कृष्ण-पूजकांत नागरब्रह्मणांचा भरणा फार, तेव्हा नाभाजी हा नागरब्राह्मण असा महीपतीचा विपरीत ग्रह झाला असावा.

### हे चरित्रग्रंथ कीं कथाग्रंथ ?

महीपतीने भक्तमालसटीक हा ग्रंथ पाहिला व अैकला असला तरी त्यांतून त्याने फक्त सतरा अठरा संतांचीच माहिती निवडली आहे. त्यांत जयदेव, कबीर, सेना, राकाबांका, नरसी मेहेता, मीरा, तुलसीदास अित्यादि संत अंतर्भूत होतात. नामदेव व ज्ञानदेव यांचे भक्तमालेंतील वृत्तान्त महीपतीला पटले नसावेत असें दिसतें. कारण भक्तविजयांत त्याने या दोघांची माहिती स्वतंत्र रीतीने दिली आहे. भक्तमालेंत नामदेव हे वामदेवाच्या विधवा मुलीचे पुत्र, ज्ञानदेव हे विष्णुस्वामिसंप्रदायी, नामदेव व त्रिलोचन हे ज्ञानदेवांचे शिष्य, सोपानदेव, महानदेव व ज्ञानदेव हे तिघे बंधु अित्यादि विलक्षण व निराधार माहिती आहे. ही माहिती आपल्याकडील माहितीशीं विसंगत आहे. तेव्हा महीपतीने तिच्यावर विश्वास ठेवला नाही; परंतु साक्षात् श्रीरामांनी तुलसीदासाचें रामायण लिहिलें या अद्भुत

कथेवर मात्र त्याचा विश्वास बसला (अ० ३, ओ० ३२२ पासून पुढे पाहा). नामादास काय, प्रियादास काय, व महीपति काय सर्वच भाविक ! त्यांच्याकडून चिकित्सेची अपेक्षा व्यर्थ आहे. ते ज्या युगांत जन्मले त्या युगाची कल्पनाच अशी की, प्रत्येक संत, प्रत्येक कवि व प्रत्येक प्रचारक हा प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतार. त्याच्या ठिकाणीं अद्‌भुत कृत्य करण्याचें नैसर्गिक सामर्थ्य असतें. सर्वसामान्य मनुष्यापेक्षा तो निराळ्या कोटींतला असतो. तेव्हा त्याच्या लौकिक चरित्रांत फारसें खोल न शिरतां त्याच्यासंबंधी ज्या सुरस व चमत्कारिक आख्यायिका प्रचलित असतील त्यांचीच मुक्तकंठाने स्तुति करावी. तोच मोक्षाचा सरळ व सोपा मार्ग आहे. सारांश, भक्तमाल व भक्तविजय यांसारख्या ग्रंथांना चरित्रग्रंथ म्हणून कितपत मानावें हा चिकित्सक बुद्धीला अेक प्रश्न आहे. या ग्रंथांना चरित्रग्रंथ म्हणतां येअील का, कीं हे निव्वळ सुरस व चमत्कारिक कथात्मक ग्रंथ आहेत ?

---

## रद्दींतील रत्नें—

### AKBAR AND SUEZ CANAL

Two poems composed with a view to obtain the Homejee Cursettjee prize awarded every year by the University of Bombay.

by

GOVIND WASUDEVA KANITKAR
A Student of St. Xavier's College.

"Nor Envy base, nor creeping Gain
Dare the muse's walk to stain
While bright-eyed science watches round–
Hence, away, 'tis holy ground !"

GRAY

---

Printed at the "National Press"
Price $1\frac{1}{2}$ Annas.

[सुप्रसिद्ध रसिक साहित्यिक व कवि कै. गो. वा. कानिटकर यांच्या अेका अिंग्रजी काव्याच्या छोट्या पुस्तकाचें हें मुखवस्त्र आहे (title-page या अर्थी मुखवस्त्र हा शब्द जुन्या कागदपत्रांतून येतो). हें द्विदल काव्य सरदार बळवंतराव विनायक शास्त्री पटवर्धन यांस अर्पण केलें आहे ]

---

# रा. मोडकांनी केलेलें दोषदर्शन






(लेखक — श्री. अ. का. प्रियोळकर)

महाराष्ट्र साहित्य-पत्रिकेच्या गेल्या ओप्रिल १९४२ च्या अंकांत **रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांचे संकलित लेख** या ग्रंथाचें विस्तृत परीक्षण पुण्याचे प्रसिद्ध वैयाकरण रा. गो. कृ. मोडक यांनी केलेलें आहे. त्यांत कै. गुंजीकर यांच्या लेखनाचा आदरपूर्वक विचार करून कांही मतभेद किंवा दोषहि दाखविले आहेत. सदर ग्रंथाच्या प्रस्तावनेंत गुंजीकर यांच्या अेकंदर कार्याचा आढावा घ्यावा लागल्यामुळे त्यांच्या व्याकरणविषयक विचारांच्या तपशिलांत विस्तारभयास्तव मला शिरतां आलें नाहीं. पुढे सवडीप्रमाणे या विषयावर अेखादा स्वतंत्र निबंधच कोठेतरी प्रसिद्ध करावा असा विचार केला. तसा प्रयत्न करतांना रा. मोडक यांच्या आक्षेपांचाहि परामर्श मी अवश्य घेअीन. आज रा. मोडक यांनी माझ्या प्रस्तावनेंतील ज्या कांही चुका म्हणून दाखविल्या आहेत त्यांसंबंधी दोन शब्द खुलाशादाखल लिहूं अिच्छितों.

रा. मोडक लिहितात, "**गुंजीकर-ची व्युत्पत्ति** — प्रस्तावना पान ५ मध्ये रा. प्रियोळकर म्हणतात, 'कुंजवनापासून गुंजी हें नांव भाषाशास्त्रास विरुद्ध आहे; कारण शब्दाच्या आद्य क् चा ग् होत नाही.' मला वाटतें हें प्रस्तावकाचें म्हणणें चूक आहे. द्यूत-कार-पासून निघालेल्या **जुगार** या शब्दांत 'क्'स्थानीं 'ग्' आला आहे. येथे कदाचित् 'ग्' समासावयवाच्या आरंभीं आहे, शब्दारंभीं नाही; म्हणून हें अुदाहरण येथे लागू पडत नाही, असें कोणीं म्हटल्यास त्याने 'गार' घ्यावी. हा 'गार' शब्द 'वर्षोपलस्तु करका' यांतील करका शब्दावरून आला आहे. **हें अुदाहरण स्पष्ट सांगतें कीं शब्दाच्या आद्य 'क्'चा 'ग्' संभवतो.** 'गड' हा शब्दहि 'कटक' या शब्दावरून आला असल्यास, त्याचीहि साक्ष येथे पोषक होअील." रा. मोडकांनी दाखविलेली माझी ही चूक खरी ठरल्यास जुन्या प्राकृत व्याकरणकारांस व भाषाशास्त्रज्ञांस ठाअूक नसलेला मोठा शोध त्यांनी लावला असें होअील, व या दृष्टीने त्यांच्या या मताचा विचार अवश्य झाला पाहिजे; परंतु तसें करण्याच्या अगोदर येथे अेक गोष्ट प्रथम मला सांगावयाची आहे. ती ही की, रा. मोडक म्हणतात त्याप्रमाणे कै. गुंजीकरांनी दिलेली आपल्या नांवाची व्युत्पत्ति खरी ठरून माझें मत चुकीचें ठरल्यास त्यांत मला समाधानच वाटेल; परंतु गुंजीकरांचें अेखादें मत मला पटत नसतां तें प्रमाण मानून चालण्याअितकी माझी गुंजीकरभक्ति अंध नाही. त्यामुळे प्रस्तावनेंत कांही ठिकाणीं मला कै. गुंजीकरांशीं मतभेद व्यक्त करण्याचा प्रसंग आलेला वाचकांना आढळेल.

माझें मत चुकीचें ठरवितांना 'जुगार' हा शब्द रा. मोडकांनी पुढे केला आहे, व हा शब्द ते द्यूतकार या संस्कृत शब्दापासून सिद्ध करतात. वास्तविक जुगार हा शब्द द्यूतकार-पासून सिद्ध झाला नसून त्याचा अुगम पोर्तुगीज आहे असें मी समजतों. Pagar (to pay) या पोर्तुगीज शब्दापासून जसा पगार त्याप्रमाणे Jogar (to play a game) पासून जुगार. मराठी शब्दकोशांतहि जुगार या शब्दाची रा. मोडकांप्रमाणेच व्युत्पत्ति दिलेली आहे ती

मला पटत नाही. जुगार हा शब्द मोडक म्हणतात त्याप्रमाणे द्यूतकार पासून सिद्ध झाला असतां तरीहि येथे तो गैरलागू आहे. (याची जाणीव मोडकांना असलेली दिसते.) कारण यांत क् अक्षर शब्दाच्या आरंभीं नाही. शब्दाच्या सुरवातीला नसलेल्या क् चा ग् होअूं शकतो याला आधार वाटेल तितके देतां येतील; अुदाहरणार्थ, क-ग-च ज-त-द-प-यवां प्रायो लोपः ॥
—वररुचि (प्राकृतप्रकाश २,१) किंवा

क-ग-च-ज-त-द पयवां प्रायो लुक् । —हेमचंद्र (प्राकृत व्याकरण, १,१७७) किंवा

पिशलचें प्राकृत व्याकरण (Grammatik der Prakrit Sprachen by R. Pischel. Section 202) पाहिल्यासहि चालेल. परंतु शब्दाच्या आरंभींच्या क-चा ग झाल्याचें म्हणून जें अुदाहरण (करका>गार) रा. मोडकांनी दिलें आहे तेंच विशेष महत्त्वाचें आहे, आणि त्याचा विचार झाला पाहिजे. मला स्वतःला 'करका'पासून 'गार' शब्द सिद्ध झाला असेल असें वाटत नाही. गोमंतकी मराठींत 'करा' (करकाबद्दल) व 'गार' असे दोनहि शब्द रूढ आहेत. वास्तविक 'गार' हा शब्द संस्कृत 'ग्रावन्' या शब्दापासून आला असून तो प्राकृतमध्येहि आहे (पाअिअसद्दमहण्णवो, १९२८ पाहा). त्याचा मुख्य अर्थ पांढऱ्या रंगाचा टणक धोंडा म्हणजे Flint. cf. गारगोटी. शास्त्रीमंडळाचा (१८३२) किंवा मोलस्वर्थचा कोश पाहा. करक गारांसारखे दिसतात म्हणून गार असें त्यांना पुढे दुय्यम नांव मिळ लें व तेंच पुढे विशेष रूढ झालें अशी माझी कल्पना आहे.

'गड' हा शब्द 'कटक'पासून आला असावा हीहि रा. मोडकांची समजूत बरोबर दिसत नाही. तो शुद्ध देशी शब्द असून हेमचंद्राच्या देशी नाममालेंत तो आढळतो: **गढो दुग्गे (गढो दुर्गम्) २,८१.** तात्पर्य, आपल्या विधानाच्या समर्थनार्थ आधार म्हणून त्यांनी घेतलेले 'जुगार', 'गार' व 'गड' हे तीनहि शब्द अुपयोगी नाहीत, असें म्हणावें लागतें. अशा चुकीच्या किंवा शंकास्पद आधारांनी कोणतेंहि मत प्रस्थापित करतां येअील असें मला वाटत नाही.

अशा प्रकारें माझा 'व्युत्पत्तिदोष' दाखविल्यावर 'विचारदोष' (परिच्छेद १८) सिद्ध करतांना रा. मोडक लिहितात, "पान २१ वर प्रस्तावक म्हणतात, 'पत्रकाराचें शुष्क वृत्त आणि निर्फळ अभिमान' हा लिहून आलेला मजकूर म्हणून प्रसिद्ध झालेला लेख रामभाअूंचा असावा. पण हें म्हणणें चूक दिसतें. कारण **निर्फळ** असा अशुद्ध शब्द निष्फल-चे स्थानीं रामभाअूंच्या लेखणींतून अुतरेल हें संभाव्य दिसत नाही."

संस्कृत भाषा लिहितांना जर गुंजीकरांनी निर्फळ असा शब्दप्रयोग केला असता तर ती चूक म्हणतां आली असती; परंतु मराठीमध्ये **निर्फळ** असा शब्द केव्हाच प्ररूढ होअून बसल्यामुळे तो अशुद्ध मानतां येत नाही. निर्फळ असा शब्द आजहि रूढ आहे आणि त्या काळींहि होताच होता; अुदाहरणार्थ, कै. रा. ब. गोपाळ हरि देशमुख अुर्फ लोकहितवादी हे ता. १५ आगस्ट १८४८ च्या 'अिंग्रजी विद्या' (पत्र नं. ३१) या पत्रांत लिहितात, "शुद्ध वेड्यांशीं वाद करणें **निर्फळ** आहे." ('शतपत्रें' पाहा). अशा शब्दांना अशुद्ध म्हणावें कीं काय हा प्रश्नच आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं त्याचा बराच विचार आपल्या निबंधमालेंत 'लेखनशुद्धि' या निबंधांत केला आहे. या निबंधाच्या शेवटीं ते म्हणतात, "भाषेचें

म्हणजे पडून गेलेल्या रूढींचें सामर्थ्य केवढें आहे व त्यापुढे व्याकरण किती पंगु हें दाखवून तीस अटकाव करूं जाणें हें किती वेडेपणाचें काम आहे हें दर्शविलें. त्यावरून असें समजावयाचें की, जेथे रूढीचा आणि व्याकरणाचा विरोध पडतो तेथे 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी'-शास्त्राहून रूढि प्रबळ आहे- याच वचनास प्रायः अनुसरणें अुत्तम. तसेंच वर्ण, शब्द, किंवा वाक्य हीं कशीं लिहावीं असा जेथे म्हणून संदेह पडेल तेथे फार करून केवळ अुच्चारावरच प्रमाण धरून चालावें.' यावरून निर्फळ हा शब्द रामभाअूंच्या लेखणींतून अुतरणें असंभाव्य मानण्याचें कारण नाही. माझे 'प्रामादिक लेखन' (परिच्छेद १६) म्हणून 'पिशाच', 'सहाय्य' व 'घनःशाम' असे जे तीन शब्द त्यांनी दिले आहेत, तेहि रूढींत आहेत हें सिद्ध करून देतां येअील. अुदाहरणार्थ, रा. ब. गो. स. सरदेसाअी हे आपल्या 'अुग्रप्रकृति संभाजी' या पुस्तकांत लिहितात, "महाराष्ट्राच्या पिशाचभूमींत बादशहांची विवंचना." (पृ.६२) सहाय म्हणजे मदतनीस व त्यापासून मदत म्हणजे साहाय्य हें संस्कृत व्याकरणाप्रमाणे शुद्ध रूप आहे याबद्दल वादच नाही; परन्तु मराठींत साहाय्य प्रमाणेच सहाय्य, सहाय असेहि शब्द रूढ आहेत. सहाय्य असा शब्द मराठी शब्दकोशामध्ये दिला आहेच, परंतु आजच्याच 'लोकमान्या'च्या अग्रलेखामध्येहि तसा अुपयोग पाहिला—"जिनांना या बाबतींत **सहाय्य** करण्याला सरकार वेळींच धावून आलें.' (ता. १९-८-४२). अशींच वाटेल तितकीं अुदाहरणें देतां येतील. स्वतः गुंजीकर हा शब्द कसा योजितात पाहा—"नायकास शृंगारांत **सहाय** करणारे जे आहेत यांच्या कांही नियमित अशा संज्ञा नाहींत'— संकलित लेख, पृ. ७६ (वि. ज्ञा. वि. जाने. १८७२). माधव चंद्रोबा यांच्या सर्व संग्रहावर "रा. रा. परशुराम बल्लाळ गोडबोले यांच्या **सहायाने** शुद्ध करून" असें लिहिलेलें आढळतें. शुद्ध संस्कृत घनश्याम असेंच लिहावयास पाहिजे. परंतु मराठीमध्ये घनःशाम असें लिहिण्याची प्रवृत्ति फार आहे. कै. वि. ल. भावे यांनी आपल्या महाराष्ट्र सारस्वत या ग्रंथांत होनाजी बाळाजीच्या सुप्रसिद्ध भूपाळीचा पहिला चरण खालीलप्रमाणे अुद्धृत केला आहे:—

**घनःशाम** सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ॥— महाराष्ट्र-सारस्वत, भा. २ रा (आ. ३) संस्कृत व्याकरणाप्रमाणे त्रिंबक हें रूप अशुद्ध आहे; परंतु कै. न्या. तेलंगांसारखे संस्कृतज्ञ किंवा कै. डॉ. माधवराव पटवर्धनांसारखे भाषाशुद्धिकार त्र्यंबक असें आपल्या वडिलांचें नांव न योजतां त्रिंबक असेंच लिहीत. दत्तात्रय हा शब्दहि संस्कृत व्याकरणाच्या दृष्टीने अशुद्ध असतां मराठींत तोच रूढ आहे. माझ्या चुकांचें समर्थन करण्याकरिता हें विवेचन मीं केलें नसून चिपळूणकरांनी म्हटल्याप्रमाणे शास्त्राहून रूढि कशी प्रबळ आहे व 'निर्फळ' असा शब्द गुंजीकरांच्या लेखणींतून अुतरणें असंभाव्य कां नाही हें दाखविण्याकरिता आहे. खरें पाहूं गेलें असतां रा. मोडकांप्रमाणे शक्य तोंवर संस्कृत तत्सम शब्दच मराठीमध्ये योजावे अशा मताचा मी आहें व हें मत मुंबअी विश्वविद्यालयाचे त्या वेळचे व्हाअीस-चॅन्सेलर सर वि. ना. चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखाली साजऱ्या झालेल्या मराठी व्याकरणाच्या शतसांवत्सरिक अुत्सवामध्ये केलेल्या भाषणांत मीं मागेंच व्यक्त केलेलें आहे. (वि. ज्ञा. वि., जाने. १९३७ पाहा.) परंतु रूढीचा पगडा आपणावर अेवढा जबरदस्त असतो की त्यामुळे शास्त्राकडे दुर्लक्ष होतें.

**शिथिल वाक्यरचना** या पोटमथळ्याखाली (परिच्छेद १९) रा. मोडक लिहितात— "प्रस्तावना पान १२ मध्ये पुढील वाक्य आहे. 'मुंबअींतील शेटसावकार व दुसऱ्या

संभावित लोकांची अेक सभा मिळविली' (= बोलाविली) या धर्तीचीं वाक्यें अलीकडे वारंवार आढळतात, पण तीं तर्कदुष्ट असल्याने प्रयोगार्ह नाहीत" वगैरे वगैरे. वरील टीकाविषयक वाक्य माझें नसून १८६३ सालीं प्रसिद्ध झालेल्या कै. गो. ना. माडगांवकर (१८१५–६५) यांच्या मुंबअीवर्णनांतील अवतरणांत आहे! माडगांवकर हे मराठी ग्रंथकारांच्या पहिल्या पिढींतील लेखक होते. परंतु हें वाक्य माझें आहे अशी मोडकांनी आपली खोटी समजूत करून घेतलेली दिसते. निदान रा. मोडकांचा अुपरिनिर्दिष्ट मजकूर वाचून अैंशी वर्षांमागचीं मापा प्रियोळकर आज लिहीत आहे, अशी वाचकांची निःसंशय समजूत होअील!

आपल्या 'प्रस्तावां'त रा. मोडक लिहितात, "रानडे, जांभेकर, दादोबा पांडुरंग अित्यादि विद्वानांची पहिली पिढी होय. यांच्या कांही काल मागून झालेल्या विद्वानांत रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांची गणना होते." वास्तविक रानडे (१८४२-१९०१) व गुंजीकर (१८४३-१९०१) हे अेकाच पिढींतील व समवयस्क होत. जांभेकर (१८१०-१८४६) व दादोबा पांडुरंग (१८१४-१८८२) हे मात्र पहिल्या पिढींतील खरे. असें असतांना रानड्यांचा कालानुक्रम रा मोडकांनी पहिला दिलेला आहे! याच 'प्रस्तावां'त पुढे रा. मोडक लिहितात, "वाङ्मयाच्या अनेक शाखांत यांनी (गुंजीकरांनी) पुष्कळ लेखन केलें आहे. **मात्र यांची कविता कोठें आढळत नाहीं.** अर्थात् त्यांनी कविता केली असल्यास ती अत्यंत अल्प असली पाहिजे." माझ्या प्रस्तावनेच्या ५२ व्या पृष्ठावर '**कवि गुंजीकर**' या मथळ्याखाली त्यांच्या कवितेचा अेक मासला दिला असून कै. वि. कों. ओकांनी त्यांच्या कवितांची केलेली तारीफहि अुद्धृत केलेली आहे. प्रिन्स ऑफ वेल्सच्या हिंदुस्थानच्या आगमनप्रसंगीं त्यांनी अेक काव्य लिहिल्याचेंहि नमुद केलें आहे. असें असतां रा. मोडकांसारख्या चोखंदळ लेखकाने वरीलसारखें विधान करावें हें नवल आहे.

**शुद्धलेखन**-या पोटमथळ्याखाली (परिच्छेद ११) रा. मोडक लिहितात, "विद्यमान मराठी भाषेंतील अनुस्वार बरेचसे कोकणस्थांनी आणिले या प्रवादाचें खंडन श्री. रामभाअूंनी केलें आहे. चिंतामणराव वैद्यांचेंहि असेंच मत आहे." वस्तुस्थिति अशी की, गुंजीकर व चिंतामणराव वैद्य या दोघांनीहि मराठी भाषेंतील अनुस्वारांबद्दल कोकणस्थांना जबाबदार धरलें असून त्यांच्या या मताचें खंडन मींच प्रस्तावनेंत केलें आहे! (पृ. ३४).

रा. मोडक आमच्यासारख्यांकडून ज्या बिनचूकपणाची व शास्त्रीय बारकाअीची अपेक्षा करतात तो त्यांचा चोखंदळपणा अभिनंदनीयच आहे. पण स्वतः त्यांचें मात्र या गोष्टीकडे असावें तितकें लक्ष असत नाही असें त्यांच्या या परीक्षणावरून खेदाने म्हणावें लागतें.

# विकत श्राद्धांतील सव्यापसव्य



(लेखक— श्री. गो. कृ. मोडक)

**१. प्रास्ताविक**—अेप्रिल १९४३ च्या पत्रिकेच्या अंकांत 'रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांचे संकलित लेख' या ग्रंथावर माझे मित्र संपादक श्री. के. नारायण काळे यांच्या सांगण्यावरून मीं अभिप्राय लिहिला. यांतील कांही गोष्टी वरील ग्रंथाचे संपादक व प्रस्तावक रा. अ. का. प्रियोळकर यांस रुचल्या नाहींत; हें सोबतच्या त्यांच्या पत्रावरून दिसून येतें. या संबंधांत माझें म्हणणें येथे मांडतों.

**२. त्रिविध दोष**— रा. प्रियोळकर यांनी दाखविलेल्या माझ्या प्रमादांत कांही लौकिक, कांही शास्त्रीय व कांही शीलविषयक प्रश्न आहेत. पैकी लौकिक गोष्टी म्हणजे मराठींतील अनुस्वारांचें बाहुल्य, रानडे, गुंजीकर अि० विद्वानांचें पूर्वापर्य, व गुंजीकरांची कविता या होत. या तिन्ही बाबतींतील अनवधानदोष दाखविल्याबद्दल मीं रा. प्रियोळकरांचा आभारी आहें. तरी पण पुढील गोष्ट येथे मांडणें अवश्य आहे. 'मुंबअींतील शेटसावकार व दुसऱ्या संभावित लोकांची अेक **सभा मिळविली**' या (प्रस्तावनेंतील) वाक्यांतील दोष मीं दाखविला. यांतील 'सभा मिळविली' या शब्दप्रयोगावरूनच हें वाक्य आधुनिक लेखकाचे नाहीं; अर्थात् त्यांतील दोष प्रस्तावकास चिकटणें शक्यच नाहीं. असा संशय माझ्या मनांतहि आला नाहीं. अशा स्थितींत प्रस्तावक लिहितात–'हें वाक्य माझेंच आहे अशी मोडकांनी आपली खोटी **समजूत करून घेतलेली दिसते**' या विधानांतील स्थूलाक्षरशब्द लेखकांनी योजले नसते तर बरें झालें असतें. रा. प्रियोळकरांना मुद्दाम दोषी ठरविण्यांत कोणतें सार्वजनिक हित मला साधणार? अर्थात् माझ्या स्वप्नांतहि न आलेल्या असल्या गोष्टींबद्दल लिहावें लागणें हा **नसता अुद्योग** मला करावा लागत आहे. यावरून मथळ्याचें समर्थन वाचकांस अुघड होईल.

**३. शास्त्रीय चर्चा**—(क) **जुगार** या शब्दाचें मूळ jogar हा पोर्तुगीज शब्द लेखक देतात व **द्यूतकार** हें मीं दिलेलें मूळ चूक मानितात. येथे पुढील गोष्टी लक्ष्यांत घ्याव्या. (१) द्युत्-पासून ज्योतिस्. यांत द्य-चा **ज** झाला आहे. (२) कर्म कार-पासून काम-गार बनण्यांत **क** चा **ग** झाला आहे. या द्विविध साम्यावरून माझ्या मतें द्यूतकार हें मूळ संशयातीत ठरतें. (ख) **गड** शब्द कटक-पासून व्युत्पादणें सेखकांस संमत नाहीं. 'गढो दुग्गे' असा हेमचंद्राचा आधार देअून, **गढ** हें मूळ लेखक देतात. या संबंधांत माझें म्हणणें– 'हेमचंद्रादि ग्रंथकारांनी देशी म्हणून दिलेले अनेक शब्द वस्तुतः संस्कृतच आहेत' असें अनेक विद्वानांनी आदरिलें आहे. बअिसअि, सोण्णार, भल्ल, तोंद, चंदकव, गोंछ, खुरप्प, अि०शब्द प्राकृत म्हणून देण्यांत आलेले आहेत; पण यांची वास्तव मुळें क्रमाने अुपविंशति, स्वर्णकार, भद्र, तुंद, चंद्रकवत्, गुच्छ, क्षुरप्र अि० अुघड-अुघड दिसतात. अर्थात् बअिसअि सारखे शब्द प्राकृत न मानितां संस्कृताशीं घटना व अर्थ या दोन्ही दृष्टींनी नातेवाअीक असल्याने संस्कृतच मानणें माझ्या मतें योग्य दिसतें. लेखकांस हें पटत नाहीं. त्यांची विचारसंरणी निराळी.

(ग) पावसांत पडणारी 'गार' या शब्दाचें मूळ मी **करका** असें देतों; तर लेखक **ग्रावन्** ठरवितात. या संबंधांत पुढील गोष्टी पाहाव्या. (१) करका-ची **घटना** गार-शीं पुष्कळ मिळते, तशी ग्रावन्-ची मिळत नाही. करका-मध्ये केवळ क मृदु केल्याने काम भागतें; तर ग्रावन-मध्ये व्न् ही व्यंजनें गाळणें यांत अधिक ओढाताण आहे. (२) गार **स्त्रीलिंगी**, तसाच करका. अुलट, ग्रावन् हा पुलिंगी आहे. (३) गार-शीं करका-चें **अर्थदृष्ट्या** अेकत्व आहे; तसें ग्रावन्चें नाहीं. ग्रावन् म्हणजे (कोणताहि) दगड. "तान् कुर्वीथाः तुमुलकरकावृष्टिपाताव-कीर्णान्" (मेघदूत) **अर्थ**–त्यांना खूप गारांच्या वृष्टीच्या माराने झोडून काढ.–अि० ठिकाणीं गारचेंच कार्य करका हा शब्द करीत आहे. अशा रीतीने द्यूतकार, कटक, करका हीं वरील शब्दांचीं मुळें विद्वानांस पटतील अशी अपेक्षा आहे.

**४. शुद्ध व अशुद्ध रूपें**— प्रचारामध्ये अनेक शब्दांचीं दोन-दोन, तीन-तीन रूपें आढळतात. पैकी अेक शुद्ध व अर्थात् अितर अशुद्ध असतात. प्रचारांत आल्याने सर्वच शुद्ध असें जरी मानिलें तरी मार्मिक विद्वान लोक प्रायः शुद्ध रूपच अंगीकारतात. या दृष्टीने गुंजीकरांनी निर्फळ शब्दाहून निष्फळ हा शब्द पसंत केला असता असें माझें म्हणणें होतें व आहे. केवळ 'प्रचारांत आहे' म्हणून जोडीचें निष्फळ हें शुद्ध रूप टाकून निर्फळचा अुपयोग त्यांस रुचला नसता. साम-दान याचे स्थानीं साम-दाम, पांडु-चे स्थानीं पंडु, दुष्ट-चे स्थानीं द्रुष्ट, शनिवार-चे स्थानीं शनवार, पूर्णिमा-स्थानीं पुनव, सर्वारंभाः तंडुलप्रस्थमूलाः यांत 'तंडुलाः प्रस्थमूलाः' याप्रमाणे प्रयोग विद्वानांच्याहि लेखांत आढळतात. पण याचें कारण केवळ शब्द-रूपाकडे अनवधान हेंच होय. अशा प्रकारच्या लेखकांत गुंजीकरांची गणना मी करीत नाही. पण येथे लेखकांचें मत निराळें दिसतें.

**५. गूढार्थ विधान**— शब्दारंभीं नसलेल्या क-चा ग होअूं शकतो. अेतदर्थ आधार वाटेल तितके देतां येतील; अु० (१) क-ग-च-... प्रायोलोपः, (वररुचि), (२) क-ग-च ...प्रायोलुक् (हेमचंद्र), किंवा (३) पिशल-चें प्राकृत व्याकरण पाहिल्यासहि चालेल.—असें लेखक लिहितात.

या विधानाचा अर्थ माझ्या लक्षांत येत नाही. क-चा ग होतो याचें समर्थन पहिल्या दोन आधारांनी कसें होतें, याचा खुलासा लेखकांनी केल्यास बरें. शब्दाच्या आद्य क-चा ग (अथवा प्रथम स्पर्शाचा तृतीय) होअूं शकतो, या माझ्या विधानास जुन्या प्राकृत व्याकरण-कारांस व भाषाशास्त्रज्ञांस ठाअूक नसलेला **मोठा शोध** असें प्रियोळकर वर्णितात. यासंबंधी केवळ पुढील अुदाहरणें मी येथे देतों. कंदुक गेंद, प्रभूत बहुत, पिंड बिंडा, तुंद दोंद.

या अुदाहरणांवरून माझें म्हणणें समर्थित होअील. या गोष्टीला मीं शोध म्हटलें नाही. तिला काय म्हणावें हें ज्याच्या त्याच्या अवलोकनक्षेत्राच्या विस्तारावरूनच ठरणार.

**६ समारोप**— अशा रीतीने मीं दाखविलेल्या शास्त्रीय चुका खऱ्याच चुका आहेत हें दिसून येअील. शेवटीं रा. प्रियोळकर यांस पुढील विनंती करून आपला निरोप घेतों.

पुस्तकावरील अभिप्रायांत कांही गंभीर दोष असले तरच ते निदर्शनास आणावे, आणि अभिप्रायकाचे पदरीं नसत्या हेतूचा आरोप करूं नये.

---

अनुक्रमणिका

# सुलभ अंकवाचनपद्धति

(लेखक— श्री. पां. ह. निजसुरे)

अेक शिक्षक आपल्या विद्यार्थ्याला २७ × ७ = १८९ सत्तावीस सत्ते 'अेकोणनव्वदाशे' लिहावयाला शिकवीत होते. व त्या बालकाला तोंडाने अेकोणनव्वदाशे म्हणून हाताने लिहितांना फार अडचण पडत होती. शिक्षकांनी आपल्याकडून त्याची समजूत पाडण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु त्या मुलाची अडचण त्यांच्या लक्षांत येअीना व त्या मुलाला १८९ हा अंक लिहिणें व वाचणें यांची सांगड घालतां येअीना. आठावर नअू अेकोणनव्वद हा मंत्र त्या मुलाचा नीट पाठ झाला नसावा असा प्रथम मीं निष्कर्ष काढला, परंतु नंतर आपलें अंकलेखन व वाचन यांच्यामधील विसंगतीकडे माझें लक्ष वेधलें व पुढील विचार अुद्भवले. ते वाचकांपुढे सादर केले आहेत.

**अंकवाचनांतील दुर्बोध स्थानें**—(१) अेक आण्याला सहा नारिंगें तर अि० असा तोंडचा हिशेब आपण मुलांना विचारतों व सहाच्या अैवजी मुलें दहा अैकतात व घोटाळतात.

(२) पंचेचाळीस, सत्याहत्तर, चौऱ्यायशी वगैरे अंकांची वाचणी व लेखनपद्धति यांमध्ये विरोध दिसून येतो. कारण, वाचतांना पंचे (५), चाळीस (४०) असें आपण वाचतों व लिहितांना ४ काढून त्यावर ५ लिहितों. त्यामुळे ११ ते ९९ हे अंक 'अेकावर अेक अकरा' वगैरे तऱ्हेने मुखोद्गत करावे लागतात.

(३) अेकोणतीस, अेकोणचाळीस अित्यादि अंकांची वाचणी अगदीच विपरीत वाटते. अठ्ठावीस झाल्यानंतर अेक आहे अुणा ज्या तिशीं अशी अेकदम पुढे अुडी मारून पुन्हा अर्धी माघार घेण्याचा प्रकार करावा लागतो.

(४) २४ × ७ = १६८ अडसष्टाशे ही वाचणी पाहा. लिहितांना अेक क्रम व वाचतांना अगदी विरुद्ध. अड (८), सष्ट (६०) व शे (१००) अशा अडचणींनंतर मुलें गोंधळून जातात. अशा अंकांची अेकशे अडसष्ट अशीहि वैकल्पिक वाचणी आहे, परंतु ती पाढे पाठ करतांना वापरीत नाहीत.

(५) २७ × ७ = १८९ अेकोणनव्वदाशे अशी वाचणी आली म्हणजे मुलांची फारच कुचंबणा होते.

**अिंग्रजी अंकांशीं तुलना**— (१) पहिल्या दहा अंकांमध्ये संशय अुत्पन्न करणारे अंक नाहीत. (२) अकरा (Eleven-ten and one left) आणि बारा ते अेकोणावीस (Twelve-two and ten, etc.) या अंकांची वाचणी व लेखनपद्धति यांमध्ये विरोध आहे. (३) अेकवीसपासून शंभरपर्यंतची वाचणी मात्र लेखनपद्धतीशीं जुळती आहे. (४) तीनअंकी संख्यांबद्दल निराळा विचार करण्याची आवश्यकता नाही.

**नवीन सुगम वाचनपद्धति**— (१) 'सहा व दहा' आणि 'दोन व तीन' या दोन जोड्यांची वाचणी पाहतां पहिलीमध्ये 'हा' हें दीर्घ अक्षर व महाप्राण व्यंजन नपुढे आल्यामुळे

अनुक्रमणिका

स व द यांचा अुच्चार घोटाळा अुत्पन्न करतो. तसें दुसऱ्या जोडीमध्ये होत नाही. कारण 'न' हें ऱ्हस्व असून 'दो' व 'ती' हीं दीर्घ अक्षरें त्या दोन अंकांचा स्पष्ट बोध करण्यास समर्थ आहेत. तेव्हा अेक ते नअू हे अंक तसेच ठेवून 'दहा'च्या अैवजी 'दस' ही वाचणी रूढ करावी.

(२) दस, वीस ते नव्वद या दसकव्यांपैकी चाळीस → चाळ, पन्नास → पन, सत्तर व नव्वद् असा फरक करावा.

(३) मधील अंकांची वाचणी दसेक, दस्दोन, दस्तीन, वीस्चार, तीस्पांच, चाळ्सहा, पन्सात, साठाठ याप्रमाणे सिद्ध करावी.

(४) तीनअंकी संख्यांची वाचनपद्धति शेवीस्तीन (तेविसाशे) अशा प्रकारची होअील.

सदरहू पद्धति ही समजायला सोपी व मौलिक आहे असें आढळून येअील. अेखाद्या अगदी अडाणी मनुष्याशीं व्यवहार करतांना अशाच प्रकारची योजना करावी लागते. अुदाहरणार्थ, त्याला 'रुपयाला पंचवीस पैंदे' हा हिशोब कळत नाही. परंतु वीस पांच लवकर कळतात. तेहतीसकरिता तिस्तीन हा शब्द आपण अधिकमासांत वापरतोंच. त्याचप्रमाणे बाराच्या अेका दानाकरिता तिफाशीमध्ये दस्दोन हा शब्दहि रूढ आहेच. तेव्हा हें अंकवाचन अगदीच नवीन आहे असें नाही.

जुनी पद्धति ही हाडींमासीं खिळली असली तरी प्रौढ लोकांनी मनांत आणल्यास व प्रयत्न केल्यास नवीन वाचनपद्धति हळूहळू अुचलतां येअील. नवीन मुलांना शिकविण्याकरिता शिक्षकांना मात्र आत्मसात् करावी लागेल. संक्रमणकालांत १४६ सारख्या संख्यांना जशी वैकल्पिक वाचणी असते त्याप्रमाणे २३ सारख्या संख्यांना तेवीस व वीस्तीन अशा दोन तऱ्हेची वाचणी राहील व हळूहळू नवीन सुगम अंकवाचनपद्धति रूढ होअील. अशाप्रकारें अंकवाचन व अंकलेखन यांमधील विसंगति दूर होअून आपल्या क्रमांकांना थोडा सुटसुटीतपणा येअील व तर्कशुद्धतेचा पाया रचला जाअील आणि अंकांबद्दल व अंकगणिताबद्दल अुत्पन्न होणाऱ्या तिरस्काराचें मूळ नष्ट होअील.

---

## रद्दींतील रत्नें—

### चहाच्या प्याल्यांतील बुडबुडे

"प्र०— चहाच्या प्याल्यांतील बुडबुडे बाजूस कां जातात ?
अु०— प्याला त्यांस आपल्याकडे आकर्षित करितो.
प्र०— लहान लहान बुडबुड्यांचें मोठमोठ्या बुडबुड्यांकडे जाण्याचें प्रावण्य कां असतें ?
अु०— मोठे बुडबुडे महत्त्वामुळें लहान लहान बुडबुड्यांस आपल्याकडे ओढून घेतात.
प्र०— चाहाचे प्याल्यांतील बुडबुडे कां जातात ?
अु०— चहाचा चमचा त्यांस आपल्याकडे ओढून घेतो."

— शास्त्रीय ज्ञानदर्शन, अि. स. १८५६ (किरकोळ विषय).

---

# सभासदाची बखर

(लेखक—श्री. न. शे. पोहनेरकर)

साहित्यपरिषदेकडून मराठी वाङ्मयाच्या ज्या परीक्षा कांही वर्षांपासून घेण्यांत येत आहेत त्यांपैकी 'प्राज्ञ' या पहिल्या परीक्षेच्या अभ्यासक्रमांत प्रस्तुतची बखर नेमिलेली आहे. मराठींतील गद्य वाङ्मयाचा विचार करितांना बखरींचा अेक स्वतंत्र वर्गच करावा लागेल अशा प्रकारचें त्यांचें महत्त्व आहे. मुसलमानांच्या राजवटीने मराठी भाषेवर केलेले संस्कार आणि त्यामुळे नवीन शब्दांची आणि सजावटीची होत आलेली 'संचणी' ही मराठीच्या अभ्यासूला मनोरंजक आणि बोधप्रद अवश्य वाटेल.

सुल्तानी वैभवाच्या धकाधकींत बखरवाङ्मयाचा जन्म झाला असल्यामुळे हें वाङ्मय अभ्यासितांना त्यांत आलेल्या शब्दांचे अर्थ त्या त्या भाषांच्या परंपरेप्रमाणेच लावणें अिष्ट असतें. अुर्दू व फारसी या दोन भाषांचा सहवास मराठी-संस्कृत प्रमाणेच अेकजीवपणाचा आहे. म्हणूनच आम्हां हैदराबादवासीयांना या प्रकारच्या शब्दांचे अर्थ जितक्या सुलभ रीतीने स्पष्ट होतात तितके आमच्या दूरस्थ अभ्यासी बांधवांना होणें प्रायः कठीण आहे. बखरींतील कांही कांही शब्द आजहि आमच्या व्यवहारांत आणि वागण्यांत आम्हांला आढळतात. या दृष्टीने पाहतांना अर्थाची जी थोडीशी 'तफावत' पडते तिचा आज विचार करण्याचें ठरविलें आहे. प्रस्तुतच्या छोट्या लेखांत अुदाहरणादाखल असे कांही शब्द देअून अभ्यासी बांधवांना अेका फेरविचाराची विनंती करावयाचा विचार आहे.

'अनाथ': — 'वस्त्रें, भूषणें, अश्व देअून अनाथ करून सोडिले' (पा २२)

'तीस कौल देअून अनात करून सोडिली' (पा. ६४) यावरील टीपेंत 'जेथें जेथें हा शब्द आला आहे तेथें तेथें मूळांत 'अनात' (अजात) असें दिसतें' (पा. २२) आणि 'अनात-अनाथ' (पा. ६४) असा खुलासा केला आहे. परंतु ज्या प्रसंगाने वरील शब्द अुपयोजिला आहे त्याचा विचार केला असतां तेथे 'अ-नाथ' पेक्षा 'स नाथ' हा शब्दच शोभला असता आणि बखरकाराला 'अनाथ' या शब्दाचा पूर्ण अर्थ माहीत असतांहि ज्या अर्थी तो 'अनात' हाच शब्द देतो त्या अर्थी आमच्या मतें 'अिनायत' या अुर्दूफारसी शब्दापासूनच त्याने तो अुचललेला दिसतो. व्यवहारांत 'अिनायत' याचा अर्थ 'दया, कृपा' असा आजहि आम्ही करितों. प्रसंगाचा विचार करितां 'दया आणि कृपा' असाच 'अनात'(अिनायत)चा अर्थ केला असतां जास्त योग्य होअील. 'अजात' किंवा अनाथ' अशी त्याची अुपपत्ति बरोबर दिसत नाही.

'मुलाजमत'—'त्यांची तुमची मुलाजमत होअील' (पा. १४)
'शिवाजी राजियाचे भेटीस येअीन. मुलाजमत घेअूं' (पा. १४)
'पातशहाचे मुलाजमतीस घेअून जाअून' (पा. १५)
'शिवाजी राजे मुलाजमतीस येतात' (पा. ४५)

'पातशहाशी भेट घेणें तरी घ्या. नाहीं तरी मुलाजमत माफ करवितों' (पा. १०)

टीपेंत या शब्दाचा अर्थ 'भेट' असा दिला आहे, परंतु व्यवहारांत भेट अशा अर्थाने आज हा शब्द अुपयोगांत नाही. भेट या अर्थाचा 'मुलाकात' असा वेगळा शब्द असून नोकरी किंवा चाकरी अशा अर्थानेच 'मुलाजमत' हा शब्द अुपयोजित असतात. 'मुलाजम' म्हणजे नोकर आणि 'मुलाजमत' म्हणजे नोकरी असे या शब्दांचे आजहि रूढ अर्थ आहेत. वरीलपैकी शेवटच्या वाक्यांत 'भेट' आणि 'मुलाजमत' हे दोन्ही शब्द आले असल्याने बखरकारहि भेट या अर्थाने मुलाजमतचा अुपयोग करितांना दिसत नाही. जहागिरी मिळावयाच्या त्या नोकरीच्या मोबदल्यांत ! पण 'मुलाजमत माफ' असें म्हणण्यांत चाकरी देखील माफ घडवून तुम्हांस नुसतीच जहागीर देअूं असें म्हणण्याचाच प्रामुख्याने अुद्देश आहे.

**'तसलीम'**:–'असें बोलल्यावर रामसिंगानीं तसलीम करून डेरियास आले' (पा. ५२) टीपेंत 'तसलीम'चा अर्थ 'सलाम' मुजरा' असा दिला आहे. सलाम आणि तसलीम यांच्या स्वरूपसादृश्यावरून अशी कल्पना योग्य वाटली तरी तसलीम शब्दाचा अर्थ 'मान्य, कबूल' असाच वास्तविक आहे. 'आदरपूर्वक मान्य करणें' असा याचा भावार्थ आहे.

**'मजलस'**:— 'पादशहाची मजलस कळली' (पा. ४७)

टीपेंत 'मजलस' चा अर्थ 'मसलत' असा दिला आहे परंतु 'मजलिस' हा शब्द 'बैठक' असा अुपयोगितात आणि 'जलसा' शब्दापासून त्याची अुपपत्ति साधलेली आहे. पादशहाचा दरबार कळला असें शिवाजी म्हणतो. नाही तरी आग्र्यास प्रत्यक्ष जाण्यांत दरबार व पद्धति यांची सूक्ष्म तपासणी करणें हा शिवाजीमहाराजांचा अुद्देश नसेलच असें म्हणण्यास काय पुरावा ?

**'दावा लाविला'**:—'चहूं पादशाअींत दावा लाविला' (पा. ५८)
'आपणास अेक विजापूरचे पादशाहीशी दावा, भागानगरकराशी दावा, व मोंगलाशी दावा, असे तीन दावे सोसवत नाहींत' (पा. ५९). 'चार पादशाहीशी दावा लाविला' (पा. १) टीपेंत याचा अर्थ 'हक्क सुरूं केला, अंमल बसविला' असा दिला आहे. परंतु 'दावा' याचा असा अर्थ नाही. मराठींत 'दावेदारी' हा शब्द वैर अर्थाने आपण जसा वापरतों तोच अर्थ वरच्या अर्थापेक्षा अुचित दिसतो. 'प्रतिज्ञा किंवा पण' अशा अर्थाने 'दावा' हा शब्द प्रचारिला जातो. 'पैज, शर्यत' असाहि त्याचा अर्थ करितात. पैज लाविली, शर्यत बांधिली असें म्हणण्याचाच बखरकारांचा हेतु येथे स्पष्ट आहे.

**'अमानत'**:— 'मीरासदार...मनास मानेसारखे आपण घेत होते ते सर्व अमानत करून जमीनदारांस गल्ला व नख्त गांव पाहून...हक्क बांधून दिला' (पा.३१). 'मना, तहकूब' असा या शब्दाचा अर्थ दिला आहे; परंतु 'मीं रकम अमानत ठेविली आहे' अशा साध्या वाक्यांतहि 'सुरक्षित आणि शिलक' असाच 'अमानत'चा अर्थ होत असून तोच येथेहि विवक्षित असतांना दिसतो.

**'बैले'**:— 'बैले तोफाची पायअुतार जाहाले' (पा.४०). 'पठाण, तीरंदाज...बहिले, बंदुकी, तोफखाना असा होता' (पा.८१). बैले किंवा बहिले याचा अर्थ प्रो. सुरेंद्रनाथ सेन यांच्या 'पादचारी शिपाअी' या अर्थाप्रमाणेच 'पायाचे लोक, पाअीक' असा दिला आहे. परंतु

रोहिले, पठाण यांच्याप्रमाणेच बहिले हेंहि अेका जमातीचें नांव आहे. कांही प्रतींत रोहिले असा प्रतिपाठ जो सांपडतो त्यावरूनहि वरील गोष्टच सिद्ध होते. 'तोफाची' म्हणजे 'तोफची' असा मूळ शब्द. आणि तोफा डागणारा, गोलंदाज असा त्याचा अर्थ स्पष्ट आहे. 'खजानची' हा शब्द आपल्या सर्वांच्या परिचयाचा आहेच. अर्थात् पान ४० वरील वाक्याचा अर्थ 'बहिले जातीचे गोलंदाजहि पायअुतार झाले' असा सरळ लागू शकतो. पाअीक किंवा पादचारी शिपाअी असा त्याचा अर्थ बरोबर नाही.

**'दस्त करणें'**:—'मावळे देशमुख बांधून दस्त करून पुंड होते त्यास मारिले.' (पा.४).

दस्त करणें याचा 'धरणें' असा दिलेला अर्थ बरोबर नाही. अमल खाली आणणें, जिंकणें असा त्याचा अुपयोग करितात. 'जेरदस्त' असा मूळ शब्द असून अंकित करणें हाच त्याचाहि अर्थ आहे. 'धरणें' याचा अर्थ पकडणें असा असल्याने तो प्रसंगोचित नाही.

**'कौल'**:— 'अरे तूं कौल घे' (पा.४१).

'मावळे लोकांना कौल देअून संचणी केली' (पा.७).

'आमच्या स्वाधीन हो' आणि 'वसाहत करावी अशाबद्दल सरकारी लेख' असें याचें स्पष्टीकरण टीपेंत केलें आहे. परंतु 'कौल आणि कबूलियत' या व्यवहारांतील रोख्यांचा अर्थ पाहिला तर, आणि परंपरेचा अर्थ बघितला तर, तो 'अिमान, प्रमाण, वचन, अभय' अशा प्रकारचा दिसतो. प्रसंगानुसार विचाराने हाच अर्थ अुत्तम प्रकारें लागू पडतो हें निराळें लिहिणें नकोच.

अुदाहरणादाखल कांही शब्दांसंबंधी वर अुल्लेख केला आहे. ही यादी अजूनहि पुष्कळच लांबवितां येते. कोठलेहि का असेनात वाङ्मयांतील असले जुने शब्द परंपरेवरून अर्थ लाविल्यानेच जास्त स्पष्ट होतात, नाहीतर त्यांत क्लिष्टपणा येअून अनेकांच्या अनेक तर्कांना वाव मिळतो. अशा प्रकारचे आणखीहि पुष्कळ शब्द आहेत. भतीजा = भाचा. हवाला = ताबा, ताब्यांत दिलेला मुलुख. सामान = लोक, जमाव. मांडें = तोफ. गुंजाअिस = चुकी, कसर. हेहि अर्थ व्यवहाराशीं पूर्ण पटतील असे नाहीत. अशा शब्दांची संख्या बरीच मोठी सांपडते.

तज्ज्ञांच्या नियंत्रणाखाली अशा शब्दांबद्दल मवति न मवति करून अर्थनिर्णायक टीपा तयार करण्यांत आल्यास त्या अभ्यासकास निश्चितार्थासाठी फार अुपयोगी पडतील. सवडीप्रमाणे अशा सर्व शब्दांची अेक टिप्पणी तयार करावी असा विचार आहे.

विशारद परीक्षेस नेमिलेल्या भाअूसाहेबांच्या बखरींतहि अशी शिथिलता आढळून येते. त्यासंबंधीहि केव्हा तरी सवडीनुसार विचार करूं.

मूळांतील टीपांचा दोष दाखविणें हा या विवेचनाचा अुद्देश नाही. आमच्या व्यवहारांत हे शब्द आजतागायत असल्याने यांचा स्पष्टार्थ आम्ही जसा दाखवूं तशी तिकडे शक्यता प्रायः नसते, अेवढेंच दाखवून तज्ज्ञांना विनंती करणें अेवढाच आमचा वस्तुतः अुद्देश आहे.

———

# हिंदुधर्माच्या समीक्षेचें समर्थन

(लेखक-- तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वाअी)

**प्रस्ताव**— मराठीचे प्रख्यात लेखक श्री. नानासाहेब चापेकर यांनी साहित्य पत्रिकेच्या गेल्या अंकांत 'हिंदुधर्माची समीक्षा' या माझ्या पुस्तकावर विस्तृत परीक्षण लिहिलें आहे. त्यांनी अितके परिश्रम घेतल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

**प्रस्तुत टीकाकारांची विकारवश दृष्टि**— कोणत्याहि तात्त्विक लेखनाचें परीक्षण करतांना ज्या तऱ्हेची मनःस्थिति आवश्यक असते, तशी मनःस्थिति हें परीक्षण करीत असतांना श्री. नानासाहेबांची नव्हती, ही गोष्ट त्यांच्या अुपन्यासाच्या प्रारंभिक वाक्यांवरूनच व्यक्त होते. बौद्धिक चर्चा भावनांच्या भरांत चांगल्या रीतीने करणें शक्य नसतें, ही गोष्ट अितकी सर्वशास्त्रसंमत आहे की, तिचें मानसशास्त्रदृष्ट्या समर्थन करण्याची आवश्यकताच नाही. हें पुस्तक वाचण्याच्या पूर्वक्षणींचा विकार 'आशाळभूतपणा' हा होता; पुस्तक वाचल्यावर 'निराशा, क्लेश व अुद्वेग' ह्या भावना 'अनावर' झाल्या. ते म्हणतात "माझी **आशा फोल** झाली, असें मोठ्या कष्टाने म्हणावें लागतें. अेवढेंच नव्हे तर पुस्तक वाचतांना वारंवार मन **उद्विग्न** होण्याचे प्रसंग येत त्या वेळेस **संयमन** करणें थोडेंसें जड जाअी." अेखादें प्रतिपादन असंमत आहे, म्हणून विकारवश होण्याची काय आवश्यकता ? तशी विकारवशता येअूं शकते, पण त्या विकारांच्या योगाने त्या विचारांचें असत्यत्व सिद्ध होअूं शकत नाही. विचारांचें खंडन विचारच करूं शकतो, विकार नव्हे. अेखादें गणित चुकीचें आहे हें क्रोधाने, तिरस्काराने किंवा रडण्याने कसें सिद्ध होणार ?

**धर्मसमीक्षेचें प्रतिपाद्य काय ?**— श्री. नानासाहेबांचा आक्षेप असा आहे की, मी 'या विद्यापीठाच्या व्याख्यानांत नास्तिकवादाची स्थापना करण्याचा प्रयत्न केला आहे.' नास्तिकवादाची स्थापना म्हणजे काय याचा अर्थ माहीत नसल्यामुळे हें विधान आमचे टीकाकार करतात. नास्तिकवादाची स्थापना म्हणजे अीश्वर, आत्मा, परलोक, अदृष्ट पापपुण्य, अलौकिकदिव्यप्रमाण अित्यादि पदार्थांचें समर्थन करणाऱ्या युक्तिवादाची मांडणी करून त्याचें विरुद्ध युक्तिवादाने निराकरण करणें. परंतु हा माझा मुख्य प्रतिपाद्य विषय नाही. तो या पुस्तकांतील अेका विचारसरणीचा अंगभूत विचार आहे, अेवढेंच. नास्तिकवादाची मांडणी मीं 'जडवाद' या पुस्तकांत केली आहे, या पुस्तकांत नव्हे. बुद्धिप्रामाण्य स्वीकारून हिंदुधर्माची अैतिहासिक समीक्षा करणें, हा या पुस्तकाचा मुख्य अुद्देश आहे. या अुद्देशाच्या सिद्धीकरिता मीं मानवजातिशास्त्रांतील धर्मविषयक व धर्मसंस्थाविषयक अैतिहासिक व तात्त्विक विवेचनाचें अवलंबन करून हिंदुधर्माच्या अैतिहासिक परिणतिक्रमाची साकल्याने व सामान्यरूपाने मीमांसा केली आहे.

समजा की, या पुस्तकांत सगळा नास्तिकवादच भरला आहे असें सिद्ध झालें; म्हणून अेवढ्याच कारणास्तव या पुस्तकांतील हा विचार चुकीचा आहे, असें कसें सिद्ध होणार? नास्तिकवाद म्हणजेच चुकीचा विचार असें कोणताहि मस्तिष्कवान् आस्तिक किंवा नास्तिक म्हणूं शकत नाही. अेकाहि धार्मिक हिंदुधर्मी तत्त्वज्ञास ही कल्पना मान्य नाही. नास्तिकवाद चुकीचा असल्यास तसें प्रमाणपद्धतीच्या अंगीकाराने सिद्ध करावें लागतें. तसें हिंदुतत्त्वज्ञांनी केलें आहे.

**धर्मसमीक्षेचें प्रमाण व धर्मप्रमाण**— कोणत्याहि धर्मसंस्थेचें दिव्य संदेशावरील किंवा धर्मग्रंथावरील निरपेक्ष श्रद्धा हें अधिष्ठान असतें. तें श्रद्धेचें अधिष्ठान स्वीकारून ही समीक्षा मीं केली नाही म्हणून जर या समीक्षेस नास्तिकवादी म्हणावयाचें असेल, तर माझी त्यास हरकत नाही. मानवी बुद्धि हेंच समीक्षेचें साधन किंवा प्रमाण स्वीकारून मीं धर्मसमीक्षा केली आहे. वरील प्रकारची श्रद्धा हें अधिष्ठान स्वीकारलें तर त्या स्वतःप्रमाण धर्मग्रंथांशीं व संदेशांशीं सुसंगत अशी सामाजिक संस्था व विचारसरणी कोणती किंवा त्यांच्याशीं विसंगत सामाजिक स्थिति व विचारसरणी कोणती अेवढेंच धर्मचर्चेचें क्षेत्र बनतें. धर्मसंस्थेची अैतिहासिक परिणति कशी झाली; त्या त्या धार्मिक विचारांचा व संस्थांचा समाजावर व सामाजिक प्रगति-अवनतिदर्शक परिस्थितीवर काय अनुकूल-प्रतिकूल परिणाम झाला; ते ते धार्मिक आचार व त्या त्या धार्मिक घटना किंवा संस्था यांचीं सामाजिक व अैतिहासिक मूल्यें काय आहेत; अित्यादि गोष्टींचा अुलगडा करणें ही गोष्ट त्या श्रद्धेच्या मर्यादेंत बसत नाही. कारण मग प्रगति व अवनति, विकास व कुंठित गति अित्यादि मूल्यें केवळ त्या अलौकिकप्रमाणांच्या कसोटीनेच ठरवावीं लागतात. याकरिता धर्मसमीक्षेचें साधन मानवबुद्धि होय, अलौकिक शास्त्रप्रमाण नव्हे, हें मीं पहिल्यांदा सांगितलें.

धर्मतत्त्वनिर्णयप्रसंगीं सगळ्यांत प्रथमतः हाच मुद्दा ठरवावा लागतो. जगांतील कोणतेहि अुच्च धर्मग्रंथ घ्या किंवा धर्मांचीं अैतिहासिक व तात्त्विक समीक्षणें घ्या, त्यांत पहिल्यांदा याच मुद्याचा अुलगडा केलेला असतो. त्याशिवाय आदेश, अुपदेश, प्रवचन, विवरण, समीक्षण सुरूच होअूं शकत नाही. गौतम, आपस्तम्ब, मनु, जैमिनि, कणाद, बादरायण, व्यास अित्यादि दर्शनकार व धर्मशास्त्रकार ह्याच मुद्याचा पहिल्यांदा खुलासा करतात. लो० टिळकांनी देखील गीतेचें व स्थितप्रज्ञाचें स्वतःप्रामाण्य धरूनच मुख्य धर्माधर्मविचार केला आहे; मानवी बुद्धिवादाला द्वितीय स्थान दिलें आहे, प्रधानस्थान नव्हे. मीं मानवबुद्धीला प्रधानस्थान दिलें आहे. प्रमाणचर्चा मानवबुद्धीच्या व्यवस्थित प्रवृत्तींचें अपरिहार्य अंग आहे.

मानवी बुद्धि हीच अेकदा प्रमाण मानल्यावर धर्मांतील सर्व पारलौकिक विचार, अीश्वर, परलोक अित्यादि वस्तु काल्पनिक ठरतात. त्यांचें सत्यत्व अलौकिक अनुभव किंवा दिव्य शब्दप्रमाणच ठरवूं शकतें. हा मुद्दा मींच नवीन सांगत नाहीं. भारतीय तत्त्वज्ञानांतील विचारसंपत्तीचा ज्यांना थोडा तरी सुगावा असेल, त्यांच्या हा मुद्दा फार जुना आहे हें झटदिशी लक्ष्यांत येअील. 'धर्मवस्तु मानुषबुद्धिगम्य नाही' हें समजण्यास बुद्धिवादाच्या सगळ्या कक्षा लक्ष्यांत घ्याव्या लागतात. त्याकरिता बुद्धिवादाचें फार अुच्चदर्शेत पोंचलेलें शास्त्र माहीत असावें लागतें. बुद्धिवादाचें शास्त्र अितक्या अुच्च अवस्थेला अडीच हजार वर्षांमागेच प्राचीन भारतीय दार्शनिकांनी पोचविलें आहे. मानवांच्या सामान्य बौद्धिक मर्यादेंत अलौकिक धर्मवस्तूंचा म्हणजे अीश्वर, परलोक, पुनर्जन्म, मोक्ष, आत्मा अित्यादि पदार्थांचा

**निश्चय** करतां येतो असें जे समजतात, त्यांचें मानवबुद्धि व विचार यांच्यासंबंधी असलेलें ज्ञान अक्षरशः कोतें असतें. त्यांचा बुद्धिवाद मावडा, ओबडधोबड, दुबळा, गांवठळ आणि रानटी असतो. पूर्वोत्तर मीमांसेमध्ये धर्मवस्तु—ओश्वर, आत्मा, परलोक, पापपुण्य अित्यादि पदार्थ,—केवळ अलौकिक-प्रमाणगम्य आहेत, बुद्धिगम्य नाहीत, असें निश्चित केलें आहे; ते पदार्थ बुद्धिगम्य नाहीत अेवढेंच नव्हे तर त्याचें सत्यत्वही नाशावित करण्याचें काम 'पुरुषबुद्धि' (मीमांसेंतला 'मानवबुद्धि' याचा पर्यायशब्द) करूं शकते, असेंहि पूर्वोत्तरमीमांसक कुमारिल भट्ट, शंकराचार्य अित्यादि आचार्य मांगतात. हा सिद्धान्त बुद्धिविद्येच्या म्हणजे तर्कविद्येच्या अुच्च परिणतीचा दर्शक आहे. या मताचा सर्वांगीण परामर्श पुस्तकाच्या दुसऱ्या व्याख्यानांत घेतला आहे.

ज्यांना बुद्धिवादाच्या साहाय्याने हिंदुधर्मतत्त्वांचें रक्षण करा[illegible] [illegible] याची आहे, त्यांनी हिंदुधर्माचे थोर आधारस्तंभ असे जे पूर्वोत्तर मीमांसक : शंकराचार्य [illegible]क, त्यांनी बुद्धिवादाचें जें रहस्य अुलगडून दाखविलें आहे, तेथपर्यंत जरी मजल मारली, तरी हिंदुसमाजावर फार अुपकार होतील.

**हिंदुधर्म शब्दप्रामाण्यावर अुभारलेला नाही ?**— हिंदुधर्म अलौकिक शब्दप्रामाण्यावर अुभारलेला नाही, असें श्री. चापेकर म्हणतात. या विषयासंबंधी तीन आधार त्यांनी मांडले आहेत. अेक गीतेचा, दुसरा रूढीचा व तिसरा योगशास्त्राचा. गीतेचा आधारः—श्री. चापेकर म्हणतात की, '**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन**' या वाक्याने वेदांचें प्रामाण्य झुगारलें आहे. या वाक्यांत वेद अप्रमाण म्हणजे वेदांतील यज्ञप्रतिपादन किंवा कर्मकांडप्रतिपादन चुकीचें आहे; असें कोठे म्हटलें आहे ? कोणताहि ग्रंथ चुकीचा म्हणजे अप्रमाण आहे याचा अर्थ असा होतो की, त्यांतील माहिती चुकीची आहे, त्यांत ज्या विषयाचें प्रतिपादन केलें आहे तें चुकलें आहे; अुदाहरणार्थ, अमुक अेक ज्वरविषयक वैद्यकीचें पुस्तक अप्रमाण आहे, असें म्हटलें म्हणजे त्याचा अर्थ असा होतो की, त्यांतील ज्वरसंबंधी विवरण आणि त्यावरील अुपाय चुकीचे आहेत. श्रीकृष्ण अर्जुनास असें सांगत नाही की, वेदांतील यज्ञसंबंधी विवरण चुकलें आहे. श्लोकाचा वाच्यार्थ असा की, 'वेदांचा विषय त्रैगुण्य आहे; अर्जुना, तूं त्रिगुणातीत हो.' हें वाक्य 'मुला, हें पुस्तक वैद्यकीचें आहे; तूं अंजीनियर हो' या वाक्यासारखें आहे. येथेच नव्हे तर गीतेंत कोठेहि वेदांतील माहिती चुकीची आहे, असें म्हटलें नाही. अुलट वेदांचा विषय जो कर्मकांड त्याचें यथार्थत्वच गीता सांगते. '**यज्ञात् भवति पर्जन्यः**' हा वेदसिद्धान्त आहे. वरील (विवादविषय) गीतावाक्याचा असा अभिप्राय आहे की, त्रिगुणात्मक विनाशी द्वन्द्वमय संसारांतीलच स्वर्गादि फलें असून तींच फलें प्राप्त होण्याकरिता वैदिक कर्मे सांगितलीं असल्यामुळे त्या फलांच्या प्राप्तीकरिता वैदिक कर्मे न करितां, ज्या योगाने त्रिगुणातीतता प्राप्त होअील अशा मार्गाने जा.'' अेवढेंच नव्हे तर वेदांतील यज्ञकर्मेंच काम्यबुद्धि सोडून कर असें गीता वारंवार सांगते. या तऱ्हेचा गीतेचा अभिप्राय असल्यामुळे गीता वेदांना प्रमाण मानीत नाही, असें म्हणावयास मुळींच आधार नाही. वैदिक काम्य कर्मांची मोक्षसाधनाच्या दृष्टीने निंदा गीतेने केली आहे. त्यावरून वेदांचें अप्रामाण्य गीता ठरविते, असें जो म्हणेल त्याच्या बुद्धिमत्तेची कीव केली पाहिजे. वरील वाक्याचा अर्थ माझ्याप्रमाणेच सर्व टीकाकारांनी, शंकराचार्यांपासून तों टिळकांपर्यंत, केला आहे. मोक्षमार्गासंबंधी जो वेदभाग आहे त्याचा तर गीतेने पूर्णप्रमाणतया स्वीकार केला आहे. तसेंच धर्माधर्मविवेचक वेदभागहि पूर्णप्रमाण आहे, असें गीतामत आहे. 'सर्वे वेदा यत्पदमा-

मनन्ति', 'यः शास्त्रविधिमुत्सृज्य', 'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते', 'ब्रह्मसूत्रपदैश्चैव' यांत साक्षात् वेदांचेंच प्रामाण्य सांगितलें आहे. **गीता शब्दप्रामाण्यवादावर किंवा अलौकिक प्रामाण्यवादावरच अुभी आहे.** 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया अुपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं' येथे तत्त्वदर्शींचा अुपदेश प्रमाण सांगितला. गीताशास्त्र हें साक्षात् अीश्वराचा शब्द म्हणूनच प्रमाण आहे, असें गीता सांगते. 'अहं विवस्वते योगं प्रोक्तवान्' अि० पाहा. मूल-शास्त्र न पाहतां कर्णोपकर्णी अैकलेल्या माहितीवर वाटेल तीं विधानें ठोकणें हें ज्ञानपरंपरेला धोका अुत्पन्न करतें.

अनुभव हें अध्यात्मांत किंवा धर्मांत वरिष्ठ प्रमाण म्हणून सांगितलें आहे; पण तो अनुभव शब्दप्रमाणाचा निःशंक स्वीकार केल्यावरच प्राप्त होतो, ही अट अपरिहार्य (sine qua non) म्हणून धर्मशास्त्र किंवा अध्यात्मशास्त्र सागतें. श्री. चापेकरांनी योग-शास्त्राची पहिलीं दहावीस वाक्येंसुद्धा वाचण्याची तसदी कधी घेतलेली दिसत नाही; तरी ते मला म्हणतात की, मीं योगशास्त्राची अुपेक्षा केली. योगशास्त्राच्या पहिल्याच प्रकरणांतील सातव्या वाक्यांत धर्माचें अेकच प्रमाण आगम म्हणून सांगितलें. सर्व योग्यांचा सर्वांत पहिला गुरु अीश्वर असें चोवीसाव्या वाक्यांत सांगितलें आहे. तो पहिला गुरु अीश्वर अुपदेश करून योगमार्ग सांगतो. तात्पर्य, शब्दप्रामाण्य किंवा अलौकिकप्रमाण हा धर्मसंस्थेचा पाया आहे हें माझें तत्त्व अबाधित ठरतें. जैमिनि[1] बादरायण, कणाद, सर्व स्मृतिकार व जगांतील सर्व धर्मसंस्था माझेंच मत खरें आहे, असें कानठळ्या बसतील अितक्या अुच्चरवाने सांगत असतांना ज्यास अैकूं येत नाही तो बहिरा, व ज्यास वाचतां येत नाही तो अंधळा होय. बौद्ध-जैन सुद्धा वीतराग मुनींच्या शब्दांचें प्रामाण्य सांगतात. हा असा मुनि असूं शकतो, ही गोष्ट बुद्धिप्रमाणाने सिद्ध होत नाही हें पूर्वोत्तर मीमांसकांनी सुद्धा कबूल केलें आहे.

श्री. चापेकर आणखी अेक शास्त्रदुष्ट विधान यासंबंधी करतात. "ज्या ठिकाणीं शब्द-प्रामाण्य आहे त्या ठिकाणीं रूढीचा अंमल चालत नाही. हिंदुधर्म तर रूढीने बद्ध झालेला आहे, या अेकाच गोष्टीवरून हिंदुसमाज शब्दप्रामाण्यवादी नाही ही गोष्ट शास्त्रीबुवांच्या लक्ष्यांत यावयास पाहिजे होती; खिस्ती व मुसलमानी धर्मांत शब्दाचें प्रामाण्य असल्यामुळे रूढीला थारा नाही."—या वाक्यांत श्री. चापेकर रूढीचें प्रामाण्य मानलें म्हणजे शब्दप्रामाण्य असिद्ध होतें असें विधान करतात. जगांतील सगळ्या धर्मसंस्था, खिश्चन मुसलमानदेखील, शास्त्रप्रामाण्य मानूनहि रूढीला मानतात. हिंदुधर्मांत अुपनयन, विवाह अित्यादि संस्कारकर्में, अग्निहोत्रादि यज्ञ, पंचमहायज्ञ, विविध पूजा अर्चा, शास्त्रशब्दांच्या आधाराने होतात. सोळा संस्कार गृह्यसूत्रांच्या आधारें होतात. अग्निहोत्रादि यज्ञ वेद व श्रौतसूत्र यांच्याप्रमाणे होतात. शिवपूजा, विष्णुपूजा, मंदिरप्रतिष्ठा, मूर्तिप्रतिष्ठा अित्यादि कर्में पुराणें व आगम यांच्या आधारें होतात. हजारो विधिनिषेध शब्दप्रमाणांच्या आधारें हिंदुसमाजात पाळले जातात. कांही बाबतींत केवळ शब्दप्रामाण्य, कांही बाबतींत रुढि व शब्दप्रामाण्य आणि कांही बाबतींत नुसतीच रूढि अितर धर्मांप्रमाणेच हिंदुसमाजांतहि मानतात.

रूढि सुद्धा केवळ रूढि म्हणून नव्हे तर कांही विशिष्ट कल्पनेने पाळली जाते. अनुभव किंवा अलौकिकप्रमाण यांपैकी अेक रूढीच्या पाठीशीं गृहीत धरून तिला प्रामाण्य आलें आहे.

---

१ पूर्वमीमांसा १।१।२, वैशेषिकसूत्र १।१।३, ब्रह्मसूत्र १।१।३ गौतम १।१,२, आपस्तम्ब १।१।३, मनु २।६,१०,१२.

कारण रूढि ही जाणीवपूर्वक घडणारी मानवप्राण्याची क्रिया आहे; त्यामुळे, बरोबर किंवा चुकीचें कारण शोधल्याशिवाय तो ती अंमलांत आणूं शकत नाही. रूढि आचार कसा असावा अेवढेंच सुचवील. परंतु त्या त्या आचाराच्या मुळाशीं असलेल्या देवता, पापपुण्य अित्यादि कल्पनांना समर्थित करणारें दुसरेंच प्रमाण असावें लागतें. स्वतःच्या पाठीशीं पूर्वजांच्या अनुभवाचा किंवा अलौकिक दिव्य प्रमाणांचा आधार धरूनच, म्हणजेच शब्द-प्रामाण्यानेच, रूढि अंमल करते. देवता, शुभाशुभ अित्यादि कल्पनांचें त्याशिवाय समर्थनच अशक्य आहे.

श्री. चापेकरांनी जेम्स्च्या (William James) ग्रंथाची फार प्रशंसा केली आहे. परंतु प्रशंसा हें साधक प्रमाण नव्हे व निंदा हें बाधक प्रमाण नव्हे. जेम्स्च्या दिव्यानुभववादाची मांडणी मीं माझ्या पुस्तकांत केली असून त्याचें अुत्तरहि जर्मन तत्त्वज्ञ फायरबाखच्या (Ludwig Feuerbach) मतोपन्यासद्वारा दिलें आहे. जेम्सच्या विचारांचें अधिक सविस्तर खंडन मीं 'जडवाद' या पुस्तकांत (पृ.९१–९३) केलें आहे.

**मार्क्सवाद हा 'धर्म' आहे काय?**— सदरहू आक्षेपकांचें दुसरें म्हणणें असें की, मार्क्सवाद नांवाच्या नव्या धर्माची तरफदारी मीं या पुस्तकांत केली आहे. ते म्हणतात : "कोणताच धर्म नको म्हणतां म्हणतां हेच लोक हिंदुस्थानांत (१) अेका नवीन धर्माची स्थापना करीत आहेत.... (२) कॅपिटल् हा या धर्माचा धर्मग्रंथ होय. (३) **जगांतील प्रत्येक घटनेला आर्थिक कारण आहे, हा या धर्माचा डॉगमा** समजला जातो. (४) मार्क्सधर्मीयांना व्याज, जुलूम, भांडवलशाही यांवांचून कांहीच कोठें आढळत नाही." यांतील अेकहि विधान समंजसपणाचें नाही.

(१) मार्क्सवादास किंवा मार्क्सवादीय समाजसत्तावादास धर्म म्हणणें हें धर्म शब्दाच्या अर्थाचें पूर्ण अज्ञान प्रकट करणें आहे. कारण 'मार्क्सवाद ही मानवी विचारसरणी असून तींत दोष, वैगुण्य व अपूर्णता संभवते' असें मार्क्स, मार्क्सवाद व मार्क्सवादी मानतात. परंतु धर्माचें तसें नसतें. कोणतीहि धर्मसंस्था आपला धर्म त्रिकालाबाधित सत्यावर आधारलेला अतअेव पूर्ण आहे असें मानीत असते. मार्क्सवाद मानवी तर्कबुद्धीचे नियमांवरच (laws of human reason) आधारलेला असल्यामुळे 'स्वतःच्या विचारांवर विधायक व विध्वंसक टीका करीतच, मार्क्सवाद अंमलांत आणावा, असा मार्क्सवादाचा मूलभूत विचार आहे. धर्माचें याच्या अुलट असतें. संपूर्ण श्रद्धा हा धर्माचा गाभा आहे. मंदश्रद्धेने अर्धवट रीतीने कांहीतरी यातुरमातुर करून स्वतःस धार्मिक म्हणवून घेणाऱ्यांना आत्मवंचना, धर्मप्रतारणा आणि वेदशास्त्रविटंबना करूनहि धार्मिक म्हणवून घ्यावयाचें असेल, तर त्यास चालू कायद्याची आडकाठी नाही; परंतु धर्मविद्येची आहे. मार्क्सवादास धर्म म्हणणारे हे लोक प्रामाणिकपणें धार्मिक असणाऱ्यांच्या दृष्टीने आणि धर्माचा शास्त्रीय अभ्यास करणारांच्या दृष्टीने धर्मशब्दाचा दुरुपयोग व धर्माचें विडंबन करतात !

(२) "कॅपिट्ल हा मार्क्सवादाचा धर्मग्रंथ होय." प्रस्तुत टीकाकारांनी मार्क्सवाद्यांना हिणविण्याकरिता हें म्हटलें आहे. परंतु हिणवितांना समर्पकता हा विचारगुण आणि औचित्य हा साहित्यगुण सोडावा असें नाही. कॅपिट्ल हें समाजवादी क्रांतीचा कार्यक्रम सांगणारें पुस्तक नसून भांडवलदारी अर्थसंस्थेचें शास्त्रीय विवरण करणारें अर्थशास्त्राचें पुस्तक आहे

अेवढीहि माहिती त्यांना असती तरी त्याला 'धर्मग्रंथ' हा विडंबनकारी शब्द लावण्याली बुद्धि त्यांना झाली नसती.

(३) "जगांतील प्रत्येक घटनेला आर्थिक कारण आहे" असें मार्क्सवादांत कोठेहि, केव्हाहि व कोणींहि म्हटलें नाही. 'सूर्यमाला' ही जगांतील अेक घटना आहे, ती आर्थिक कारणांनी अस्तित्वांत आली आहे, असें वेशुद्धींत देखील मार्क्सवादी बरळणार नाहीत. बरें, वरील वाक्यांतील 'आर्थिक' याचा भौतिक असा अर्थ घेतला, 'आर्थिक' शब्द 'भौतिक'च्या अैवजी चुकून पडला, असें मानलें म्हणजे तें वाक्य असें बनतें— 'जगांतील प्रत्येक घटनेला भौतिक कारण असतें.' मग मला असें सांगावयाचें की, हा मार्क्सचा तर सिद्धान्त आहेच, परंतु तो सिद्धान्त हिंदुस्थानांतील सर्व आस्तिक व वैदिक परंपरेंतील सर्व प्राचीन तत्त्वज्ञांना मान्य आहे. मग तो 'डॉगमा' ठरत नसून सर्व सुबुद्ध व सुसंस्कृत मनुष्यांच्या अनुभवांचें व विचारांचें सार ठरतें. हिंदुतत्त्ववेत्त्यांच्या मतें, विशेषतः शंकराचार्यांच्या व सांख्यांच्या मतें, आत्मतत्त्वच केवळ अभौतिक (अजड) आहे, व तें आत्मतत्त्व जगांतील घटना (event) नाही. त्यांच्या मतें जगांतील सर्व घटना (events) मायामय किंवा त्रिगुणात्मक प्रकृतिमय आहेत; माया किंवा त्रिगुणात्मक प्रकृति सांख्यमताने व शांकरमताने जड आहे. जगांतील सर्व घटना मार्क्सच्या मतें भौतिक (जड) आहेत, आणि हें मत सगळ्या भारतीय आस्तिक तत्त्वज्ञांस अजूनपर्यन्त अक्षरशः मान्य आहे. 'जग' या शब्दाचा 'समाज' असा अर्थ असेल, तरी कांही हरकत नाही. समाजघटक जो मनुष्य तो मुळांत आर्थिक कारणाने अस्तित्वांत आला असें कार्ल मार्क्सने कोठेहि म्हटलें नाही, व कोणीं तसें अनुमानहि आजपर्यंत काढलें नाही. त्याकरिता मनुष्याच्या पूर्वजांचें, मर्कटादिकांचें, अर्थशास्त्र (!) शोधलें पाहिजे ! मार्क्स तर बिचारा गेल्या तीन शतकांतील अर्थस्थितीचेंच शास्त्र सांगू शकला.

(४) "मार्क्सवादीयांना जिकडे तिकडे कंसाप्रमाणे व्याज, जुलूम, मांडवलशाही यांवांचून कांही दिसत नाही." मार्क्स काय म्हणतो हें थोडें तरी पाहण्याचे श्रम कोण घेतो ? पण तसे श्रम केले तर वाटेल तशीं भरमसाट विधानें करावयास संधि कशी मिळेल ? अज्ञानाच्या बालेकिल्ल्याचे हे गडकरी त्याचमुळे शूरपणा गाजवूं शकतात ! अगोदर, मार्क्सवादी सतराव्या शतकापूर्वी मांडवलशाही नव्हती असें म्हणतात. दुसरें असें की, मांडवलशाही समाजपद्धति ही पूर्वसमाजपद्धतींपेक्षा अधिक विकसित व अुच्च आहे असें ते म्हणतात. तिसरें असें की, मांडवलशाही काय किंवा तत्पूर्वीच्या समाजावस्था काय, मनुष्याच्या प्रगतीच्या त्या अेक अेक पायऱ्या असल्यामुळे मानवी संस्कृतीस संपन्न व सुंदर करण्याचें कार्य करतात; त्या वाङ्मय, कला, विज्ञान, गणितादि विद्या अित्यादि प्रकारची अुत्तम व स्वीकार्य संस्कृति निर्माण करतात असेंहि ते म्हणतात. मार्क्सवाद अेवढेंच म्हणतो की, भांडवलशाही किंवा दुसरी कोणतीहि समाजपद्धति असो, ती चिरंतन हितकारक नसते; ती प्रगतीच्या मर्यादा ओलांडून अवनतीकडे नेऊं लागली म्हणजे त्या स्थितीशीं झगडून तिच्यापेक्षा अुच्च स्थिति अुत्पन्न करावी लागते.

श्री. चापेकर हे संदर्भ सोडून अर्धवट स्वरूपांत वाक्यें अुद्धृत करून गैरसमज अुत्पन्न करण्यांत पटाअीत दिसतात. या लहानशा परीक्षणांत पुष्कळ ठिकाणीं ही त्यांची हातोटी दिसत असली तरी अेकच अुदाहरण देऊन पुढील मुद्याकडे वळतों.

"वेदशास्त्रसंपन्न भाअी लक्ष्मणशास्त्री जोशी यांना मार्क्सची अैतिहासिक भौतिक वादाने लावलेली अुपपत्ति सर्वांगीण, तर्कशुद्ध आणि प्रमाणपूर्वक (पा. ३२) वाटत असल्यामुळे

बाकीच्या अुपपत्तींना त्यांनी अर्धचंद्र देणें क्रमप्राप्तच आहे.'' पृष्ठ ३२ वर माझें विधान असें आहे— ''युरोपांतील सरंजामदारी समाजरचना नष्ट होअून तिच्या ठिकाणीं मांडवलदारी समाजरचना अुत्पन्न झाली, **याची** मार्क्सने जी अैतिहासिक भौतिकवादानें अुपपत्ति लावली आहे, **त्या उपपत्तीची** सर्वांगीण तर्कशुद्धता आणि प्रमाणपूर्वकता पाहिली म्हणजे **त्याच्याशीं तुलना करतां** स्पेंग्लरची मीमांसा गूढ, अस्पष्ट व अव्यक्त कल्पनांचा विलासच होय असें म्हटल्याशिवाय राहवत नाही.'' या ठिकाणीं मांडवलशाहीच्या अुगमासंबंधी मार्क्सने लावलेल्या अुपपत्तीचीच वरील विशेषणांनी प्रशंसा केली आहे. त्याचप्रमाणे स्पेंग्लरशीं तुलना करतांनाच ती प्रशंसा केली आहे. आणि ती प्रशंसा अेका विशिष्ट सामाजिक घटनेच्या अुपपत्तीबद्दलच आहे. श्री.चापेकर मधलाच अेक तुकडा तोडून विशेष वाक्याचें सामान्य वाक्य बनवून मग निंदा करतात. या आक्षेपपद्धतीस ''अशुद्धं कृत्वा चोद्यते (आक्षेपः क्रियते)'' असें भारतीय तर्कशास्त्रांत म्हणतात. ''मीं बाकीच्या अुपपत्तींना अर्धचंद्र दिला आहे.'' यास पहिलें अुत्तर असें की, ''नैष स्थाणोरपराधः यदेनमन्धो न पश्यतीति.'' कारण पहिलें व दुसरें सगळें व्याख्यान म्हणजे १३० पानें (निम्यापेक्षा जास्त मजकूर) मार्क्सेतर धर्मोपपत्तींचें मनन करण्यांत खर्च केलीं असून, त्यांत मानवजातिशास्त्रज्ञांच्या सर्व धर्मोपपत्तींचें कमीजास्त प्रमाणांत स्वागतच केलें आहे. टायलर, फ्रेझर, मॅरेट, डुरखाअीम, अँड्र्यू लँग, स्पेन्सर, मॅलिनोस्की अित्यादि प्रसिद्ध मानवजातिशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ मार्क्सवादी नाहीत. त्यांना मार्क्सवादी, 'मांडवलदारी शास्त्री' असे संबोधितात. त्यांच्या संशोधनांचा व अुपपत्तींचा मी कांहीं अंशीं स्वीकार व कांहीं ठिकाणीं त्या आत्मसात् करून अक्षरशः अनुवादच केला आहे. मार्क्सवादी नसलेला जर्मन तत्त्वज्ञ लडविक् फायरबाख याच्या शास्त्रीय मानव्यवादाचा (scientific humanism) मीं मुक्तकंठानें गौरवच केला आहे.

मी मार्क्सच्या अुपपत्तीला संपूर्ण सत्य समजत नाहीं; ही गोष्ट माझ्या समीक्षेंतील अेका मूलभूत विचारसरणीचा बोध श्री. चापेकरांनी करून घेतला असता तर त्यांना समजली असती. पृ.३५— ''जी गोष्ट समाजरचनेस लागू तीच मानवविचार व क्रिया यांस लागू आहे. कोणतेहि विचार संपूर्ण नसतात. विचारसरणी विकासाच्या खालच्या अवस्थेंतून वरच्या अवस्थेंत जात असते. संपूर्णता तिला कधींच लाभत नाही. श्रेष्ठ व श्रेष्ठतर अशी तारतम्याची परंपरा अनंत असते. संपूर्ण सत्य सांपडलें म्हणून जर कोणी अेखाद्या विचारसरणीस आलिंगन देअील, तर त्याची फसवणूक झाल्याशिवाय राहणार नाही. जी गोष्ट विचारांची तीच भावना व ध्येय यांची अि० अि०'' मी मार्क्सची जितकी प्रशंसा त्याची अुपपत्ति देअून केली त्यापेक्षा फारच अधिक कै. डॉ. केतकर यांची प्रशंसा श्री. चापेकरांनी केली आहे. म्हणून श्री. चापेकरांचे धर्मसंस्थापक केतकर व धर्मग्रंथ ज्ञानकोश असें म्हणतां येअील काय ? ते तसें म्हणत असतील तर मला तें माहीत नाही.

**धर्ममूल्याची अैतिहासिक सापेक्षता**— आणखी अेक आक्षेप असा आहे 'हिंदुधर्माची समीक्षा' या नांवाखाली मीं 'हिंदुधर्माच्या नालस्तीचें पुराण' लिहिलें आहे. ''अज्ञानाचा गंज चढलेल्या हिंदुधर्मात वर वर पाहणाऱ्याला सर्व घाण दिसल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. जेथे घर तेथे शौचकूप असतोच......'' अशी माझ्या 'नालस्तीच्या पुराणा'ची कारणमीमांसा श्री. चापेकर करतात. घराच्या शौचकूपाबद्दल अेवढेंच म्हणावयाचें

की, शौचकूप ही फार छान सोय आहे; तें वैगुण्य नव्हे; परंतु त्याचें पेव फुटून घरभर दुर्गंध येणार नाही याची मात्र काळजी घ्यावी लागते; नाही तर घरांत कोठेहि बसण्याची सोय राहत नाही. 'हिंदुधर्मावर अज्ञानाचा गंज चढला आहे' ही हिंदुधर्माची नालस्ती नाही तर काय म्हणावयाचें ? 'अमक्याची बुद्धि गंजली आहे' असें म्हटलें तर ती त्या अमक्याची नालस्ती नव्हे काय ? का हिंदुधर्माची नालस्ती करण्याचा अधिकार आर्यसंस्कृतीच्या मालकांनाच आहे ? दुसऱ्याने म्हटलें कीं ती नालस्ती व स्वतः म्हटलें म्हणजे ती रास्त टीका होते ?

आक्षेपकमहाशयांच्या म्हणण्यांतील मुख्य रोख असा दिसतो की, मला हिंदुधर्मांत चांगलें असें कांहीच दिसत नाही. ह्यावर पहिलें अुत्तर असें की, मीं चांगलें असें पुष्कळ दाखविलें असूनहि या सद्गृहस्थांना विकारांधतेने तें मुळींच दिसत नाही. दुसरें असें की, या पुस्तकांत गुणदोषविवेचनापेक्षा अैतिहासिक व तात्त्विक विकासक्रम मीमांसेस प्रमुख स्थान आहे. धर्माच्या कोणत्याहि विशिष्ट स्वरूपास व अवस्थेस समाजधारकतेचें किंवा प्रगतिकारकतेचें शाश्वत मूल्य नसून समाजाच्या परिणतिक्रमांतील अेका विशिष्ट अवस्थेस जी विशिष्ट धार्मिक स्थिति अुपकारक होते, तीच दुसऱ्या अवस्थेंत अपकारक ठरते, असा धार्मिक मूल्याच्या सापेक्षतेचा सिद्धान्त मीं धार्मिक कल्पनांच्या विकासाचा क्रम दाखवून त्यांत सिद्ध केला आहे. मानवजातीच्या धार्मिक कल्पनांचें व धर्मसंस्थांचें विकासतत्त्व काय आहे याची मीमांसा करून मगच हिंदुधर्माच्या विविध हीनोच्च अवस्थांचा व अंगोपांगांचा अैतिहासिक विचार केला आहे. या सर्व मीमांसेचें मूलसूत्र असें सांगितलें की **'प्रत्येक सामाजिक स्थिति सापेक्षतेनेच आवश्यक व न्याय्य असते'.**

रानटी स्थितींतील समाजांचे अपधर्म (primitive religions) सुद्धा त्यांच्या सामाजिक जीवनाचे प्राण असतात असा महत्त्वाचा सिद्धान्त मीं अुपपादून दाखविला आहे. असें असतां हिंदुधर्माचीं सर्व रूपें सारखींच त्याज्य व हीन आहेत असें माझ्या प्रतिपादनाचें सार सांगणाऱ्यांनी अगोदर आपल्या मस्तकाची सगळी ग्रहणशक्ति गहाण टाकूनच माझें पुस्तक वाचण्यास सुरवात केली असें दिसतें. हिंदुधर्म ही अत्यन्त हीन अवस्थेपासून अत्यन्त अुच्च अवस्थेपर्यंत परिणत होत गेलेली अैतिहासिक घटनांची मालिका आहे, हें मीं तिसऱ्या व्याख्यानांत विस्ताराने दाखविलें आहे. त्या घटनांचा प्रत्येक दुवा लक्ष्यांत घेअूनच त्याचें त्या त्या सामाजिक परिस्थितींत काय स्थान आहे हें ओळखतां येतें. धर्मविकासाचीं मीं दोन मुख्य ज्ञापकें दाखविलीं आहेत : (१) पहिलें ज्ञापकः—विशिष्ट स्थितींतील समाजाच्या आत्मरक्षणास आवश्यक असलेली भावनात्मक प्रेरक शक्ति अुत्पन्न करण्याची योग्यता. धर्मसंस्था त्या स्थितींतील सगळ्या समाजघटकांचे ठायीं स्वतःचें अुदिष्ट पवित्र आहे अशी जाणीव निर्माण करून आत्मरक्षण व विजयप्राप्तिकरिता आवश्यक असलेल्या भावनांचा पुरवठा करते. (२) दुसरें ज्ञापकः– त्या काळच्या विज्ञानाशीं व वैज्ञानिक संस्कृतीशीं अविरोधी आचारविचारांना अुदात्त मूल्यें अर्पण करण्याची योग्यता. मात्र हीं ज्ञापकें कोणत्याहि धर्मव्यवस्थेंत शाश्वत कालपर्यंत राहत नाहींत. ती विशिष्ट धर्मव्यवस्था कालान्तराने समाजसंस्थेच्या पायांतील शृंखलाच बनते; ती धर्मव्यवस्था बदलून नवीन व्यवस्था अुत्पन्न करण्याचें कार्य पुरोगामी सामाजिक शक्ति करतात. जी गोष्ट धर्माच्या विशिष्ट अवस्थांना लागू तीच सर्व धर्मसंस्थेलाहि लागू आहे. समाज अशा अेका स्थितींत प्रवेश करतो कीं त्या स्थितींत धर्मसंस्था समाजाच्या जीवनास अपाय अुत्पन्न करते.

या ठिकाणीं धर्म शब्दाची मीं जी व्याख्या सांगितली आहे ती ध्यानांत धरली तरच वर मी काय म्हणतों तें ध्यानांत येईल. ती व्याख्या अशी— अलौकिक शक्तीच्या कल्पनेवर आधारलेलें व व्यक्तिदृष्ट्या किंवा सामाजिक दृष्ट्या श्रेयस्कर मानलेलें मानवी आचरण म्हणजे धर्म होय. ही व्याख्या रानटी (अप)धर्मांनाहि लागू पडते. सुधारलेल्या समाजांच्या धर्मांचें सामान्य लक्षण असें: सगळ्या विश्वाच्या घडामोडींच्या मुळाशीं गृहीत धरलेल्या अलौकिक शक्तीच्या किंवा व्यक्तीच्या कल्पनेवर आधारलेलें, समाजास किंवा व्यक्तीस श्रेयस्कर मानलेलें मानवीय आचारण म्हणजे धर्म होय. या दोन्ही व्याख्यांचें सविस्तर निरूपण व भारतीय प्राचीन तत्त्ववेत्त्यांच्या अत्यंत मूलगामी, सूक्ष्म व व्यापक धर्मलक्षणांचें विवरण दुसऱ्या व्याख्यानांत केलें आहे.

यापुढे समाजप्रगतीस अलौकिक किंवा अदृष्ट प्रमाण आणि अदृष्ट व दिव्य अशा ओश्वर अित्यादि वस्तु यांच्या आधारावर अुभारलेल्या धर्मसंस्थेची आवश्यकता नाही. धर्म म्हणजे कोणतेहि सामाजिक किंवा वैयक्तिक अुच्च ध्येय सिद्ध करण्याचा प्रयत्न व तत्संबन्धी विचारसरणी, असें जर कोणी म्हणेल तर त्यावर येवढेंच अुत्तर की, परलोक व ओश्वर अित्यादि अलौकिक वस्तु धर्मांत येत नसतील तर त्यास धर्म म्हणणें हें अतिव्याप्तिदोषयुक्त आहे; संसारास रोग म्हणणें व ज्ञान ही महौषधी म्हणणें, हें जसें वैद्यशास्त्रांत बसत नाही तसेंच हें लक्षण धर्मतत्त्वविवेचनांत शास्त्रीय दृष्टीने येअूं शकत नाही.

**'हिंदुधर्माची समीक्षा' ही हिंदुधर्माची निंदा?**—माझ्या प्रतिपादनांत जेथून तेथून हिंदुधर्माची निंदाच आहे असें श्री. चापेकर म्हणतात. मी मीमांसाशास्त्राचे नियम मानतों; त्याप्रमाणे निंदा किंवा स्तुति यांना स्वतंत्र असें कांहीच महत्त्व नाही असें मानतों. प्राकृत दृष्टि निंदा व स्तुति यांवरच खिळून राहते; त्यामुळे ती दृष्टि तत्त्वबोधाला पारखी होते.

मीं हिंदुधर्माची खिश्चनधर्म व मुसलमानधर्म यांच्याशीं तुलना केली ही फार गर्ह्य गोष्ट केली असें माझे टीकाकार म्हणतात. ते म्हणतात, खिश्चनधर्म व मुसलमानधर्म हे हिंदुधर्माशी तुलना करण्यास अयोग्य धर्म असून त्यांच्याशीं तुलना संभवतच नाही. त्या धर्मांशीं तुलना करणें हा हिंदुधर्माचा अपमान होय असा याचा अर्थ असेल तर हिंदुधर्म परधर्मसहिष्णु आहे या विचाराचा वेळीं अवेळीं डांगोरा पिटणाऱ्यांनी आपल्या परधर्मसहिष्णुतेचा पारा किती पराकाष्ठेला चढतो याचा विचार करून थोडेंसें लाजावें. माझी तुलना चुकीची असल्यास तसें दाखविलें तर मी नम्रपणें माझी चूक कबूल करून विचारवंतांची क्षमा मागेन. माझा दृष्टिकोन चुकला असें जो सिद्ध करील त्याने माझ्यावर थोर अुपकार केले असें मानणारा मी आहें.

हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व कशांत आहे तें मीं खालीलप्रमाणे सांगितलें आहे.

(१) अेकेश्वरवादापेक्षा ब्रह्मपरिणामवाद हा विज्ञानाच्या अधिक संनिध आहे. खिश्चनधर्म व मुसलमानधर्म अेकेश्वरवादी आहेत व अुपनिषदें ब्रह्मपरिणामवादी आहेत, म्हणून औपनिषदधर्म त्या धर्मोपेक्षा अधिक विकसित आहे.

(२) धर्माची मूलगामी समीक्षा अितर कोणत्याहि संस्कृतीपेक्षा भारतीय संस्कृतींत फारच अगोदर सुरू झाली. कारण धर्मविकास येथेच सर्वांच्या अगोदर झाला.

(३) अुच्च व नीच, पतित व अुन्नत असे सर्व देशकालपरिस्थितींतील मानव शुद्ध होअून धार्मिक परमपदवीस पोचूं शकतात अशी घोषणा करणारे धर्म प्रथमतः येथेच अुत्पन्न झाले.

(४) हिंदुधर्मसंस्थेच्या विचारसरणीचा सगळ्यांत वरिष्ठ व श्रेष्ठ असा स्तर आहे त्यांत ब्रह्मवाद, अेकेश्वरवाद व तत्त्ववाद हे तीन प्रकार आहेत......हिंदुधर्माची अुच्चतम शाखा तत्त्ववाद होय. मनुष्याचा आत्मा विश्वतत्त्वांचें ज्ञान करून घेअूनच मुक्त होअूं शकतो, असें त्याचें सार आहे. त्यामुळे बौद्धिक संशोधनास व तार्किक चिकित्सेस सुरुवात होअून विज्ञानाचा पाया घातला जातो.

(५) सर्वभूतहित हेंच सर्व धर्मांचें सार आहे असें घोषित करणाऱ्या महाभारताने दोन हजार वर्षांपूर्वी वैचारिक विकासाचें थोर शिखर गांठलें. विशेषतः नैतिक मूलभूत कल्पनांच्या जीवनसापेक्षतेची व्यवस्था भारतीय टीकात्मक (critical) दृष्टीचें सर्वगामित्वच दाखवित करते (पृ. ९०).

**श्रुतिस्मृति व जातिवर्णसंस्था**— वर्णसंस्था व जातिसंस्था यांसंबंधी मीं जे विचार मांडले आहेत, त्यांवर अनेक आक्षेप माझ्या टीकाकारांनी घेतले आहेत. त्यांचें क्रमशः अुत्तर आता देतों. श्री. चापेकर म्हणतातः "ब्राह्मणांनी अथवा पुरोहितवर्गाने शूद्रांना दास्यांत ठेविलें, हा अेक बालिश आरोप गतकालीन सुधारकांप्रमाणे आजकालच्या शास्त्रीबोवांनी केला आहे. साहेबांचे शब्द झेलून आम्हांस आणखी सांगत आहेत की, जिंकलेल्या लोकांना ब्राह्मणांनी शूद्र बनविलें."

ब्राह्मणांच्या धर्मग्रंथांत शूद्रांना अत्यन्त निर्घृण, विषम व हीन स्थितींत कायमचे डांबून ठेवणारे कायदे आहेत, ही गोष्ट मला वेदांनी, सूत्रांनी व स्मृतींनी निश्चितपणें अेकमुखाने येअून सांगितली. ही गोष्ट मला साहेबांची भाषा येण्याच्या पूर्वींच वेदांनी, स्मृतींनी अविरतपणें सांगितली. हजारों वेदस्मृतिवचनें मीं माझ्या १५ व्या वर्षीच सार्थ मुखोद्गत केलीं आहेत, व तीं तशींच अजून कंटस्थ आहेत. मीं धर्मसमीक्षेंत यासंबंधी जें जें विधान केलें तें तें वेदस्मृतींच्या सगळ्या वचनांचा आढावा घेअून लिहिलें आहे. चापेकरांनी श्रुतिस्मृतींबद्दल या परीक्षणांत जें जें विधान केलें आहे तें तें श्रुतिस्मृतींतील अेक अक्षरहि माहीत नसल्यामुळे केलें आहे अेवढेंच प्रास्ताविक सांगून आता प्रत्यक्ष श्रुतिस्मृतींकडे वळतों.

शूद्रांना दास्यांत ठेवावें ही गोष्ट पहिल्यांदा वेदांत सांगितली आहे. अुदाहरणार्थ—अैतरेय ब्राह्मणांत असें म्हटलें आहे: "शूद्राला नेहमी अितरांनी अिकडे तिकडे हेलपाटे घालावयास लावावें, वाटेल तेव्हा गचांडी देअून अुठवावें किंवा हाकलावें, पाहिजे तेथे, व पाहिजे तेव्हा व पाहिजे त्या रीतीने झोडपावें किंवा ठार करावें." ताण्ड्य ब्राह्मणांत (६।१।११) म्हटलें आहे: "शूद्राला अितर जातींचे पाय धुण्याचें काम चुकवितां येणार नाही; कारण तो पायांपासूनच पैदा झाला आहे." शबरस्वामींनी मीमांसाभाष्यांत (६।१।३८) वेदवाक्य अुद्धृत केलें आहे : **"पशुर्हवा अेतत् श्मशानं यत् शूद्रः". शूद्र म्हणजे चालतें श्मशान.** शूद्रालाच नव्हे तर वैश्यांना देखील हीन दर्जाची वागणूक देअून व क्षत्रियाला कमी लेखून वैदिककालीं वागवीत यासंबंधी प्राचार्य वै. का. राजवाडे यांनी "ब्राह्मणकालीन जातिभेद" (भारत अितिहास संशोधक मंडळ वृत्त शके १८४१, पृ. (१२५–१४१) या लेखांत सर्व आधारांसह माझ्याप्रमाणेच परंतु सविस्तर लिहिलें आहे. प्रख्यात धर्मशास्त्रज्ञ म. म. पा. वा. काणे यांनीहि (History of Dharmashastra Vol. II Part I pp. 33-179) माझ्याप्रमाणे अत्यंत काळजीपूर्वक व्यवस्थित रीतीने विस्तृत प्रमाणांत मांडणी केली आहे. मैत्रायणी संहितेंत म्हटलें आहे:—

१ अैतरेय ब्राह्मण ३५।३ शूद्रः अन्यस्य प्रेष्यः कामोत्थाप्यः यथाकामवध्यः ।

"अग्निहोत्राच्या गाअीचें दूध शूद्राने काढूं नये; कारण तो असत् म्हणजे असत्य यांतून जन्मला" (४।१।३१). श्री. राजवाडे वरील लेखांत म्हणतातः–"शूद्र हे मूळचे ह्या देशाचे रहिवासी; त्यांना जिंकून दास बनवून पार चिरडून टाकलें. निग्रो, रेड अिंडियन वगैरे जसे चिरडून टाकले तसे **आज तीन हजार वर्षें शूद्र चिरडले जात आहेत !......**" ब्राह्मणांच्या पदरीं कविराजपणा (ह्या लेखांत) घातला आहे. लोकांच्या अज्ञानापासून त्यांचा फायदा झाला. श्री. डॉ. ज्ञानकोशकार केतकर यांच्या 'वैदिकविद्या' या प्रस्तावनाखंडांतील अेतत्संबंधी आधार माझ्या मतास पोषकच आहेत; ते पहावे; नुसती अन्धभक्ति करूं नये, त्यांचे ग्रंथ तरी वाचावे.

सगळ्या जुन्या स्मृति व धर्मसूत्रें शूद्राला अुच्चवर्णांचें, विशेषतः ब्राह्मणांचें, दास्य हा मुख्य धर्म सांगतात. मनुस्मृति म्हणतेः—"शूद्राला, तो खरेदी घेतलेला असो किंवा नसो, गुलामगिरींतच राबवावें; कारण ब्रह्मदेवाने स्वतः त्याला ब्राह्मणांच्या दास्याकरिताच पैदा केलें आहे." शूद्रं तु कारयेत् दास्यं क्रीतमक्रीतमेव वा । **दास्यायैव हि सृष्टोऽसौ** स्वयमेव स्वयंभुवा ॥

श्री. चापेकर म्हणतात की, "शुश्रूषा हा शूद्रांचा मूळचा धर्म प्रथमच्या स्मृतिकारांनी सांगितला आहे. त्याचा मूळचा अर्थ श्रवण करण्याची अिच्छा असा आहे. वेदश्रवण करणें हा तो धर्म होय. शुश्रूषा याचा सेवा करणें हा पाठीमागचा अर्थ आहे." श्री. चापेकरांनी त्या शब्दाच्या मुळाकडे जाण्याच्या अैवजीं प्रथमच्या **स्मृतींकडेच** धांव घेतली असती तर असलें थापाडें विधान करण्याचें धाडस त्यांनी केलें नसतें. प्रथमच्या स्मृति कोणत्या ? प्रथमच्या स्मृति म्हणजे वेदपूर्वकालच्या स्मृति असा अर्थ असेल तर त्या अजून कोणाहि मनुष्यप्राण्यास सांपडल्या नाहीत. प्रथमच्या स्मृति म्हणून धर्मसूत्रें प्रसिद्ध आहेत; व तीं वेदोत्तरकालीन आहेत. वेदांतच शूद्रदास्य आहे हें वर दाखविलें आहेच. या प्रथमच्या स्मृति म्हणजे गौतम, आपस्तम्ब, बौधायन, वसिष्ठ, विष्णु, शंखलिखित, मनु, अुशनस्, हारीत अित्यादि होत. काणे-दप्तरी-प्रभृतींच्या मतें पहिला स्मृतिकार गौतम होय. तो म्हणतो :— **परिचर्या**चोत्तरेषाम् । (१०।५६) म्हणजे "अुच्चवर्णांची म्ह० त्रैवर्णिकांची परिचर्या-सेवा ही शूद्रवृत्ति होय." वसिष्ठ म्हणतो :— अेतेषां **परिचर्या** शूद्रस्य नियता वृत्तिः । २।२४. बौधायन म्हणतो :— शूद्रेषु पूर्वेषां **परिचर्या** । १।१०।२०. मनू तर **दास्य** शब्दच अनेक वेळां वापरतो. दास्यं शूद्रं द्विजन्मनाम् । राजाने शूद्राकडून त्रैवर्णिकांचें दास्य सक्तीने करवून घ्यावें असें मनु सांगतो. आपस्तम्ब व विष्णु हे जुने स्मृतिकार शुश्रूषा शब्द वापरतात; हें खरें. शुश्रूषा शूद्रस्येतरेषाम् । (१।१।७). येथे श्रवणाची अिच्छा असा शुश्रूषा शब्दाचा अर्थ केला तरी श्रवण कशाचें हें त्यांत सांपडत नाही. त्यांत जवळ वेद शब्द नाही. येथे व्युत्पत्त्यर्थ पाहून नुसती भरारी मारून भागत नाही, संदर्भ पहावा लागतो. "नानासाहेबांचा गडी नानासाहेबांचें अैकतो" याचा अर्थ नानासाहेबांचें वेदपठण अैकतो असा का करावयाचा? "नानासाहेबांचा गडी नानासाहेबांचें अैकत नाही" म्हणजे 'नानासाहेबांचें वेदपठण अैकत नाही' असें म्हणावयाचें काय? वेदाध्ययन कोठे करावें व कोठे करूं नये यासंबंधी आपस्तंबाने विस्तृत विवेचन केलें आहे. त्यांत त्याने 'श्मशानवत् शूद्रपतितौ ।' असें म्हटलें आहे. शूद्र व महापापी हे वेदाध्ययनाच्या बाबतींत श्मशानाप्रमाणे समजावेत. श्मशानापासून सरासरी दोनशे हात अन्तर

१ गौतमधर्मसूत्र १०।५६, आपस्तम्ब धर्म १।१।७, बौधायन धर्म १।१०।५, वसिष्ठ धर्म २।२४, विष्णुधर्म २।४ व ५।१५०, कौ.-अर्थशास्त्र ३।१३, याज्ञवल्क्य २।१८३, नारद ११।३९ अित्यादि.

तरी ठेवून वेदाध्ययन करावें. तसें वेधाध्ययन करीत असतां शूद्र व पतित यांस वेदशब्द अैकूं येणार नाही अितक्या अंतरावरून म्हणावें. हाच नियम गृह्यसूत्रें व अितर स्मृति ४६ ठिकाणीं सांगतात. गौतम, बौधायन, वसिष्ठ, विष्णु, मनु अित्यादि जुने स्मृतिकार शूद्राने वेदश्रवण करणें हें पातित्यकारकच आहे असें म्हणतात. गौतम हा सगळ्यांत जुना; तो स्पष्ट असें म्हणतो:— "शूद्राने वेद जर अैकला तर त्याच्या कानांत शिसें व लाख तापवून ओतावीं त्याने वेदोच्चार केला तर त्याची जीभ छाटावी, वेद पाठ केले तर त्याला तुकडे करून ठार करावें." (१२।४). विष्णुस्मृतींत जेथे अितरवर्णांचे व्यवसाय सांगितले, त्यांत शूद्रांना अितर-वर्णांची शुश्रूषा हा जीवनोपाय सांगितला. केवळ वेदश्रवण हा जीवनोपाय होअील काय ?

श्री. चापेकर म्हणतातः— वेदश्रवण हा शूद्राचा प्रथम धर्म होय. "कृषि, शिल्प व अुच्चवर्णसेवा हे तीन व्यवसाय शूद्राला नेमून दिले, हें शास्त्रीबोवांचें म्हणणें धादांत खोटें आहे. लक्ष्मणशास्त्र्यांसारख्या माणसाने अितकें अज्ञान प्रकट करावें, याचा राहून राहून खेद वाटतो." ..."द्विजसेवेबरोबर कृषि व शिल्प यांचा अुल्लेख करून शास्त्रीबोवांनी हातचलाखी केली आहे."

यावर म्हणणें असेंः— अुच्चवर्णसेवेसंबंधी प्राचीन श्रुति व स्मृति यांचीं वचनें वर दिलीं आहेतच. शिल्प, कृषि व सेवा यांबद्दल त्यांतील विचारांचा खुलासा असा आहे: गौतम शूद्राचा मुख्य व्यवसाय परिचर्या जसा सांगतो त्याबरोबरच वैश्य व शूद्र यांचा मिळून जीवनाचा अेकच व्यवसायसमूह सांगतो. तो म्हणजे 'निर्दिष्ट'. निर्दिष्ट म्हणजे शारीरिक श्रम, हस्तव्यवसाय, सावकारी अि०. गौतम, सेवेने शूद्राची वृत्ति कशी चालते याबद्दल, त्रै-वर्णिकांकडून सेवेचा मोबदला म्हणून जीर्ण झालेलीं पादत्राणें, छत्र्या, जीर्ण कपडे किंवा अितर जीर्ण झालेलें सामान शूद्राने घ्यावें, असें विवरण करतो. त्रैवर्णिकांचें अुच्छिष्ट खाअून जगावें किंवा शिल्पांच्या योगें जगावें असेही म्हणतो. अुच्छिष्टाशनं शिल्पवृत्तिश्च। शुश्रूषा शब्द वापर-णारा विष्णुधर्मसूत्रकारः— शूद्रस्य सर्वशिल्पानि ॥ असें सांगतो. प्राचीन स्मृतिकार शंख व अुशना म्हणतातः—

> शूद्रस्य द्विजशुश्रूषा सर्वशिल्पानि चाप्यथ ।
> विक्रयः सर्वपण्यानां शूद्रकर्म अुदाहृतम् ॥

मनु म्हणतो: कृषि, सर्व हस्तव्यवसाय, अुपयुक्त कला हे सर्व शूद्रांचे धंदे होत (१०।९०, ९९,१००). श्री. नानासाहेब ज्या स्मृतींबद्दल निर्वाळा देअून लिहितात त्या अगदी खाजगी असलेल्या, जगांत कोणासहि माहीत नसलेल्या, स्मृति असाव्यात. अेकदा त्या स्मृति अुजेडांत आणून सर्व हिंदुसमाजावर त्यांनी अुपकार करावा कारण जगांतल्या कोणत्याहि धर्मशास्त्रज्ञास माहीत नसलेलीं वचनें त्यांत असावींत असें आत्मप्रौढीने व खवळून लिहिलेल्या त्यांच्या वाक्यां-वरून अनुमान होतें.

श्री. चापेकर आणखी म्हणतात— "अेकहि स्मृतिकार जातिधर्म सांगत नाही ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. जातिधर्माला कलाटणी देअून स्मृतिकार वर्णधर्म सांगतात. चातु-र्वर्ण्याने ज्ञातिसंस्थेची नांगीच मोडली आहे. वर्ण व जाति यांचा अभेद मानण्यांत शास्त्री-बोवांनी अक्षम्य चूक केली आहे."

श्री. चापेकरांची वरील भ्रांति नाहीशी करण्याकरिता शास्त्रप्रहारात्मक अुत्तर असें आहे की, वेदकालींच चातुर्वर्ण्य जन्मजात होतें. जन्मजात चातुर्वर्ण्य म्हणजे तें जातिरूप होतें हें

अनुक्रमणिका

सांगणें नको. सर्व गृह्यसूत्रें, धर्मसूत्रें, जुन्या नव्या सर्व स्मृति जन्मजातच जातिभेद मानतात. वर्णांना जाति ही संज्ञा पुष्कळ जुन्या स्मृतींनी दिली आहे. या विधानांचें थोडेसें विवरण केलें म्हणजे स्मृतींचा परिचय नसलेल्या वाचकांचा घोटाळा होणार नाही. जनावरांतील जातिभेदाचा दृष्टान्त देअून ब्राह्मणग्रंथ (हे वेदभाग होत) वर्णभेदांचें समर्थन करतात. "क्षत्रिय घोड्यासारखा, वैश्य व शूद्र गाढवासारखे व ब्राह्मण बोकडासारखा आहे" असें शतपथांत (६।३।५।१२) म्हटलें आहे. तेथेच दुसरीकडे 'क्षत्रिय घोडा व प्रजा अितर जनावरें होत' असें म्हटलें आहे (१३।२।२।१५). ताण्ड्यब्राह्मणांत (६।१।१०) पुरुषसूक्ताच्याच धर्तीवर पण स्पष्ट शब्दांत चार वर्णांची देवाच्या चार अवयवांतून अुत्पत्ति सांगितली आहे. तेथे वैश्याची अुत्पत्ति शिस्नापासून सांगितली आहे. शूद्राचा जन्मच असत्पासून (४।१।३) मैत्रायणीसंहितेंत सांगितला आहे. ब्राह्मण हा वर्ण देवाचा व शूद्र असुराचा असें (१।२।६) तैत्तिरीयब्राह्मणांत म्हटलें आहे. शूद्र पायापासून झाला म्हणून त्याला देवता नाही व यज्ञ नाही असें अनेक वेळां वेदांत म्हटलें आहे. महामहोपाध्याय पां. वा. काणे यांनी आपल्या धर्मशास्त्रेतिहासाच्या अिंग्रजी ग्रंथांत यासंबंधी पुष्कळच अुत्तम प्रकारची माहिती देअून वर्णभेद हे वेदकालीं व स्मृतिकालीं जन्मजात होते याची सिद्धि केली आहे. श्री. चापेकर यांनी ही माहिती त्यांचे परात्पर गुरु डॉ. केतकर यांच्या प्रस्तावनाखंडांतून घ्यावी. डेक्कन कॉलेज रीसर्च अिन्स्टिट्यूटचे प्रपंडित (डॉ.) व्ही. अेम्. आपटे यांनी ऋग्वेदकालीन जन्मसिद्ध वर्णभेद किंवा जातिभेद याची अुत्तम रीतीने सिद्धि करणारा निबंध अिन्स्टिट्यूटच्या बुलेटिनमध्ये (Vol. II, Nos. 1–2) प्रसिद्ध केला आहे. काणे व राजवाडे यांनी तर अेतद्देशीय रहिवाश्यांस जिंकून जबरदस्तीने दास्यकर्मास म्हणजे शूद्रकर्मास त्रैवर्णिकांनी लाविलें; ही गोष्ट आहत्य सांगितली आहे. ते सर्व वैदिक पुरावे येथे देण्यास जागा नाही. दासांचीं किंवा दस्यूंचीं नगरें, गांवें, गाअी, घोडे, सोनें, रुपें व अितर धनसंचय लूटण्याकरिता साहाय्यार्थ देवांस व अिंद्रास बोलाविणाऱ्या प्रार्थना ऋग्वेदांत शेकडो आहेत. श्री. चापेकरांनी विद्वन्मणि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचें ऋग्वेदाचे मराठी भाषान्तर तरी निदान अेकवार अगोदर पाहावें. श्री. चापेकर म्हणतात, वैदिकांनी अशा शूद्र-दास्य निर्माण करणाऱ्या लढाया मारल्या याचें प्रमाण कोठे आहे ? तें ऋग्वेदांत आहे. समजा, तसें प्रमाण नसलें तरी सर्व स्मृतींतील शूद्र-दास्यसंस्था हें लहान प्रमाण नव्हे. हे दास्यदर्शक कायदे व जन्मजात चातुर्वर्ण्याचे म्हणजे जातिरूप वर्णांचे कायदे माझ्या धर्मकोशाच्या पहिल्या अडीच हजार पृष्ठांत पंधरा हजार स्मृतिवचनांच्या द्वारें दाखविले आहेत. त्याचेंच सार अत्यंत संक्षिप्त रूपाने धर्मसमीक्षेंत मीं दिलें आहे.[1] श्री. चापेकरांच्या बाजूस हीं श्रुतिस्मृतिवचनें मुळीच नाहीत; असतील तर तीं त्यांनी दाखवून द्यावींत.

गौतम, आपस्तम्ब, बौधायन, वसिष्ठ, विष्णु, मनु, हारीत अित्यादि जुने स्मृतिकार वर्ण हे जन्मसिद्ध आहेत असें अत्यंत व्यक्त रीतीने सांगतात. त्यांच्या मतें वर्ण जन्मसिद्ध असून व वर्णांचा अुच्चनीच भावहि जन्मसिद्ध असून त्यांत अुच्चनीचतेची सोपानपरंपरा आहे; वर्ण बदलण्यास दुसरा जन्मच घ्यावा लागतो, या जन्मीं जन्मसिद्ध वर्णाप्रमाणे आचरण करूनच पुढील जन्मीं मेल्यावर वरचा वर्ण प्राप्त होतो; आअीबापाचा वर्ण हाच संततीचा वर्ण

१ महाभारत व पुराणें यासंबंधी माझें काय म्हणणें आहे तें समीक्षेंत पृथक्करणें मांडलें आहे. स्मृतिवाङ्मय व भारतपुराणें यांत कांही विचारांमध्ये फरक आहे.

ही गोष्ट अितकी वारंवार सगळ्यांनी सांगितली असतांना हे लोक कां वारगळतात हें कांही कळत नाही. येथे दिग्दर्शनार्थ आपस्तम्बवचन देतों. चत्वारो वर्णाः ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः तेषां पूर्वः पूर्वः जन्मतः श्रेयान् । जघन्यो वर्णो पूर्वपूर्ववर्णतामापद्यते जातिपरिवृत्तौ मनुस्मृतींत तर वर्ण शब्दाने सर्व शुद्ध व संकर जाति (१०।३१) सांगितल्या आहेत. आपस्तम्ब हा अनुलोमविवाहसुद्धा निषिद्ध मानतो. हा अत्यन्त जुना स्मृतिकार आहे. अितर प्राचीन स्मृतिकार अनुलोमविवाह मान्य करतात, परंतु त्यांतून होणारी संतति संकरजातीची होते असें सांगतात. प्रतिलोमविवाह नुसता निषिद्धच नाही तर सर्व जुने स्मृतिकार, प्रतिलोम-विवाह किंवा तसा संबंध झाला तर, म्हणजे अुदाहरणार्थ ब्राह्मणकन्येशीं क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचा विवाहद्वारा किंवा साधा संसर्ग घडल्यास ठार मारण्याचें व लिंगच्छेदाचें प्रायश्चित्त सांगतात; शूद्राला तर गवतांत चव्हाट्यावर जिवंत जाळावें असें म्हटलें आहे. या गोष्टी जन्म-जात वर्णभेदामुळेच सांगितल्या आहेत. अनुलोमसंकर व प्रतिलोमसंकर ही सर्व स्मृतिप्रसिद्ध व्यवस्थाच जन्मजात वर्णभेदावर अुभी आहे. सवर्ण स्त्रीपुरुषांची संतति सवर्ण असेंच न म्हणतां मनु सजातीय असेंच स्पष्ट म्हणतो. जात्यास्त्रेयास्त अेव ते । मनु वर्णांना जाति शब्द पुष्कळ वेळां (१०।५, ४१, ४३, ४५, ६४, ९७) वापरतो. वसिष्ठ म्हणतो की, मनु जातिधर्म सांगतो. मनूंतहि असेंच (१।११८) म्हटलें आहे. चार वर्ण म्हणजे चार मुख्य जाति. व चार वर्णांत न मोडणाऱ्या जातींना अनुलोमसंकर किंवा प्रतिलोमसंकरांत टाकलें आहे; अुदाहरणार्थ, चाण्डाल या जातीचे धर्म मन्वादि स्मृति विस्तारानेच सांगतात.

श्री. चापेकर म्हणतात की, चातुर्वर्ण्याने जातिसंस्थेची नांगीच मोडली. हें मत वर वर दिसावयास अुपपत्तियुक्त वाटतें, व अनेक लोक स्मृतींचें हें महत्त्वाचें समाजसुधारणेचें (अ-यशस्वी झालेलें) कार्य आहे असें मानतात. त्यांनी स्मृतींचा सांगोपांग विचारच केलेला नाही. जातिभेदाचा विस्तार कमी करून जातींना चार वर्णांच्या चार गटांत आणून सोडण्याचें काम करण्याकरितां स्मृतींनी चातुर्वर्ण्याचा अुपयोग केलेलाच नाही. व अुलट जातिभेदाला वर्ण, अनु-लोमसंकर व प्रतिलोमसंकर यांपैकी कशांत तरी बसवून दृढ केलें. अनुलोमसंकर व प्रतिलोमसंकर यांची संख्या ठराविक नसून त्यांची गणितश्रेढीने वाढ होत असते. (सकरसंकराश्चासंख्येयाः । विष्णुस्मृति.) या न संपणाऱ्या संकरचक्रांत चार वर्णांत न मोडणाऱ्या जातींना बसविण्याचा प्रयत्न स्मृतिकारांनी केला आहे. संकर हा अेक संकेत आहे. या संकेताने जातिभेद मोडण्याचे अैवजी किंवा कमी करण्याचे अैवजी जातिभेद चांगला दृढ व स्थिर केला. जातिभेदाला दैवी तत्त्वाचा आधार देअून चिरंतन मूल्य निर्माण केलें. कोणत्याहि वर्णास जन्मपूर्वकर्माधीन मानून स्मृतिकारांनी कर्मविपाकाच्या सिद्धान्ताचा वर्णव्यवस्थेला व जाति व्यवस्थेला आधार दिला व वेदांपासूनच वर्ण अीश्वरनिर्मित ठरवून दैवी अुपपत्तीचा जन्मसिद्ध वर्णव्यवस्थेला आधार दिला. अितर जातींना यांच चारवर्णांच्या अनुलोम किंवा प्रतिलोम अशा संकरांत किंवा संकरांतून निर्माण झालेल्या संकरांत बसवून अीश्वर व कर्मविपाक या मनुष्याच्या स्वाधीन नसलेल्या शक्तींच्या आधीन जातिभेद करून दिला व जातिभेदाच्या नांगीला अमर केलें व विषपूर्ण केलें. स्मृतींत संकरजाति म्हणून शुद्ध चातुर्वर्ण्यांत न बसणाऱ्या ज्या जाति सांगितल्या त्या खरोखरच संकरज आहेत असें नाही; अुदाहरणार्थ यवन, आभीर, मागध, द्रविड मल्ल निच्छवि, वैदेहक, अन्ध्र, किरात, कारूप, माहिष्य अित्यादि. जुन्या स्मृतिकारांनी संकरजाति म्हणून सांगितलेल्या अनेक जाति मूळच्या भिन्नदेशीय, भिन्न संस्कृतीच्या जमाती असून त्यांचा पूर्वसिद्ध चतुर्वर्णांशीं संसर्ग आल्यावर त्यांना जन्मसिद्ध वर्णव्यवस्थेच्या संकरकल्पनेंत बसविलें. त्यामुळे जातिभेद कमी न

करतां जातिभेदाचें समर्थक अेक तत्त्वज्ञान लागू करून त्याला पूर्ण दृढ व शाश्वत मूल्य अर्पण केलें.

श्री. चापेकरांनी अितरहि पुष्कळच निरर्गल आक्षेप घेतले आहेत. त्या सगळयांचीं अुत्तरें देणें म्हणजे कालक्षेप करणेंच होय.

जातां जातां अेक मुद्दा सांगून लेख संपवितो. माझी या टीकाकारांनी जुन्या सुधारकांशीं तुलना केली आहे. लोकहितवादी, राममोहन राय, विद्यासागर, भांडारकर, रानडे, आगरकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर अि० जुने सुधारक होत. त्यांच्याअितकी माझी योग्यता मुळींच नाही. परंतु निंदेस्तव कां होअीना, त्यांनीं जी माझी त्यांच्याशीं तुलना केली त्यामुळे मला धन्यता वाटते. माझें असें मत आहे की, त्या सुधारकांची सुधारणाविषयक विचारसरणी भारतीय समाजांत प्रभावी झाली नाही, त्यामुळे हा समाज अनेक शतकें संस्कृतिक्षेत्रांत व सामाजिक बाबतींत मागे राहिला आहे. ज्यांनी त्यांना विरोध केला त्यांनी प्रगतीच्या मार्गात अडथळे अुत्पन्न केले; त्यामुळे पुरोगामी प्रवृत्तींचा पराभव होअून या देशांतील समाज कुंठित-गति होअून सामाजिक व राजकीय क्षेत्रांत अेकामागून अेक येणाऱ्या अपयशांचा तो दुर्दैवी भागीदार होत आहे.

---

## स्त्रियांच्या म्हणी

(६३ व्या अंकावरून पुढे)

(६३१) भेमटा घेतो चिमटा, अन् बडबड्याचा होतो बोभाटा.

(६३२) असलँ म्हणजे शिशी बस, अन् नसलँ म्हणजे स्वप्नीं दिस.

(६३३) फुकटचें गावलें, अन् बापलेक धावले.

(६३४) द्यायला धडाभर, घ्यायला पासंगभर.

(अुसने नेलेलें पीठ परत आणून देतांना अेक बाअी म्हणाली, 'मीं थोडें अधिकच आणून दिलें. अुसने फेडतांना अुदारपणा दाखवावा; अुसने घेतांना पासंगभर कमी असलें तरी चालेल. किंवा सामान्य अर्थ घ्यावा.)

(६३५) वाटेवर बस, कळ पूस.

(चवाठ्यावर बसायचें, अन् जाणाऱ्या-अेणाऱ्यांच्या भांडाणाची चौकशी करायची.)

(६३६) हिशेबाला रती, आणि बक्षिसाला हत्ती.

(हिशेब करतेवेळीं रतिभरसुद्धा चूक होअूं देअूं नये किंवा सोडूं नये. बक्षिस देतांना हत्तीसुद्धा दिला तरी चालेल.)

नीळकंठ शंकर नवरे

म. सा. प. (१५-४-१०)

# गेल्या वर्षांतील अध्यक्षीय भाषणें

[ जानेवारी १९४१ ते डिसेंबर १९४१ ]

(लेखक— श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर)

गेल्या वर्षी असेंच वार्षिक समालोचन करतांना मीं म्हटलें होतें की वाङ्मयीन परिषदांतील अध्यक्षीय भाषणें म्हणजे जनमनांतील वाङ्मयविषयक आंदोलनांचीं निदर्शकें होत. जनमनाचा आणि अध्यक्षीय मनांचा हा संबंध अितअुत्तर हमखास सांगतां येअीलच अशी खात्री देववत नाही. अहवालाच्या वर्षांत अितक्या अनंत परिषदांत वाङ्मयविषयक तत्त्वें, वाद व घडामोडी यांसंबंधीं परस्परविरोधी अध्यक्षीय अभिप्राय व्यक्त झाले आहेत की त्या सर्वांचाच संबंध साध्याभोळ्या जनमनाशीं लावणें कठीण आहे. खांडेकरांसारख्या अतिप्रसिद्ध आणि अतिशीघ्र ललितलेखकापासून तों ललित किंवा जड यांपैकीं कांहीच नांव घेण्यासारखें ज्यांनी लिहिलें नाही अशा सभावीरांपर्यंत अनेकांनी साहित्यविषयक आकांक्षा व निराशा कंठशोष करून सांगितलेल्या आढळतील. यांपैकीं जे परिषदाध्यक्ष नव्हते अशांच्या अुद्गारांचा प्रस्तुत समालोचनांत समाचार घेतां येणार नसला तरी अध्यक्षेतरांच्या भाषणांतहि कांहीं विशिष्ट अध्यक्षांच्या भाषणांचेच पडसाद वा प्रतिषेध अैकू येत असल्यामुळे सबंध वर्षातील वाङ्मयीन भाषणें म्हणजे कांहीं विशिष्ट अध्यक्षांनी अुठवलेले मधमाशांचें मोहोळ असल्याप्रमाणे भास होतो.

परिषदाध्यक्षांच्या भाषणांपैकीं कांहीं भाषणें वाङ्मयाच्या विशिष्ट शाखांच्या वा अुपांगांच्या विवेचनाकरिता झालेलीं आढळतील; अुदाहरणार्थ रा. तात्यासाहेब केळकर यांचें मराठी अध्यापन परिषदेपुढे झालेलें भाषण. सदर भाषणांत मराठी भाषेच्या प्रगतीस व पुरस्कारास अुपयुक्त असे अनेक विवेचनीय मुद्दे येअून गेले असले तरी सदर भाषण मुख्यत्वें करून शिक्षणक्षेत्रांतच समाविष्ट केलें जाअील.

वृत्तपत्रवाङ्मय आणि नाट्यकला यांच्यासंबंधींहि रा. न. र. फाटक व रा. अत्रे या दोन विद्वान अध्यक्षांनी आपापल्या शाखेच्या परिषदेंत महत्त्वाचे विचार व्यक्त केलेले आढळतील. रा. फाटक यांचें भाषण विपुल माहिती आणि भेदक पण रसाळ वक्तृत्व यांमुळे वाखाणण्यासारखेंच ठरेल. वृत्तपत्रांतील वैयक्तिक निंदेबद्दल कल्लोळ अुठविणाऱ्या या वर्षांत त्यांनी वैयक्तिक स्तुतीच्या संप्रदायामुळेच वर्तमानपत्रांची अधिक हानि होत आहे हें फार मार्मिकपणें सांगितलें आहे. कागदाच्या महागाअीसारख्या 'वास्तवतापूर्ण' अडचणीलाहि दाद न देतां आपापल्या आखाड्याच्या वस्तादाकरिता रकानेच्या रकाने राखून ठेवणाऱ्या सर्वपरिचित साप्ताहिकांनी फाटकांसारख्या पत्रविशारदाने सांगितलेला हा कटु मंत्र ध्यानीं बाळगावा. वृत्तपत्रांनी भाषेची हानि होत आहे हा आरोप नाशाबीद करण्याकरिता रा. फाटक यांनी दाखविलेले जुन्या प्रसिद्ध वृत्तपत्रांचे दाखले अर्थात् सर्वांस मान्य होतील; पण कोणातरी मांडवलवाल्या प्रकाशकास वा मुद्रकास जोडधंदा म्हणून जन्मास येणारीं आणि कोणातरी अर्ध्या हळकुंडाने पिवळ्या झालेल्या लेखकाच्या हवालीं केलीं जाणारीं आजचीं कित्येक साप्ताहिकें आणि रॉयटरच्य

तारांच्या भीषण भाषान्तरांनी नटणारीं दैनिकें भाषेंत कोणत्या प्रकारची भर घालीत आहेत हें फाटकांसारख्या मुरब्बी भाषाप्रभूस सांगितलें पाहिजे असें नाही.

रा. अत्रे यांनी आपल्या भाषणांत केलेली नाटक व सिनेमा यांची तुलना मार्मिक आहे. सिनेमाच्या करमणुकींत नाट्याच्या करमणुकीपेक्षा अधिक चैतन्य व मानवता आहे; सिनेमा ही यंत्राच्या व नफेबाजीच्या आहारीं गेलेली कला आहे असें मार्मिक टीकाकार सिनेमाची लाट अुसळण्यापूर्वीपासूनच म्हणत आले आहेत. जें जें अधिक यांत्रिक व अधिक वेगवान तें तें अधिक पुरोगामी असें मानणाऱ्या कित्येक ‘पुरोगामी’ विद्वानांनी नाट्यकलेची नाडी पुरतीशी न चाचपतांच ती मेली असें समजून सिनेमाकलेचा अनुनय करण्याची घाअी केली नसती तर नाट्यकला अितक्या लवकर मेलीहि नसती. प्रतिभावन्त लेखकांच्या आणि सुसंस्कृत प्रेक्षकांच्या आश्रयाची गरज सिनेमापेक्षा नाटकास अधिक होती. कारण यांत्रिक हुन्नर, सवंग अनुकरण, असंस्कृत शेठ लोकांचें भांडवल आणि अशिक्षित प्रेक्षक यांच्या आधारावर सिनेमाची कला परस्पर वृद्धि पावतच होती. ‘पुरोगामी’ विद्वानांच्या चांचल्यास अल्पाहि दोष न देतां नाटककार अत्रे यांनी बिचाऱ्या नाटक कंपन्यांना आणि त्यांच्या संगीतालाच बोल लाविला आहे. ते म्हणतात संगीताच्या अतिरेकाने नाट्यकला मेली. रमणीशीं रममाण होतांना असो कीं रणभूमीवर मरण कवटाळतांना असो रागदारी छेडणाऱ्या जुन्या नाट्यकलेची चेष्टा आज अनेक वर्षें झाली असली तरी लोक गाण्याकरिताच नाटकाला जात आणि गद्य नाटक मंडळ्या संगीताभावीच झपाझप बुडत हा अनुभव महशूर आहे. नाटकाला हसणाऱ्या सिनेमानेहि चित्रनाट्यांतील ‘वास्तववादा’पेक्षा तिकिटविक्रीचा वास्तववाद अधिक ‘वास्तव’ समजून संगीताचेच पाय धरले आहेत. सारांश, भांडवलयुगाच्या आणि यंत्रयुगाच्या यच्चयावत् कुटिल आयुधांनी मुलूख जिंकणारी सिनेमाकला आणि जाहिरातीच्या गजबजाटांत अुभ्या केलेल्या कोणत्याहि नावीन्यास श्रेष्ठतर कला समजणारे ‘पुरोगामी’ सुशिक्षित हेच नाट्यकलेच्या मृत्यूबद्दल खरे जबाबदार होत. बिचाऱ्या नटाला या बाबतींत बळी देणें अन्यायाचेंच नव्हे तर कृतघ्नपणाचें होअील. नट हे कुठे झाले तरी नटच असणार. अुद्याची पर्वा न करणें, क्षुल्लक मानपानाच्या मरीला पडणें, हे दोष या कलेच्या पांचवीलाच पुजले आहेत. गणपतराव जोशी, गणपतराव बोडस, भाअूराव कोल्हटकर, नारायणराव राजहंस यांच्यासारख्यापासून गुणीपणाखेरीज आणि दिलदारपणाखेरीज समाज कशाचीच अपेक्षा करीत नसतो. व या दोन गोष्टींत आमचे नट कधीच अुणे पडले नाहीत. त्यांच्या दिलदारपणाचा अुपयोग नाट्यकलेच्या रक्षणाकडे करणें हें सुशिक्षित समाजनेत्यांचें काम होतें.

या दोन महत्त्वाच्या शाखासम्मेलनांखेरीज प्रत्यक्ष वाङ्मयसम्मेलनांतील विशेष महत्त्वाचीं भाषणें म्हणजे रा. जावडेकर, तळवलकर, मुजुमदार आणि काणेकर यांचीं भाषणें होत. ‘लोकशक्ति’ साप्ताहिकाचे विद्वान संपादक रा. शंकरराव जावडेकर यांनी मुंबअी अुपनगर साहित्यसंम्मेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांत आपली धर्ममोक्षप्रधान पुरोगामित्वाची व्याख्या फिरून अेकवार सांगितली. केवळ अर्थ आणि काम यांना वाहिलेलें वाङ्मय तेवढेंच पुरोगामी वाङ्मय असें नव्हे, आणि धर्म आणि मोक्ष यांचाहि पुरोगामी दृष्टीने विचार करतां येतो, हीं दोन तत्त्वें त्यांनी या भाषणांत सांगितलीं आहेत. व तदनुषंगाने त्यांनी जडवाद, अध्यात्मवाद, वाङ्मयीन ध्येयवाद वगैरेंची अधिकारवाणीने चर्चा केली आहे.

रा. जावडेकर यांचें प्रस्तुत विवेचन त्यांच्या बहुतेक विवेचनाप्रमाणे समन्वयवादी आणि समावेशवादी असल्याने तें जरी अनेकांस प्रथमदर्शनीं मान्य होण्यासारखें असलें तरी मूलभूत

प्रश्नांना आणि मूलगामी अुत्तरांना त्यांत स्थान नाही असें दिसून येअील. टिळकांनी गीता-रहस्यांत खोडलेला जडवाद आता शिल्लक नसून आताचा जडवाद कमी आक्षेपार्ह आहे असेंहि ते ध्वनित करतात; तर अुलट "टिळकांनी खोडलेला जडवाद तो हा नव्हे; नवीन विरोध-विकासी भौतिकवाद अुर्फ Dialectical Materialism म्हणून अेक निघाला आहे याची खबरच 'महाराष्ट्रांतील प्राध्यापक, ग्रंथकार व संपादक' यांस नाही" असेंहि रा. जावडेकर यांचें म्हणणें आहे. टिळकांच्या गीतारहस्यापलीकडे ज्यांचें तत्त्वज्ञानाविषयक वाचन गेलेलें नाही अशा प्राध्यापकसंपादकापेक्षा अधिक बुद्धिमान व व्यासंगी लेखकांची खबर रा. जावडेकर यांस नाही असें खेदानें म्हणावें लागतें. या विसाव्या शतकांत लक्ष्मीच्या स्पर्धेनेच कीं काय सरस्वतीहि चंचल बनत चालली असल्याने विद्येच्या क्षेत्रांतीलहि पिढीजादी कमी झाली आहे. पण त्याबरोबरच अनपेक्षित स्थळीं चालू असलेल्या विद्यार्जनाकडे रा. जावडेकर यांनी लक्ष पुरवलें असतें तर नव्या जडवादाचेंहि विद्वत्ताप्रचुर व संशयच्छेदक खंडन अनेक नव्या लेख-कांनी केलेलें त्यांस दिसलें असतें.

पण पुरोगामी वाङ्मयाच्या व्याख्येंत धर्ममोक्षाचा अन्तर्भाव करण्याने किंवा यांत्रिक जडवादाच्या जागीं विकासवादी जडवाद आल्याची वार्ता निवेदन केल्याने पुरोगामी वाङ्मया-संबंधीचा वाद सोडविण्यास रा. जावडेकर यांनी फारशी मदत केली असें होत नाही. अध्यात्म-वाद्यांनी जडवादाच्या नव्या रूपाचें अवलोकन केलें तरी जडवाद्यांनी अध्यात्मवादाचे अव-लोकन न केल्यास धर्म आणि मोक्ष यांच्या ध्येयाने प्रेरित असेंहि वाङ्मय पुरोगामी असूं शकतें हें कोणाला मान्य होणार? पुरोगामी कल्पनेचा प्रसार महाराष्ट्रांत फारसा न होण्याचें कारण अध्यात्मवादी लोक गीतारहस्यापलीकडे सरकले नाहीत हें नसून मार्क्सवादी लोक स्पायनोझा कान्ट तर राहोतच पण मार्क्सने ज्या तत्त्वज्ञानास विरोध करून स्वतःचा विकास केला तें हेगेलियन् तत्त्वज्ञानहि वाचावयास तयार नाहीत हें होय. बर्गसाँ, विल्यिम जेम्स किंवा नीत्शे यांस रॉयसारख्या कट्ट्या जडवाद्यांनी दिलेल्या शिव्यांपलीकडे बहुतेक तरुण मार्क्सवाद्यांनी त्यांचें अेक पुस्तकहि पाहिलें नाही असें दिसेल. अशा स्थितींत खऱ्या सर्वांगीण पुरोगामी-त्वाची व्याख्या अध्यात्मवाद्यास पटविण्याहूनहि जडवाद्यास पटविणेंच अधिक कठिण आहे याची जाणीव रा. जावडेकर यांच्या भाषणांत दिसत नाही.

धर्म आणि मोक्ष यांच्यासंबंधीच्या पुरोगामी विचारसरणींतहि रा. जावडेकर यांनी सम-न्वयावर भर देअून प्रतिपक्षाच्या विरोधास द्यावें तितकें महत्त्व दिलेलें नाही. ग्रंथप्रामाण्य आणि शब्दप्रामाण्य यांच्या बाहेर पडल्यास मोक्षाचाहि विचार पुरोगामी दृष्टीने करतां येतो हें रा. जावडेकर यांचे म्हणणें अुजूच आहे. या दृष्टीनें पाहतां पूर्वमीमांसावाद्याहून वेदान्ती हा थोडा अधिक पुरोगामी ठरेल आणि श्रुतिवाक्यांपेक्षाहि अनुभवी संतांच्या आणि द्रष्ट्यांच्या शब्दांना अधिक महत्त्व देणारा आधुनिक वेदान्ती त्याहूनहि पुरोगामी ठरेल. पण आध्यात्मिक अनुभव हे मुळीं शास्त्रशुद्ध ज्ञानसाधनच नव्हे. कारण ते वैयक्तिक असल्याने तर्कानें सिद्ध करतां येत नाही असें ज्यांचें ज्ञानशास्त्र (अुर्फ Epistemology) सांगते त्या जडवाद्यांस रा. जावडेकरांनी शब्दप्रामाण्यावर पाणी सोडलें या गोष्टीचें फारसें महत्त्व वाटणार नाही. सारांश, पुरोगामी वाङ्मयाचें हें समन्वयवादी आणि समावेशवादी विवेचन रा. जावडेकर कोणाकरिता करीत आहेत हेंच समजणें कठीण आहे. कारण ज्यांनी पुरोगामित्वाच्या कल्पनेचा गृहप्रवेश घडविला त्यांस तरी रा. जावडेकर यांच्या दिलदार दृष्टिकोनाची फारशी

मातब्बरी वाटणार नाही, हें महाराष्ट्रीय विरोधविकासवाद्यांचें वाङ्मय वाचणारांस तरी वेगळें सांगावयास नको.

वस्तुस्थिति अशी आहे की, पुरोगामित्वाच्या कल्पनेच्या बुडाशीं प्रगतीची कल्पना आहे. आणि प्रगतीच्या अनुरोधानें कोणतेंहि कार्य—वाङ्मय असो की राजकारण असो—करावयाचें म्हटल्यास मूल्यांचा प्रश्न टाळून चालत नाही. समाजाची पुढची अवस्था कोणती व मागची कोणती हा प्रश्न केवळ कालानुक्रमानेंहि सुटत नाही कीं अर्थकामांच्या विचारानेंहि सुटत नाही. मानवी जीवनाच्या अन्तिम साध्याच्या अनुसंधानानेच अर्थकामादि सामान्य ध्येयांतील यश वा प्रगति मापावयाची असते. अर्थ, काम यांच्या पलीकडे जीवनध्येय ज्यांना मान्य नाही त्यांच्या प्रगतीच्या कल्पना धनधान्यसमृद्धीच्यापलीकडे जात नसल्याने कलेच्या क्षेत्रांतील ध्येयें ते सांगूंहि शकत नाहीत, कीं समजूंहि शकत नाहीत ! या मूलभूत अडचणींचा उच्चार प्रथमपासूनच करणाऱ्या साहित्यिकास जावडेकरांसारखे समन्वयवादी पुरोगामी "वाङ्मयांत इतके खोल प्रश्न निघतात कोठे ?" म्हणून गप्प करीत आले आहेत; तर इकडे अर्थ आणि काम यांच्या पलीकडे जीवितसाफल्य न मानणारे जडवादी लोक अर्थ—कामांच्या कोंडमाऱ्यामुळेच आणि अर्थ-कामांच्या प्राप्त्यर्थच होऊं घातलेल्या हिंसात्मक क्रांतीची चाकरी करणारें साहित्य म्हणजे पुरोगामी साहित्य असें म्हणत राहिले आहेत !

यानंतरचीं प्रांतिक सम्मेलनांतील महत्त्वाचीं भाषणें म्हणजे श्री. तळवलकर व श्री. काणेकर यांचीं होत. श्रीयुत गोपीनाथ तळवलकर यांनी संयुक्त खानदेश साहित्यसम्मेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणावरूनहि जुना-नवा जडवाद आणि जुना-नवा अध्यात्मवाद यांचा सम्यक् अभ्यास करून कलेच्या क्षेत्रांतील प्रश्नांचें विवेचन करणारे साहित्यिक तरुण पिढींत आहेत असा विश्वास रा. जावडेकर यांजसारख्या साशंक हितचिंतकास येण्यास हरकत नाही. बुद्धिवादासंबंधी अलीकडे वाढत चाललेल्या अंधभक्तीपासून दोन हात दूर राहण्याचें धैर्य तरुण साहित्यिकहि दाखवूं शकतात हें रा. तळवलकर यांच्या तर्कशुद्ध व निग्रायुक्त विवेचनावरून दिसून येईल. कलेंतील सत्य व सौंदर्य हें शास्त्रीय किंवा तार्किक बुद्धीच्या वाटेने सांपडत नसून अंतरात्म्याला एकदम प्रतीत होतें. तें बाह्यप्रमाणापूर्वीच सत्य म्हणून पटतें व सत्य म्हणून सांपडतांनाच सुंदर म्हणून मोहित करतें. वाङ्मयांतील सत्याची व सौंदर्याची ही तऱ्हा "साहित्यसंगीतकलाविहीन जीवा"च्या ओळखीची नसल्याने तर्काच्या प्रांतांतील नियम व व्याख्या ते साहित्यावर लादूं पाहतात. अलीकडील साहित्यचर्चेंत या प्रवृत्तीचा अनेकदा केवढा अतिरेक होतो हें पाहिल्यास रा. तळवलकर यांनी आपल्या भाषणांत 'कलात्मक साक्षात्कारा'च्या विवेचनास दिलेले महत्त्वाचें स्थान युक्तच ठरतें. कलात्मक साक्षात्काराचें स्वरूप माहीत नसल्यास साहित्यनिर्मितींत आणि साहित्यटीकेंत कृत्रिमपणा, रुक्षपणा व पुस्तकीपणा कसा शिरतो यांचें विवेचन रा. तळवलकर यांनी अन्वयव्यतिरेकानें व सोदाहरण केलें असतें तर सामान्य साहित्यप्रेमी लोकांसहि त्यांचे म्हणणें अधिक सुगम वाटलें असतें. कलात्मक सत्यदर्शनाला त्यांनी 'साक्षात्कार' हा शब्द वापरल्यानें तर बुद्धिवादासंबंधी अंधश्रद्धा बाळगणारे 'आधुनिक' अधिकच गोंधळले. रा. तळवलकर यांनी टीकांस उत्तर म्हणून यशवंत मासिकांत याच विषयावर लिहिलेला लेख मूळ भाषणाहून स्पष्ट व सुगम आहे. खांडेकर—मांडखोलकरांसारख्या गाजलेल्या साहित्यिकांनी साहित्यांतील अराजकाचीं केलेलीं विपरीत निदानेंहि रा. तळवलकर यांनी थोडक्यांत पण समर्पकपणें खोडून काढलीं आहेत.

रा. काणेकर यांच्या भाषणावरून समाजवाद व अनेक आधुनिकवाद यांचें आधिपत्य साहित्यावर लादूं पाहणारी आधुनिक मंडळीहि मानवी आत्मा व त्याला प्रतीत होणारें अन्तिम सत्य यांची महती कशी ओळखूं लागली आहेत हें दिसून येईल. विशिष्ट पंथांचा अुपयोग विशिष्ट राजकीय सामाजिक ध्येयें प्राप्त करून घेण्यांत केव्हाहि असला तरी सत्याचा मक्ता कोणताच पंथ घेअूं शकत नाही. म्हणून प्रगतीच्या दृष्टीने अत्यंत प्रभावी अशा मार्क्स पंथाचें देखील बंधन पत्करण्यास खऱ्या साहित्यिकांनी प्रथमपासून विरोधच केला आहे. पण प्रत्यक्ष मार्क्सवादी मंडळीपैकी रा. पु. य. देशपांडे, काणेकर वगैरे मंडळीसहि अशा पंथदास्याचा अधिकाअधिक अुबग येत आहे ही गोष्ट खास आशादायक होय.

विशिष्ट राजकीय किंवा सामाजिक ध्येयापलीकडे न पाहणारा मनुष्य संपूर्ण सत्य सांगूं शकत नाही, साहित्यिक किंवा तत्त्ववेत्ताच संपूर्ण सत्य सांगूं शकतो, हें महत्त्वाचें तत्त्व ओळखल्या-बद्दल रा. काणेकर हे अभिनंदनास पात्र आहेत. कारण विशिष्ट प्रचार म्हणजेच प्रगतीस हात-भार आणि अशा 'प्रगती'स हातभार लावणें हेंच वाङ्मयाचें कार्य असें म्हणण्याच्या युगांत रा. काणेकर यांनी ओळखलेलें तत्त्व ओळखणें अधिकच अवघड असतें. पण तूर्त तरी रा काणेकर यांचें संपूर्ण सत्य 'अमुक युद्ध लोकशाही युद्ध आहे' हें सांगून तत्कालीन राजकीय पक्षाची चूक दाखविणें; ड्रेफूस प्रकरणासारख्या कुलंगड्यांत झोलासारख्या साहित्यिकाने अुठून "I accuse' असें म्हणण्याचें धाडस करणें वगैरे व्यावहारिक तंटाभांडणांतील तात्पुरत्या सत्यापलीकडे जातें असें दिसत नाही. आमच्या मतें हीं सर्व राजकीय अतअेव नैमित्तिक सत्येंच होत; व म्हणून तीं सांगण्याचें कार्य राजकारणी व्यक्तीचेंच आहे. द्रौपदी द्यूतांत पणाला लावतां येते कीं नाही; रावणाने बलात्काराने नेल्यानंतर परत आलेली सीता पवित्र कीं अपवित्र, अशा सार्वजनिक महत्त्व पावलेल्या प्रश्नांना त्या त्या काळांतील लोकांस पक्षविरोधामुळे अगर स्वार्थामुळे 'संपूर्ण सत्य' असें अुत्तर देणें सोपें नसतें. पण वादग्रस्त प्रश्नांचें सदोष अुत्तर म्हणजे राजकीय सत्य आणि निर्दोष अुत्तर म्हणजे साहित्यिक सत्य ही साहित्यिक सत्याची व्याख्या बरोबर नाही. विशिष्ट काळांतील वादग्रस्त प्रश्नांसंबंधी संपूर्ण सत्य सांगणें हें अितर क्षेत्रांतील लोकांचेंहि अवश्य कर्तव्य आहे. किंबहुना, व्यावहारिक क्षेत्रांतील लोकांस तीं सत्यें सांगण्याचें धैर्य असेल तरच कांही अुपयोग होअील.

अुलट, साहित्यिकांचें संपूर्ण सत्य हें केवळ तात्कालिक घटनेपुरतें नसतें. विचारी पुरुष-देखील द्यूतामुळे कसे वायां जातात, तेजस्वी पतिव्रतेची पतीच्या दुर्गुणांमुळे काय अवस्था होते, लोकापवाद हा आलर्क विषाप्रमाणे कसा वेगाने प्रसार पावतो; लोकापवादाच्या बाबतींत सद्‌गुणी स्त्रीचें आणि धैर्यवान् पुरुषाचें कर्तव्य कोणतें, या चिरकालीन प्रश्नांचीं अुत्तरें साहित्यिक सत्याच्या क्षेत्रांत येतात. याहूनहि विशालतर प्रश्नांचीं अुत्तरें साहित्यिकांनी दिली आहेत; व तीं त्यांस प्रत्येक युगांत द्यावीं लागतील. प्रेम, मरण, मानवी सुखदुःख, आशानिराशा, मानवी जीवनाचें अंतिम ध्येय वगैरे प्रश्नांचीं अुत्तरें म्हणजेच वाङ्मय होय. तत्त्वज्ञान व अितिहास यांतहि याच प्रश्नांचीं अुत्तरें सांपडतात पण साहित्यिक हीं उत्तरें अधिक जिव्हाळयाने व अधिक प्रेम-मय भाषेंत देत असल्याने त्यांचीं अुत्तरेंच मानवजातीस आपलीशीं वाटत आलीं आहेत.

पण मुख्य प्रश्न हा आहे की तात्पुरत्या चळवळींत गुंतलेल्या वेगवेगळ्या पंथांच्या लोकांना हें संपूर्ण सत्य झेपेल कीं नाही ! रा. काणेकर अशी तक्रार करतात की राजकारणी लोक हे पुढारी म्हणून मिरवतात आणि समाजाचें मन घडविणारा बिचारा साहित्यिक अज्ञात राहतो. पण महाराष्ट्रांत आज फॅशनेबल पंथांचीं लेबलें लावलेलीं अर्धसत्यें सांगणारें वाङ्मय-

पुरोगामी म्हणून मिरवत आहे आणि संपूर्ण सत्य सांगणारें खरें वाङ्मय अपेक्षिलें जात आहे हें अद्याप त्यांच्या ध्यानीं आलेलें नाही. आमचे मार्क्सवादी विचारवंत दिखाऊ पुरोगामित्वापासून जसजसे दूर सरकतील तसतशी त्यांस ही अनवस्थाहि उमगल्यावांचून राहणार नाही.

सांगलीचे सुप्रसिद्ध कवि श्री. साधुदास यांनीहि दक्षिण महाराष्ट्र साहित्यसम्मेलनांतील आपल्या भाषणांत प्रचलित साहित्यप्रश्नांचा ऊहापोह केलेला आढळेल. वास्तविक साधुदासांसारख्या कलंदरवृत्तीच्या ज्येष्ठ सरस्वतीपूजकाने आजच्या अराजकांतील कुतरओढींत लक्ष घातलें नाही तर त्यास कोणी दोष देणार नाही. लौकिक उलाढालींकडे दुर्लक्ष आणि साहित्यानंदांतील तल्लीनता हेंच अशा मनस्वी व्यक्तींचें वैशिष्ट्य असतें. त्यांच्या भाषणांत आजकालच्या वादांचें नीटसें आकलन आढळून येत नाही, याचा दोष ज्या त्यांच्या चाहत्यांनी त्यांस आजकालच्या वादांची खबर दिली असेल त्यांजकडेच जातो. आमचें मत मात्र असें आहे की साधुदासांसारख्या स्वच्छंद कविकोकिळाला स्वच्छंदच गाऊं द्यावें; सन्मानप्रसंगींदेखील त्यांस प्रासंगिक विषयांची 'फर्माअिशी' करूं नये.

शाखासम्मेलनें व प्रांतिक सम्मेलनें या सर्वांहून अधिक महत्त्वाचें असें राहतां राहिलेलें भाषण म्हणजे श्री. वि. स. खांडेकर यांचें सोलापूर साहित्य-संम्मेलनांतील भाषण होय. या भाषणास अखिल महाराष्ट्रीय साहित्यसम्मेलनाच्या अध्यक्षांचें भाषण म्हणून जेवढें महत्त्व आहे तेवढेंच सुप्रसिद्ध वि. स. खांडेकर यांचें भाषण म्हणून महत्त्व आहे. खांडेकरांचे उद्गार म्हटले की अेका अत्यंत लोकप्रिय कथालेखकाचे चतुरालाप, नवीनांत नवीन मतप्रणालींची अेकत्रित ओळख आणि तल्लख कोटिक्रमांत सरमिसळ होऊन मिरवणाऱ्या कल्पनाविलासाच्या मिरवणुकी साहित्यभक्तांच्या डोळ्यांपुढे नाचूं लागतात ! छोटीशी प्रस्तावना किंवा बोटभर अभिप्राय असला तरी त्यांतहि या गोड साहित्यिकाने रांधलेलीं हीं पक्वान्नें वाचकास पोटभर सेवन करतां येतात; मग वर्षभर दिवाळी-दसरा करणाऱ्या या शब्दसृष्टीच्या कारागिराकडे वर्षांतील प्रमुख साहित्यसणाचें आधिपत्य दिल्यावर जो वाग्विलास झाला असेल त्याची कल्पना मराठी वाचकांस वेगळी सांगावयास पाहिजे असें नाही. रा. खांडेकर यांच्या सोलापूर येथील भाषणांत तीव्र स्मरणशक्ति, झगझगीत कोटिक्रम, भूल पाडणारी भाषा व विसंगत मतांचें मोहक उड्डाण या सर्वांनी अेकच गर्दी करून सोडली आहे. तें भाषण वाचल्यावर वाचकांस विचारशक्तीचेंहि विस्मरण होतें,—मग मतभेद दाखविणें किती जिवावर येत असेल सांगणेंच नको.

पण अितक्या नजरबंदींतून व दारूकामांतून शिल्लक राहाण्याअितकी ज्याची वैचारिक बैठक पक्की असेल तो तें भाषण पुनः पुनः वाचील व प्रत्येक वेळेस अधिकच गोंधळून अखेर भाषण गुंडाळून ठेवील. खांडेकरांच्या प्रत्येक ताज्या भाषणांत वा प्रस्तावनेंत नवीनांत नवीन पाश्चात्य मतांचे आणि ग्रंथांचे जप सांपडतात; तसेंच केवळ सामान्य सिद्धान्त नव्या नव्या दृष्टान्तांनी सांगितलेले आढळतात तथापि सुभाषितमय अशा त्यांच्या अेका उद्गारांची दुसऱ्या उद्गाराशीं आणि सर्व उद्गारांची त्यांच्या स्वतःच्या ललितकृतींशीं संगति लावूं पाहणाऱ्याच्या पदरीं मात्र निराशा येते. श्री. खांडेकर यांचें सोलापूर येथील झगझगीत वक्तृत्व हें या प्रकाराचा अेक उत्कृष्ट नमुना होय. सदर भाषणांत त्यांनी आपल्या अिमानी स्मरणशक्तीच्या साहाय्याने गेल्या अनेक वर्षांतील मराठी वाङ्मयाचा मार्मिक आढावा घेऊन नंतर अगदी अलीकडच्या वाङ्मयाची वैद्यकीय तपासणी केली आहे. अलीकडच्या वाङ्मयाबद्दल त्यांच्याहि मनांत असंतोषच वसत असल्याचें पाहून वाचकांस आनंदाबरोबरच आश्चर्यहि वाटतें,

कारण अलीकडच्या मराठी कथावाङ्मयांत व साहित्यचर्चेंत जी कृत्रिमता आणि अप्रातिनिधिकता माजली आहे तिला रा. खांडेकरांचा खास दुजोरा असेल असें वाचक धरूनच चाललेला असतो. पण अचंबा आणि अपेक्षाभंग पत्करूनहि वाचक खांडेकरांचे आभारच मानतो. कारण हरिभाऊंनंतरच्या कथावाङ्मयांत वास्तवता आणि आधुनिकता यांच्या नांवाखाली जें कृत्रिम, उद्दीपक आणि विसंगत जग रंगविलें जातें त्याचा निषेध विचारवंतांनी अनेकदा केला असला तरी खांडेकरांसारख्या लोकप्रिय लेखकाने फिरून एकवार तो करणें जरूरच होतें. कृत्रिम आणि वैषयिक कथावाङ्मयाबरोबरच उसन्या आणि एकांगी 'तत्त्वज्ञानां'नी भरलेल्या चर्चात्मक वाङ्मयाचा, तसेंच अलंकारिक पण अर्थशून्य भाषाशैलीचाहि निषेध त्यांनी केला असता तर अधिक बरें झालें असतें. पण प्रत्येक ताज्या इंग्लिश मेलमधून आठवड्यापुरतीं उसनीं घेतलेलीं मतें (तत्त्वज्ञानें?) आणि कोल्हटकरांच्या काळांतील शाब्दिक खेळ अद्याप खेळणारी पोरकट भाषासरणी यांतील कृत्रिमता श्री. खांडेकर यांनी अद्याप ओळखली नाहीसें दिसतें.

पण रा. खांडेकर यांच्या तत्त्वबोधांतील आणि प्रत्यक्ष (ललित)कृतींतील विसंगतीची संगति लावण्यास त्यांच्या स्वतःच्या वाढीचें सिंहावलोकन केलें पाहिजे. भाषाशैलींत ते स्वतःस कोल्हटकरांचे शागिर्द आणि गडकऱ्यांचे प्रतिमल्ल समजतात. पण कोल्हटकर-गडकऱ्यांचा वैचारिक स्वास्थ्याचा काळ संपून एकोणीसशेंवीसनंतरचा शॉ-चेस्टरटन-केतकरादींच्या बौद्धिक झंझावाताचा काळ सुरू झाला. त्यांतच मार्क्सवादासारखें क्रांतिकारक तत्त्वज्ञानहि त्याच सुमारास महाराष्ट्रीय साहित्यिकास प्रथमच दिसलें. मागे न पडणें हा आधुनिक बुद्धिवाद्यांचा आद्यधर्म असल्याने रा. खांडेकर यांनी अत्यंत शास्त्रीय आणि वास्तववादी अशीं सत्यें अत्यंत 'अवास्तव' अशा कोल्हटकरी मार्षेत सांगण्याची अवघड करामत करण्यास सुरवात केली. यापूर्वी रा. खांडेकर यांस कोणतेंच तत्त्वज्ञान नव्हते असें नाही. जे लोक १९२५ ते ३० च्या दरम्यान मार्क्स आणि फ्राइड यांचीं तत्त्वज्ञानें बोलूं लागलें ते तत्पूर्वी आगरकर यांचें तत्त्वज्ञान बोलत असत. रा. खांडेकर यांच्या सोलापूर येथील भाषणाची छाननी केल्यास कोल्हटकर-युगांतील भाषाविलास आणि आगरकरांच्या काळांतील तत्त्वज्ञान यांच्या बाहेर न पडलेल्या एका चतुर व तल्लख साहित्यिकाने मार्क्स, फ्राइड यांचीं अवजड हत्यारें पेलण्याचा केलेला प्रयत्न उघडा पडेल. रा. खांडेकर यांनी ज्या अनेक विद्यमान लेखकांचे दोष दाखविले आहेत त्यांच्या लेखनांत दोष नाहीत असें नाही; पण हेंडरसन्, कॉडवेल वगैरे कम्यूनिस्ट टीकाकार प्रसिद्ध पाश्चात्य लेखकांच्या दोषांची जी सामाजिक आणि मानसशास्त्रीय संगति लावतात ती जशीच्या तशीच आपल्या लेखकांना लावण्याच्या सवंग प्रवृत्तीमुळे रा. खांडेकर यांचें प्रचलित वाङ्मयपरीक्षण मूळ वाङ्मयाहूनहि असत्य आणि कृत्रिम झालें आहे. शॉ, लॅरेन्स यांचे कॉडवेलने काढलेले दोष, जॉइस्चे हेंडरसनने काढलेले दोष आणि फडके, अत्रे, यांच्या सारख्यांच्या लिहिण्यांतील दोष यांत अंतर आहे. अनुकरण आणि पुस्तकांवर पुस्तक काढण्याची घाई हेच आमच्यांतील शीघ्रप्रसू लेखकांचे दोष होत. ते पराभूत मध्यमवर्गीतील आहेत कीं विजयी मांडवलदारांपैकी आहेत हें पाहण्याची वेळच येत नाही. जेव्हा ते त्यांच्या-जवळ आहे त्यांतील उत्तमोत्तम व उत्कटोत्कट देण्याची तकलीफ घेतील तेव्हाच जुन्या किंवा नव्या टीकास्त्राला हात घालण्याची जरूरी ! या दृष्टीने पाहतां रा. यशवन्त गोपाळ जोशी यांनी आपल्या उपहासनिपुण लेखणीने अनंत वेळा केलेली आजच्या ब्रेगडी वाङ्मयाची मीमांसा अधिक मार्मिकपणाची ठरेल; तसेंच रा. लाड यांनी वसंतव्याख्यान

अनुक्रमणिका

मालेंत केलेली मीमांसा रा. खांडेकर यांच्या मीमांसेहून अधिक अचूक होती. फडके, अत्रे यांसारख्या बहुप्रसू लेखकांच्या दोषांच्या अुगमाप्रमाणेच त्यांच्या लोकप्रियतेचाहि अुगम रा. खांडेकर यांस सांपडलेला नाही अुदाहरणार्थ, रा. अत्रे यांच्या विनोदांत अुच्छृंखलपणा असला, किंवा त्यांच्या नाटकांतील अेखादें कथानक विस्काळित किंवा अतिरंजित असलें तरी पुरोगामी पोपटपंचीला, आणि कोल्हटकरी कोट्याकल्पनांच्या कोलांट्यांना कंटाळलेले वाचक आडदांड पण निरोगी सोवत म्हणूनच अत्रेय वाङ्मय अधाशीपणें वाचतात.

तरी अशा प्रसिद्ध लेखकांचें रोगनिदान करणें ही कामगिरी तितकीशी अवघड नव्हती कारण त्यापैकी प्रत्येकाचें सामर्थ्य जसें सर्वपरिचित आहे तसा प्रत्येकाच्या लेखनाला लागलेला अेकअेक रोगहि सर्वपरिचितच आहे; पण या लेखकांअितक्या प्रसिद्ध नसलेल्या लेखकांच्या गुणांची वा दोषांची चर्चा करतांना तर रा. खांडेकर यांनी प्राथमिक साहित्य दृष्टीचाहि अभाव दाखविला आहे. त्यांनी अुपेक्षित ठरविलेले दोन कवि चांगल्यापैकी आहेत असें लोकहि मानतात, पण त्यांच्या विशिष्ट कवितांवर मत देतांना मात्र रा. खांडेकर यांची रसज्ञता अुघडी पडली आहे. "तेथें कर माझे जुळती" या रा. बोरकर यांच्या कवितेंत गुणांपेक्षा दोषच अधिक आहेत. तांब्यांचें अपेशी अनुकरण आणि मानवता, यज्ञ वगैरे पुरोगामी शब्दसाहित्य यामुळे रा. खांडेकर सदर कवितेचें अंतरंग अुदात्त समजत असावे ! आणि अशुद्ध भाषा, वृत्तदोष वगैरे तर त्यांना समजलेच नसावे. बोरकरांच्या चांगल्या कविता निवडतां आल्या असत्या पण सदर कविता निवडण्याने बोरकरांहून खाडेकरांचेंच 'नांव' होण्याचा अधिक संभव आहे !

आपल्या सध्याच्या वाङ्मयांत कृत्रिम, शृंगारप्रधान व विकृत वाङ्मयाचीच वाढ होत आहे अशी जुनीच हाकाटी करीत असतां रा. खांडेकर सुरक्षित प्रदेशांतच वावरत होते. पण कोणतें प्रेमवाङ्मय अनुभूतींतून निघालेलें, कोणतें कृत्रिम, कोणतें विकृत, याची चर्चा करतां करतां फडके–अत्र्यांसारख्या बहुचर्चित साहित्यिकांकडून तों नव्या साहित्याकडे वळतांच आगरकरी सुधारणावाद आणि मार्क्सपंथी पाठांतर त्यांस अपुरीं पडलीं. आजच्या मध्यमवर्गांत खऱ्या प्रेमाचा अनुभवच मिळणें कठीण असें म्हणणाऱ्या आणि त्याहूनहि मागच्या पिढींत तारुण्य घालविलेल्या अेका कोल्हटकरशिष्यास कोणत्या प्रेमवाङ्मयांत अनुभव आहे व कोणत्यांत नाहीं हें सांगण्याचा अधिकार काय ? झ्वाईगकृत अनामिकेचें पत्र (unknown याचें खांडेकर कृत मापांतर !) भावमधुर प्रीतीचें चित्र होय, आणि अेखाद्या महाराष्ट्रीय कथेंतील नायकाने सांगितलेली प्रीतीची तऱ्हा प्रीतीच्या तऱ्हेला सोडून होय वगैरे ठरविण्याचा रा. खाडेकर यांस अधिकार नाही असें त्यांच्या म्हणण्यावरूनच ठरतें ! खांडेकर झ्वाइगच्या देशांत जन्मले असेंहि नाही कीं जो प्रेमानुभव आज तरुण असलेल्या लोकांना अुपलब्ध नाही, तो खांडेकरांच्या बालपणीं मात्र सार्वजनिक होता असेंहि त्यांस म्हणवणार नाही. त्यांच्या स्वतःच्या प्रेमवाङ्मयावरून पाहतां प्रेम ही आगरकरी समाजसुधारणेसारखी अेक पुस्तकी आणि धोपटमार्गी वस्तु आहे,— फार तर प्रेमी जीव अितर जीवांहून अधिक कोट्या करतात अेवढाच बोध होअील !

वस्तुस्थिति अशी आहे की रशियन, जर्मन व बंगाली कथावाङ्मयांतील कठोर आत्मपरीक्षक वास्तववादाची आणि सूक्ष्म, सूचक, लेखनशैलीची रा. खांडेकर यांस ओळख होणें प्रकृत्याच अशक्य आहे. आगरकरपंथी सुलभ सुधारणावाद आणि कोल्हटकरपंथी बेगडी भाषा याच्या पलीकडे आजच्या वाचकांची अभिरुचि व आजच्या बुद्धिमान लेखकांची मजल पुष्कळच गेली आहे. झ्वाअिगचें Letter from an Unknown Woman महाराष्ट्रीय लेखकाने

लिहिलें असतें तर खांडेकरांनी तें विकृत ठरविलें नसतें असें नाही. 'क्रूझनर सोनटा' हें टॉल्स्टाय्चें भीषण विकारचित्र त्यांस विकृत आणि वैषयिकच वाटेल. शेक्सपीअरच्या आथेल्लो-मध्ये मत्सरनिर्मित विकृतीखेरीच कांहीच दिसणार नाही. न्यूए, शॉ यांचीं विवाहविषयक नाटकें वाचून तर आपल्या अिष्टमित्रांचे प्रतिष्ठित विवाह, केवळ प्रेमशून्यच नव्हत तर कायदेशीर 'तनुविक्रय व्यवसाय' ठरत आहेत असा भास होअून रा. खांडेकर यांच्या बेगडी पुरोगामित्वास अूर्ध्व होण्याची वेळ येअील! कारण मानवी दुर्बलतेचें व दुःखांचें कठोर वास्तव-वादी कलेने चित्रण करून त्या पलीकडील प्रगति व पूर्णता सूचित करणारी अुच्चत्तर कला त्यांस ज्ञात नाही. भावनांचा अनुभव जितका लेखनांत आवश्यक तितकाच लेखनाच्या आकलनासहि आवश्यक असतो. रा. खांडेकर हें अलंकारिक आणि नीतिपाठात्मक (Rhetorical and Didactical) साहित्याच्या पिढींतील आहेत. आधुनिक वास्तववादांतील निसर्गतुल्य भीषणरम्यता आणि आधुनिक कविमनास दिसणारें अंतिम सत्याचें द्वंद्वनिर्द्वंद्वमय (Dialectcal) स्वरूप त्यांच्या आगरकरी डोळ्यांस दिसणारहि नाही व साहवणारहि नाही!

आजकालच्या वाङ्मयाविषयीं गंभीर असंतोष व्यक्त करण्याच्या आजकालच्या प्रथेला हातभार लावण्याकरिता रा. खांडेकर यांनी केलेल्या या अध्यक्षीय निरूपणांत मिथ्यानिदानच फक्त आहे असें नव्हे तर मिथ्याचारहि आहे. कारण आजच्या वाङ्मयांतील प्रमुख दोष रा. खांडेकर यांच्याहि वाङ्मयांत सांपडतात. कृत्रिमता आणि बेगडीपणा हे खास खांडेकरी दोष सोडले तरी विकृत आणि अपवादात्मक जीवन रंगविण्याचें अुदाहरण त्यांच्या 'छाया' चित्रपटांतील 'पवित्र गुन्ह्या' हून अधिक कोणतें दाखवितां येअील? पण परमार्थासाठीं संभोगविक्रय करणें हा रा. खांडेकर यांचा अेक आवडता विषय दिसतो. कारण प्रसिद्ध आधुनिक लेखकांची कीव करीत करीत त्यांनी जें अेक प्रातिनिधिक आणि अविकृत जीवनाचें कथानक म्हणून अध्यक्षपदावरून खोलून दाखविलें आहे तेंहि अेका रखेलीने अेक नवीन दाता गांठून पहिल्या प्रियकरास पोटगी पाठविल्याचेंच!

अर्थात् रा. खांडेकर यांच्या या विकृत आवडीचें मूळ मी त्यांच्या जीवनांतहि शोधीत नाही कीं 'पराभूत मध्यम' पणांतहि बसवीत नाही. कारण हरिभाअूनंतर बहरलेल्या अवास्तव वास्तववादाचें मूळ, लेखकांतहि नाही कीं त्यांच्या समाजथरांतहि नाही; तर तें लेखकाच्या अनुकरण प्रियतेंत व प्रसिद्धिलोलुपतेत आहे. व म्हणूनच खांडेकरांसारखे बहुप्रसू लेखक रोगनिदान करूनहि स्वतः रोगमुक्त होअूं शकत नाहीत. कदाचित् अप्रबुद्ध प्रकाशकांस झुलविण्यासाठी या अनुकरणात्मक विकृति आवश्यकहि असतील. पण जेव्हा केतकरांसारखा किंवा तज्जातीय अेखादा लेखक प्रत्यक्ष अवलोकनांतून व अनुभवांतून अेखादें कथानक घेअून नेहमीच्याच प्रसंगाचें नवीन पृथक्करण करतो तेव्हा या पुस्तकी व कृत्रिम टीकाकारांनी प्रत्यक्ष निसर्गालाच विकृत म्हणण्याचें धाडस तरी करूं नये!

रा. खांडेकर हे मागे न पडण्याच्या धडपडीखातर नव्या जुन्या मतांची जी गल्लत करतात ती न करतील तर मार्क्सपूर्व जमान्यांतील कथावाङ्मय व टीकावाङ्मय ते चातुर्याने लिहितील यांत शंका नाही. पण धांदल आणि पुस्तकीपणा यांमुळे ते आज घडोघडीं जीं अैसपैस मतें मांडतात तीं अप्रबुद्धांना चतुरालापासारखीं वाटलीं तरी विचारी विद्वानांची निराशा करतात असे दिसून येअील. तात्कालिक कारणांमुळे स्तुति करणारे लोक दुर्लक्षून चिरकालीन कीर्तीकडे पाहण्याची हीच वेळ आहे हें त्यांनी ओळखावयास हवें.

सोलापूर येथील मानाच्या स्थानाचा अुपयोग अशा टिकाअू साहित्यसेवेची पहिली पायरी बांधून काढण्याकडे श्री. खांडेकर यांनी केला नाही ही दुःखाची गोष्ट होय.

---

# अि. स. १९४१ चें सांवत्सरिक साहित्य-समालोचन



## अितिहास-राज्यशास्त्र-अर्थशास्त्र-नागरिकशास्त्र

१९४० च्या ग्रंथांवरील परीक्षणें अेप्रिल १९४१ च्या साहित्यपत्रिकेच्या अंकांत प्रसिद्ध होअून दीड वर्ष होत आलें आहे. तथापि त्या वेळच्याच ग्रंथोपलब्धीच्या अडचणी आजहि अनुभवावयास लागत आहेत. अशा परिस्थितींत मिळालेल्या तुटपुंज्या याद्यांवरून आणि त्याहूनहि तुटपुंज्या अशा प्रत्यक्ष पाहावयास मिळालेल्या ग्रंथांच्या संख्येवरून खालीं कांहीं विधानें करण्याचा प्रयत्न केला आहे.

अितिहासक्षेत्रांत अलीकडे बरीच मंदी आलेली आहे. आणि यद्यपि अेक दोन प्रमुख संस्था त्या क्षेत्रांत कार्य करतांना दिसत असल्या, तथापि त्यांचें कार्य अेकंदर अैतिहासिक ग्रंथसंपत्तींत प्रत्यक्ष भर घालण्याच्या दृष्टीने तितकें प्रभावी दिसत नाही. त्यापेक्षा अेकदा काढलेल्या संस्थांचा कसाबसा योगक्षेम चालविणें यांतच त्यांचें सर्व सामर्थ्य खर्च होतांना आढळतें. अितर कोणत्याहि विषयांच्या वांट्याला अशा तऱ्हेचें संस्थांचें पाठबळ नसतांनाहि त्या विषयांतील ग्रंथप्रकाशन चालू आहे. अितिहासक्षेत्रांतहि (नांवाला संस्थांचा टिळा ज्यांस लागला आहे त्यांचा विचार करतां) वैयक्तिक जबाबदारीवर झालेलें प्रकाशन संख्येने व विविधतेनेहि कमी नाही. यामुळे अेखाद्या विषयाचा पुरस्कार यशस्वी तऱ्हेने होण्याला संस्थास्थापन हाच प्रभावी मार्ग आहे असें म्हणतां येत नाहीं. असो.

अितिहासविषयक 'साधनग्रंथ' नांव घेण्यासारखा अेकच झाला; तो श्री. कृ. वा. पुरंदरे यांचा 'बापू गोखले यांचा पत्रव्यवहार' होय. बडोदें राज्यदप्तरांतील अैतिहासिक वेंचे खंड ६ व बडोद्याच्याच पुराणवस्तुसंशोधनखात्याचा १९३९ चा अहवाल हीं पुस्तकें बडोदें सरकारच्या अितिहासप्रेमाची साक्ष पटवतात व प्रतापशस्त्रागार हें त्याच सरकारच्या शस्त्रागारविषयक पुस्तक हेंहि त्यांना भूषणास्पद समजलें पाहिजे. 'साधनपरिचय' अथवा 'महाराष्ट्राचा पत्ररूप अितिहास' हा श्री. द. वि. आपटे व प्रो. ओतुरकर यांनी संपादिलेला संकलनग्रंथ म्हणजे श्री. आपटे यांच्या 'अितिहास-मञ्जरीचा'च पुढचा खंड होय. श्री. नातू यांनी रचलेला 'जगाचा अितिहास' लेखकाच्या अल्पवयांतहि प्रकट झालेल्या व्यासंगबुद्धीमुळे बऱ्याच लोकांच्या कुतूहलचा विषय होणें अपरिहार्य होतें. तथापि आधुनिक राजकीय व सामाजिक अितिहासाच्या तरुण अभ्यासकांना मेजवानीसारखा अगदी ताजा १८९२ ते १९३९ पर्यंतचा पत्रसंग्रह म्हटला म्हणजे श्री. न. चिं. केळकर यांच्या 'गतगोष्टींची पुरवणी' म्हणून प्रसिद्ध झालेला सुमारें तीनशे पानांचा पत्रव्यवहार होय. 'शिवाजीची राजनीति' हा श्री. भास्करराव भट यांचा अेतद्विषयक सर्व साधनांचा साक्षेपाने परामर्श घेअून तपशिलाने लिहिलेला प्रबंध म्हणून आणि त्यांत परिशिष्टरूपाने वगैरे संग्रहित केलेल्या माहितीमुळे संग्राह्य ठरेल; परंतु अितिहासविषयक सिद्धान्त प्रतिपादन करण्याचे प्रयत्न म्हणून श्री. लालजी पेंडसे यांचा 'धर्म की क्रान्ति' हा शिवाजीला क्रान्तिकारक ठरविणारा ६०-७० पृष्ठांचा निबंध आणि मुंबअी विद्यापीठाचें तर्खड पारितोषिक मिळविलेला प्रा. द. के. केळकर यांचा 'संस्कृतिसंगम' हा ३७५ पृष्ठांचा प्रबंध, हे या

सालामध्ये अेकंदरींत बरेच गाजले आणि अनेकांच्या टीकांना कारणीभूतहि झाले. कालान्तरानेच अशा ग्रंथांचें खरें मूल्य सिद्ध व्हावयाचें असतें हें खरें असलें, तथापि महत्त्वाच्या ग्रंथांचें समाधानकारक व निर्णायक परीक्षण करण्याअितपत सांगोपांग अभ्यास आजच्या महाराष्ट्रांत फार थोड्याच ठिकाणीं दिसून आला, असें खेदानें नमूद करणें भाग आहे. कुलवृत्तान्त म्हणून सोमणकुलवृत्तान्ताचें नांव याच ठिकाणीं सांगावयास पाहिजे.

महाराष्ट्राला अितिहासाची आवड मोठी आणि तशीच त्याची अैतिहासिक ग्रंथनिर्मितीची परंपराहि बरीच अुज्ज्वल. समाजशास्त्राची आवड आणि परंपरा त्या मानानें अगदी नवी आणि थोडी. रा. सा. ना. गो. चापेकर, प्रा. माटे, पंडित गो. म. जोशी अशीं हाताच्या बोटांवर मोजण्यासारखीं माणसें तात्त्विक व व्यावहारिक समाजप्रश्नांमध्ये लक्ष घालीत असलीं, तथापि नित्य नवी अशी ग्रंथनिर्मिति नाहीच म्हटलें तरी चालेल. जातिविषयक संस्था, त्यांचे अहवाल, अस्पृश्यता, बुवाबाजी अशासारख्या किरकोळ प्रश्नांवरील पुस्तिका असला माल म्हणजे निरनिराळ्या जातिसंस्थांमध्ये स्वहितसाधनासाठी चालू झालेल्या हालचालींची फक्त नोंद होय. समाजेतिहासास त्याचा पुढे मागे अुपयोग होण्यासारखा आहे अेवढेंच. प्रो. काणेकरांनी नियतकालिकांतून लिहिलेले 'रसेलनीती'वरील निबंध (रसेल यांचे लिंगविषयक विचार) आणि थत्तेदंपतीने प्रकाशित केलेलें 'पाश्चात्य स्त्रीसमाजदर्शन' यांमध्ये लेखकांनी आपापलें मतप्रदर्शन सढळ हातांनी केलें असलें, तथापि त्यांचें मूळचें परिचायक आणि परावलंबी स्वरूप लुप्त होत नाही. आपल्या समाजाचें पारंपरिक आणि आत्मिक स्वरूप पारखून त्याच्या स्थितिगतीबद्दल शास्त्रीय चर्चा आणि कांही विधायक सिद्धान्तन करणारें मूलग्राही वाङ्मय या वर्षीत वाचकांना वाचावयास मिळालेलें नाही, ही वस्तुस्थिति लपवितां येण्यासारखी नाही.

राज्यशास्त्र (Politics) व नागरिकशास्त्र (Civics) यांची गत बहुतांशीं समाजशास्त्रासारखीच आहे. चालू राज्यकारभाराचा जो आवाज प्रत्यहीं होत असतो त्याचा पडसाद फार तर प्रचारकी थाटाच्या पुस्तिकांच्या पलीकडे कधीच अुमटत नाहीं. अलीकडे सरकारपुरस्कृत ऑक्स्फर्ड प्रेसप्रकाशित पुस्तिकांचा जणुं खच पडत असतो, त्यांची व्याप्ति व अुद्देश साहजिकच अगदी मर्यादित असतात. सेवक सेवानंद, रॉयपंथी, जहाल लोकपक्षवादी, कॉंग्रेसवादी अित्यादिकांचीं अगदी प्रासंगिक स्वरूपांचीं पत्रकें आणि 'नागरिकत्व' आणि 'नागरिकत्वाचा ओनामा' अशासारखीं बहुतांशीं शालेय पुस्तकें वगळलीं म्हणजे थोडीं चिरकाल महत्त्वाचीं अशीं पांच सातच पुस्तकें राहतात. पाकिस्तान या खळबळ अुडविणाऱ्या प्रासंगिक पण जिव्हाळ्याच्या विषयावर याच वर्षी श्री. मधुसूदन कुलकर्णी यांचें सरकारजमा झालेलें 'पाकिस्तान', श्री. शि. ल. करंदीकर यांचें 'पाकिस्तानचें संकट' आणि श्री. प्रभाकर पाध्ये यांचें 'पाकिस्तान कीं पन्नास टक्के ?' अशीं तीन विवेचक आणि प्रामुख्यानें विरोधक पुस्तकें प्रकाशित झालीं. पहिल्यांतील विवेचन विशेष भावनाप्रधान, दुसऱ्यांतील विवेचक आणि तिसऱ्यांतील विशेषतः विद्वत्ताप्रचुर आणि वादविवादात्मक असलें तथापि लोकशिक्षणाच्या दृष्टीनें या तिन्ही पुस्तकांचें वैशिष्ट्य नाकारतां येणार नाही. श्री य. गो. जोशी यांच्या वादविवेचनमालेंतील विश्वकुटुंबवाद (ना. ग. गोरे), गांधीवाद (शं. द. जावडेकर), राष्ट्रवाद (श्री. य. कृ. कोल्हटकर), हिंदुत्ववाद (ज. स. करंदीकर) हीं राजकीय तत्त्वज्ञानांतील निरनिराळ्या पंथांची शास्त्रीय चिकित्सा करणारीं पुस्तकें आणि सर्व मालेचा कळसाध्याय म्हणून प्रकाशित केलेला मार्क्सच्या कॅपिटलचा सारग्रंथ ही या वर्षाची संस्मरणीय कामगिरी म्हणून नमूद करण्यासारखीच झाली आहे. 'हिंदी राष्ट्रवाद विकास आणि भवितव्य' हें श्री. स. र सुंठणकरांचें पुस्तकहि या दृष्टीनें नांव घेण्यासारखें आहे. हिंदी राष्ट्रवादाची पुरोगामी क्रान्तिवादाशीं सांगड घालून देण्याचा लेखकानें

केलेला प्रयत्न हा आजच्या कांहीं तरुण विचारवंतांची मनोभूमि समजून घेण्याच्या दृष्टीनें खचित अुपयुक्त वाटेल. 'हिन्दूंनो सावधान' हें सौ. सावित्रीदेवी मुकर्जींच्या मूळ अिंग्रजींत लिहिलेल्या पुस्तकाचें मराठी भाषान्तर आणि 'गांधीगोंधळ' हें बॅ. सावरकरांच्या 'श्रद्धानंद' साप्ताहिकांतील लोकप्रिय झालेल्या सूचक लेखांचें पुनर्मुद्रण अनेक दृष्टींनी अुपकारक होअील.

अर्थशास्त्र हाहि अत्यंत महत्त्वाचा विषय आहे. ग्रामसुधारणेसारख्या प्रश्नांचा त्यांत समावेश करून गणना केली तरी पत्रकें, टिपणें, व्याख्यानें मिळून अुपलब्ध प्रकाशनांची अेकूण संख्या वीस ते पंचवीस यापेक्षा अधिक भरणार नाहीं. यांतच श्री. ग. रा. साठे, विस्किट कारखानदार, यांनी निरनिराळ्या प्रसंगीं प्रदर्शित केलेल्या विचारांच्या संग्रहाचें ५६ पृष्ठांचें 'औद्योगिक महाराष्ट्राचे प्रश्न' हें मोठ्या नांवाचें छोटें पुस्तक धरलें पाहिजे. मोठें व शास्त्र-शुद्ध असें अेकच पुस्तक म्हणजे पिता(प्राध्यापक)-पुत्र काळे यांचें 'सहकार' हें सहकारी चळवळीवरील अर्थग्रंथमालेंतील ४ थें पुस्तक. तें लेखकांच्या लौकिकाला साजेसेंच आहे. 'अर्थ-शास्त्र की अनर्थशास्त्र' हा जॉन रस्किन् या अिंग्रज ग्रंथकाराच्या 'Unto This Last' या अिंग्रजी पुस्तकाचा आचार्य जावडेकरांसारख्या व्यासंगी लेखकानें केलेला अनुवाद अर्थातच या विभागांतील महत्त्वाची भर समजली पाहिजे. 'महात्मा गांधींच्या जीवनावर या ग्रंथानें विशेष परिणाम घडवून आणला असल्यामुळे सत्याग्रही अर्थशास्त्राचें बरोबर अकलन होण्याला या ग्रंथाचा फारच अुपयोग होण्यासारखा आहे.'

परीक्ष्य विषयांतील ग्रंथांची कांहीं ढोबळ वर्गवारी करून येथपर्यंत छाननी केल्यानंतर प्रचलित कालमहिम्याचें प्रतिबिंब महाराष्ट्राच्या ग्रंथनिर्मितींत पडलेलें दिसत आहे काय हा प्रश्न मनासमोर अुभा राहतो. आणि त्या दृष्टीनें विचार करून पाहतां बरीच निराशा पदरांत पडते. १९४१ साल म्हणजे महायुद्धाच्या, जागतिक राजकारणाच्या, हिंदी राजकीय चळवळीच्या आणि अनुषंगानें अुपस्थित झालेल्या अनेक आर्थिक वगैरे प्रश्नांच्या पडसादांनीं दुमदुमून गेलेलें वर्ष होय. कोणतेंहि वृत्तपत्र किंवा हिंदी आकांक्षांशीं समरस झालेलें प्रतिष्ठित नियत-कालिक वरवर चाळलें तरी देखील कोणते प्रश्न राष्ट्रीय वृत्तीच्या माणसांच्या अंतःकरणाची पकड घेत होते यांची यादी झटक्यासरशी तयार होअू शकेल. लष्करी, नाविक आणि विशेषतः वैमानिक युद्धपद्धतीबद्दल सामान्य वाचकाला वाटणारें कुतूहल शमवील असें अेकहि पुस्तक मराठींत झालें नाहीं. युद्ध्यमान राष्ट्रें, त्यांचे परराष्ट्रीय संबंध, त्यांची आर्थिक व युद्धविषयक कुवत, महायुद्धाचा अितिहास व त्यांतून अुद्भूत झालेले अटलांटिक चार्टरसारखे प्रश्नांची तात्त्विक व व्यावहारीक बाजू यांवर प्रकाश पडणारें मराठी वाङ्मय पुढे आलें नाहीं. महायुद्ध आणि हिंदुस्थान यांबद्दल अैतिहासिक, युद्धविषयक, आर्थिक आणि राजकारणी दृष्टीची चर्चा करणारा ग्रंथ कोणीं लिहिला नाही. ब्रिटन व हिंदुस्थान यांचे परस्पर संबंधांबद्दल अैतिहासिक राज्य-शास्त्रानुसार, घटनाशास्त्रानुसार किंवा प्रासंगिक चर्चा झाली नाही. हिंदुस्थानांत सर्वतोपरी गाजलेली १९४१ ची खानेसुमारी आणि मुसलमानांच्या व संस्थानिकांच्या, व विशेषतः हैदराबादकरांच्या अुत्तरसरकारादि प्रांत परत मिळण्याबद्दलच्या मागण्या यांचा पायाशुद्ध विचार मांडून लोकशिक्षणाचें कार्य करण्याचें कोणीं मनावर घेतलें नाही. या चालू प्रश्नांवरच अभ्यास होअू शकला नाहीं, मग प्राचीन हिंदुस्थानचें युद्धशास्त्र, अर्थशास्त्र आणि चालू युद्धशास्त्र वगैरे यांचा तौलनिक अभ्यास कोण करतो ? निरनिराळ्या कालांतील क्रान्तिपूर्ण परिस्थिति, प्रचलित महायुद्ध व मागील युद्धें यांबद्दलहि तुलनात्मक व सूचक विचार फार थोडे मांडले गेले. फार कशाला, वर सुचविलेल्या प्रकारच्या सिद्ध अशा परभाषेंतील ग्रंथसमृद्धींतून कांहीं निवडक पुष्पें

वेंचून मराठीच्या द्वारा त्यांचा फैलाव करण्याचेंहि सुलभ अनुवादाचें काम समाधानकारक झालेलें नाही. आता प्रस्तुत विषयांची पार्श्वभूमी ही बरीचशी प्रचलित राजकारणाशीं संबद्ध असल्या-मुळें परकीयहितदक्ष नोकरशाहीच्या काकदृष्टीने कोणता प्रयत्न राजद्रोही आणि शासनीय ठरेल याची शाश्वती नसल्याने लेखकवर्ग बिचकतो हेंहि खरें आहे. 'पाकिस्तान' आणि श्री. अमरेंद्र गाडगीळ यांचें 'स्टालीन' हीं प्रासंगिक विषयांवरील परिश्रमपूर्वक तयार केलेलीं पुस्तकें अल्प-काळांतच सरकारजमा झाल्याचें सर्वविश्रुत आहेच. अितरहि अडचणी कांही थोड्या नाहीत; परंतु या सर्वांचाहि विचार करून देखील या शाखेंतील विद्यमान प्रकाशनांचा आढावा घेतां भवितव्य मोठें आशादायक आहे असें मुळीच म्हणवत नाही.

दि. वि. का.

## चरित्रवाङ्मय

पाव शतकांत दोन महायुद्धें ! दुसरें पहिल्याला बरें म्हणविते असें ! तेव्हा या संस्कृति-संहारक परिस्थितींत वाङ्मयवृक्ष करपत जावा यांत काय आश्चर्य ? १९४१ सालांतील ग्रंथ-संख्या १९४० तल्या पेक्षा दिडीने खुटली असें ठोकळ अनुमान चरित्रवाङ्मयाच्या पाहणी-वरून तरी काढतां येतें. तिगस्ता सुमारे ४० पुस्तकें या विभागांत होतीं तर गुदस्ता जेमतेम २५ च भरलीं. यंदा याहिपेक्षा कमी होतील !

या पंचवीस पुस्तकांत ६ राजकीय, ६ अैतिहासिक, ६ धार्मिक-सामाजिक, २ वाङ्मयविषयक, २ कलाविषयक, १ औद्योगिक व २ संकीर्ण-सामुदायिक असें स्थूल वर्गीकरण करतां येअील. अितिहास, वाङ्मय-निबंध, बालवाङ्मय, समाज-धर्मशास्त्र या विभागांतून वरीलपैकी कांही पुस्तकें पुन्हा अन्यत्र परीक्षलीं जातीलच; व तेथे वेगळी दृष्टि कदाचित् वापरली जाअील. तथापि या चरित्रविभागाच्या समालोचनांत फक्त चरित्रलेखन-पद्धतीचें प्रमाण लावून टीका केली जाअील.

राजकीय चरित्रांत, 'स्टालिन'वर दोन पुस्तकें लिहिलीं जावीत यांत नवल तें काय ? आज स्टालिनची मर्दुमकी व देशभक्ति अद्वितीय अशीच कोणी म्हणेल. दा. पां. रानडे यांनी मुलांसाठी स्टालिनविषयी सुबोध माहिती दिली आहे व ती चित्रशाळेने प्रसिद्ध केली आहे. याच रानड्यांनी चर्चिलचेंहि लहान चरित्र लिहिलें आहे. चरित्रवाङ्मयांत भर टाकण्याचें काम चित्रशाळा कितीतरी वर्षांपासून करीत आहे. स्टालिनचें मोठें चरित्र केसरींतील अेक अुप-संपादक श्री. अमरेंद्र यांनी अुत्कृष्ट लिहिलें आहे; व त्याला मुख्य संपादकांची 'भलावणी' पण घेतली आहे. केसरीसंस्थेच्या परंपरेस अनुसरून अमरेंद्रांनी स्टालिनच्या साम्यवादावर बोथट हत्यार अुपसणें अगदी क्रमप्राप्त आहे. पण भांडवलशाहीच्या अुपासकांनी साम्यवाद विकृत स्वरूपांत दाखविला नाही तर स्वपक्षाचें समर्थन कसें होअील ? या वादंगांत य. गो. जोशी यांची वादविवेचनमाला मनाचा समतोलपणा ठेवण्यास अुपयोगी पडेल. मतें सोडल्यास अमरेंद्रांचा हा ग्रंथ चांगला विवेचक व वाचनीय आढळेल.

स्टालिनचा प्रतिस्पर्धी हिटलर याच्यावर या सालांत अेक पुस्तक आहे. Mein Kampf यावरून श्री. टिकेकरांनी हिटलरचें जें आत्मचरित्र तयार केलें आहे तें वरील मूळ न वाचलेल्यांनी अवश्य वाचावें. थोरांचीं आत्मचरित्रें आकर्षक असतातच पण फार

अुद्बोधकहि असतात. फुले आणि सावरकर यांवरील लहान चोपडयांत आणखी अेक भर पडलेली आढळते. यांचीं चांगलीं विवेचक व सत्य चरित्रें अद्याप व्हावयाचीं आहेत.

अैतिहासिक चरित्रांत सर्वांत मोठें पुस्तक 'भगवान् बुद्ध' हें आहे. बौद्धधर्मी पंडित श्री. धर्मानंद कौसुंबी यांनी मोठ्या जिव्हाळ्याने बुद्धाची बाजू पुन्हा अेकदा मांडली आहे. मोठ्याबद्दल गैरसमजहि मोठेच असतात. त्याप्रमाणे बुद्धावर वैदिक धर्मानुयायांची व आधुनिक हिंसावाद्यांची प्रखर टीका होत असते. मुनिजींनी या टीकांना सप्रमाण अुत्तरें या ग्रंथांत दिलेलीं आहेत. तथापि प्रतिपक्ष्यांचीं तोंडें थोडींच बंद होणार! श्री. तात्यासाहेब केळकर यांनी 'जोन ऑफ आर्क'चें चरित्र 'फ्रान्सची झांशीवाली' या फाकडू (catchy) नांवाने प्रसिद्ध केलें आहे. शेक्सपीयरला अिंग्लंडचा कालिदास म्हणण्याप्रमाणे ही नांवाची कोलांटी अुडी आहे. हें चरित्र सुशिक्षितांनाच समजण्यासारखें आहे. मा. के. काटदरे यांनी आपल्या संशोधकीय बुद्धीने 'विक्रम आणि शालिवाहन' व 'वत्सराज अुदयन' हीं पुस्तकें मुलांसाठी लिहिलीं आहेत तरी तीं अितिहासाभ्यासूंनी अवश्य वाचावीं. या कथांना अैतिहासिक महत्त्व आहे. श्रीसयाजी-बालवाङ्मयमालेंत अहवालाच्या सालीं 'मलिकंबर' व 'मल्हारराव होळकर' हीं छोटेखानी पुस्तकें प्रसिद्ध झालीं. बडोद्याचे प्रसिद्ध अितिहासलेखक श्री. वाकसकर यांचा 'मलिकंबर' फार विस्कळित वाटतो. द्विरुक्ति, सनांची जंत्री व पाल्हाळपणा यांमुळे माहिती चांगली असतांहि पुस्तक लहान मुलांना पाहिजे तसें अुतरलें नाही, असें खेदाने म्हणावें लागतें.

धार्मिक-सामाजिक विभागांत रे. नेहेमिया गोरे यांचीं दोन चरित्रें अुल्लेखनीय वाटतात. रे. सावरकर यांनी विशेष परिश्रमाने या अुपेक्षित निळकंठशास्त्र्यांची माहिती ग्रथित केली आहे. गेल्या शतकांतील मानकऱ्यांपैकी रे. निळकंठशास्त्री गोरे हे अेक आहेत. त्यांचें चरित्र फार मनोरंजक आहे. दुसऱ्या अेक अुपेक्षित मानकरीणबाअी म्हणजे 'पंडिता रमाबाअी' होत. पण त्यांचें प्रस्तुत चरित्र संक्षिप्त आहे. त्यांच्या काळांतील महाराष्ट्राचा सामाजिक अितिहास सविस्तर लिहावयास पाहिजे म्हणजे त्या पार्श्वभूमीवर रमाबाअी अुठून दिसतील. स्वामी रामानंद नांवाचा अेक बंगाली साधु विद्यमान आहे. त्याची जीवनकथा गंगूबाअी खेडकर यांनी लिहिली आहे. पण त्याच आता अविद्यमान आहेत! कोल्हापूरच्या बोमाऱ्यांनी अेक आत्मचरित्र आपले 'कर्ममार्गी अनुभव' देण्यासाठी लिहिलें आहे. 'कन्याकुमारीचा महिमा' श्री. आपटे यांनी वर्णिला आहे. कन्याकुमारीची अुपासना दक्षिण हिंदुस्थानांत रूढ आहे.

दोन वाङ्मयविषयक चरित्रांत प्रा. मा. का. देशपांडे यांचें 'खांडेकर, चरित्र आणि वाङ्मय' व प्रा. पंगु यांचें 'सामराज' हीं पडतात. दुसरें कॉलेज विद्यार्थ्यांसाठी आहे तेव्हा तें सामान्य वाचक साहजिक दुर्लक्षतील. प्रसिद्ध शीघ्रसाहित्यप्रसू प्राध्यापक देशपांडे यांचें फडके-अत्रे यांच्यानंतर हें तिसरें (Men of Letters of Maharashtra या प्रकारच्या मालेंतील — होय ना!) संकल्पित परिचयपुस्तक आहे. मागच्या भावंडांपेक्षा निखालस बरें आहे. 'पानें, फुलें, दगड' जें सांपडेल तें ओरबडून घेअून, मात्र बाह्य सजावट चांगली करून भराभर पुस्तकें काढण्याचा कारखाना आजकाल कांही लोकांना चांगला चालवितां येतो. पाश्चात्य वाङ्मयपरिशीलनाचे दाखले देण्यास बरीक चुकूं नये. कांही साहेब तोंडावर फेकले म्हणजे आपोआप केवढी प्रतिष्ठा प्राप्त होते!

कलात्मक वाङ्मयविभागांत 'माझा नाटकी संसार' मामा वरेरकर यांनी दाखविला आहे. हें पुस्तक नाट्यविभागांतच प्रमुखतः पडतें. आधुनिक नाट्यकार वरेरकर यांच्या पूर्व-

चरित्राची भूमिका निव्वळ नाटकी कशी होती व त्यांनी मिळविलेली कीर्ति अभ्यास आणि प्रयत्न केल्यानेच कशी आपाततः प्राप्त झाली आहे हें दिसून येतें व मामांविषयी आदर दुणावतो. मात्र मामांचें हें लिखाण संपूर्ण सत्य आहे अशी वाचकाची अेकदा खात्री पटली पाहिजे. लहानपणीं शेक्सपीअर आणि अिब्सेन यांचा तुलनात्मक अभ्यास करणारा व नाट्यविषयावर गंभीरपणें चर्चा करणारा शाळेंतील मुलगा फार थोड्यांनी पाहिला असेल. असो. तीसचाळीस वर्षांपूर्वीच्या नाटक कंपन्या आणि त्यांची स्थिति लेखकाने फार रसाळपणें वर्णिली आहे. या 'संसारा'चा दुसरा खंड बाहेर पडण्याची वाट पाहत आहों.

प्रख्यात वादनपटु श्री. गोविंदराव टेंबे यांच्या ६१ वी च्या समारंभाच्या वेळीं प्रसिद्ध केलेला 'गोविंदगुणगौव' त्यांच्या चहात्यांच्या लेखांनी भरला आहे. 'माझा संगीत व्यासंग' हा स्वतः गोविंदरावांनी लिहून घातलेला आत्मचरित्रपर ग्रंथ लवकर निघाला पाहिजे. तो खास अभ्यसनीय व मनोरंजक होअील.

औद्योगिक विभागांत फक्त महाराष्ट्र छापखानदार जावजी दादाजी यांचे चिरंजीव पांडुरंग जावजी यांचें चरित्र आहे. नंतर शेवटच्या संकीर्ण-सामुदायिक चरित्रवर्गांत श्री. द. मो. दामले यांचें 'संस्कृतीचे नंदादीप' या गोड नांवाचें थोर प्राच्यपाश्चात्य व्यक्तींची माहिती देणारें बाल-वाङ्मयांतील अेक पुस्तक आहे. यांतील १४ चरित्रें मुलांना मननीय आहेत. प्रो. गं. बा. सरदार यांनी म. सा. पत्रिकेंतून 'महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी' या अर्थपूर्ण नांवाखाली जीं पांच चरित्रें क्रमाने लिहिलीं तीं आता पुस्तकरूपाने त्यांनी पुढे ठेविलीं आहेत. १ भाअू महाजन, २ लोकहितवादी, ३ विष्णुबुवा ब्रह्मचारी, ४ विष्णुशास्त्री पंडित आणि ५ ज्योतिबा फुले या पांच चिर अुपेक्षितांना सरदारांनी आज सन्मानिलें आहे हें ठीकच झालें. पण ज्या त्या काळचीं मूल्यें वेगवेगळीं असतात हें ध्यानांत घेअून पूर्वजांना दोष द्यावा. यांतील भाअू महाजन यांविषयी माहिती नव्यानेच पुढे येत आहे. हे भाअू महाजन म्हणजे आजचे दामोदर सांवळाराम यंदे. यांच्या कर्तबगारीमुळेच साहित्यप्रांत अेवढा फुलला. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या बोलण्यालिहिण्यांत लोकशाही, मार्क्सप्रणीत समाजवाद यांसारखे आजचे अतिशय प्रगत विचार दिसून येतात. सरदारांच्या लिखाणांत वृत्तान्तपर भाग अधिक असतो. अवतरणें मोठीं व कंटाळवाणीं वाटतात. विवेचन, सकलन आणि सारकथन यांचा प्रमाणशीर अवलंब करून सुटसुटीत आणि आकर्षक मांडणी करतां येअील. हा प्रबंधरूप ग्रंथ साहित्यांत निःसंशय महत्त्वाची भर घालणारा असाच आहे.

## कोशवाङ्मय

व्यायाम ज्ञानकोशाचा ५ वा खंड या सालांत बाहेर पडला. निम्मा संकल्पित भाग—पूर्वार्ध पुरा झाला. आतां विदेशी व्यायामाची माहिती देणारा पंचखंडात्मक अुत्तरार्ध अुरला तोहि श्रीमंत मुजूमदार यांच्या कर्तृत्वपूर्ण चिकाटीमुळे निःसंशय तड गांठील. या 'स्वास्थ-विचार' नामक खंडांत शरीरविज्ञान, आरोग्यशास्त्र आणि स्वास्थविषयक वीस लेख आलेले आहेत. सामान्य वाचकालाहि ही माहिती अुपयुक्त वाटेल. यांत स्वास्थविचारावरील ६५ मराठी पुस्तकांची जी यादी दिली आहे तिचें विशेष महत्त्व आहे.

चिं. ग. क.

## शिक्षणशास्त्र

भाषा म्हणजे विचार प्रकट करण्याचें साधन हें विधान अव्यात स्वरूपाचें आहे. भाषा हें नुसतें विचाराविष्काराचें साधन नसून विचारांची अुत्पत्ति भाषेशिवाय होत नाही असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. भावनेच्या मुळाशींसुद्धा भाषेचा संबंध येतो. भाषेशिवाय दुसऱ्यां बद्दल प्रकट होणारी सहानुभूति लुळीच पडेल. अर्थात् हा सर्व विचार मातृभाषेसंबंधी आहे; परकी भाषेसंबंधी नव्हे. भाषेचें शिक्षण अपुरें, अशास्त्रीय स्वरूपाचें असेल तर व्यक्तीची व समाजाची अुन्नति थांबलीच म्हणावयाची. डॉ. मायकेल वेस्ट् म्हणतो :—

"Just as the dumb boy is hampered by his linguistic deficiency in the development of his thought and his emotion, so also many a people be hampered in their intellectual and moral development by the insufficiency of their education in its linguistic aspect."

मातृभाषेला शिक्षणक्षेत्रांत अेवढें महत्त्व असून आपल्या दुर्दैवाने आपल्या भाषेला गेल्या दीडशें वर्षांत शिक्षणक्रमांत किती अपमानास्पद स्थान दिलें गेलें आहे या विचाराने मन हादरल्याशिवाय राहत नाही. मातृभाषा परकी भाषेच्या माध्यमाने शिकावी आणि शिकवावी यासारखें स्वाभिमानशून्यजीवन कोणत्या देशांत असेल? पण आता ते दिवस संपत आले आहेत. मातृभाषेची महती वाढूं लागली आणि कांही वर्षांनी महाराष्ट्राची निर्वासित भाषाराणी सिंहासनावर आरूढ होणार याचीं पूर्वचिन्हें अुज्ज्वलित होत आहेत. याचें अुत्तम निदर्शन म्हणजे मध्यम आणि अुच्च शिक्षणसंस्थांतून आज मराठीला मिळत चाललेला योग्य मान हें होय.

अध्यापक विद्यालयांत (B. T. College) मराठीचें अध्ययन-अध्यापन आता मराठींतून होअूं लागलें आहे. मध्यम शाळांतून अितिहास, शास्त्र अित्यादि विषय मराठींतून शिकविले जात आहेत. या गोष्टी व्यवहारांत आल्याबरोबर अध्ययन-अध्यापनविषयक शास्त्रीय ग्रंथ मराठींत होणें आवश्यक झालें. "मराठीचें अध्यापन" आणि "अितिहास कसा शिकवावा" या अुपयुक्त ग्रंथांच्या अवतारामागे अेवढी पार्श्वभूमिका आहे हें विसरून चालावयाचें नाही.

"मराठीचें अध्यापन" या ग्रंथाचे लेखक श्री. अकोलकर-पाटणकर यांचा शैक्षणिक अनुभव, व्यासंग आणि शिक्षणक्षेत्रांतील कार्य या गोष्टी लक्षांत घेतां त्यांचा ग्रंथ मराठी शिक्षकांना अुपयुक्त वाटेल यांत शंका नाही. "मातृभाषा हा साऱ्या शिक्षणाचाच नव्हे तर साऱ्या जीवनाचा पाया आहे" हें मातृभाषेचें महतीगान अत्यंत परिणामकारक रीतीने पटवून दिल्यावर लेखकद्वयाने मातृभाषेच्या अध्ययनाचें शालेय अुद्दिष्ट काय यांची सांगोपांग चर्चा केली आहे.

यानंतरच्या प्रकरणांतून मराठी शिक्षकाला आवश्यक गोष्टींची—अभ्यासक्रम, पाठ्य पुस्तकें, भाषेंतील अनेकविध विषयांचें अध्यापनतंत्र— मनोरंजक आणि फारच अुद्बोधक चर्चा करून बहुजन समाजाच्या गरजा व अपेक्षा, आपली सामाजिक व राजकीय प्रगति व आकांक्षा या ध्यानांत घेअून आपण सर्वांनीच—शिक्षक-मुख्याध्यापक-शिक्षणाधिकारी— यांनी मराठीच्या अध्यापनाकडे पाहावयास पाहिजे असा स्पष्ट शब्दांत अिशारा दिला आहे. महाराष्ट्र विद्यापीठ आणि मराठी माध्यमिक शाळा स्थापन झाल्याशिवाय मराठीला भरभराटीचा आणि समृद्धीचा काळ येणार नाही या लेखकाच्या विधानाविषयी दुमत असूं शकणार नाही.

या पुस्तकाने शिक्षणवाङ्मयांत अुपयुक्त भर घातली यांत संशय नाही. मात्र मराठी

अध्यापनाचा विचार करतांना प्राथमिक शाळांतून शिकविल्या जाणाऱ्या मराठीकडे लेखकांनी दुर्लक्ष केलें असल्यामुळे पुस्तकाला थोडासा अपुरेपणा आला आहे. पुस्तकाची भाषाहि पुष्कळ ठिकाणीं परकीय भाषेच्या वळणावर गेल्याचा भास होतो.

"अितिहास कसा शिकवावा" या ग्रंथाचे लेखक रा. चितळे हेहि शिक्षणक्षेत्रांत बराच अनुभव घेतलेले आणि नामवंत कार्यकर्ते आहेत. "मराठीचें अध्यापन" या ग्रंथा-प्रमाणेच अितिहासपद्धतीवरील मराठींतील हा पहिलाच ग्रंथ आहे. अितर देशी भाषांतहि अशा तोडीचा ग्रंथ असेल असें वाटत नाही. प्रस्तुत ग्रंथांत अितिहासाध्ययनाचा खरा अुद्देश साध्य होण्यासाठी आवश्यक असणाऱ्या चार गोष्टी— तज्ज्ञ शिक्षक, 'प्रवर्तक पद्धति', अुत्कृष्ट साधनसामुग्री आणि आदर्श क्रमिक पुस्तकें-- यांबद्दलचें केलेलें विवेचन शास्त्रशुद्ध, तर्क-निष्ठ असल्यामुळे कोणालाहि पटण्याजोगेंच आहे. अितिहासाध्यापनावर अिंग्रजी भाषेत मोठ-मोठे ग्रंथराज आहेत. परंतु त्या ग्रंथांतील प्रमेयांचें अगर सिद्धान्तांचें अन्धानुकरण करण्याचा प्रयत्न लेखकाकडून झाला नाही यामुळे प्रस्तुत पुस्तकाची योग्यता खात्रीने वाढली आहे. पाश्चात्य शिक्षण पंडितांनी प्रतिपादिलेल्या पद्धती आपल्याकडे कितपत अुपयुक्त ठरतील हा साधासुधा पण व्यावहारिक विचार लेखकाने सतत मनापुढे ठेविला आहे. म्हणूनच हें पुस्तक केवळ शास्त्रीय स्वरूपाचें न राहतां शिक्षकाला योग्य मार्गदर्शन करणारें झालें आहे. या पुस्तकांतील अेक मोठें वैशिष्ट्य म्हणजे लेखकाची राष्ट्रीय विचारसरणी हें होय. प्रत्येक साधन आणि प्रत्येक पद्धति राष्ट्रीय अुपयुक्ततेचा निकषाला लावूनच लेखकाने स्वीकारली आहे. दुसऱ्या अेका गोष्टीबद्दलहि लेखक अभिनंदनाला पात्र आहेत. ती म्हणजे शुद्ध मराठी पारि-भाषिक शब्दांची योजना. जुन्या शब्दांचा योग्य वापर करण्यांत आला असून ठिकठिकाणीं नवीन शब्दहि योग्य रीतीने अुपयोजिले आहेत. रा. चितळे यांची भाषाशैली सरस असल्यामुळे आणि तींत समर्पक दृष्टान्त, अुपमा, अुदाहरणें यांची योजना झाल्यामुळे प्रस्तुत ग्रंथ शास्त्रीय स्वरूपाचा असूनहि वाचतांना वाचक कंटाळत नाही.

अध्यापनशास्त्रांतील हे दोन ग्रंथ लिहून प्रा. पाटणकर, श्री. अकोलकर आणि श्री. चितळे यांनी आपल्या मायबोलीची मोठी सेवा केली आहे. दोन्ही पुस्तकें अध्यापक-विद्यालयांत अुपयुक्त ठरतील यात शंका नाही. शिक्षणखात्याने हे दोन्ही ग्रंथ विद्यालयाच्या क्रमिक पुस्तकांच्या यादींत अवश्य घातले पाहिजेत. सुमारें अर्धशतक मराठी आणि अितिहास हे विषय अध्यापकविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत असूनहि या विषयांवर मराठींत असले ग्रंथ झाले नाहीत याची मीमांसा प्रथम केलीच आहे. असे ग्रंथ झाल्यामुळे अुच शिक्षणसंस्थांतूनहि सर्व शिक्षण मराठींतून देणें शक्य झालें आहे.

वा. दा. गो.

---

## ललितवाङ्मय

### काव्य

'मराठी कवितेला ओहोटी लागली आहे' या आक्षेपाची तपासणी करण्याचें हें स्थळ नव्हे; तथापि गेल्या अेक दीड वर्षांत काव्याची मोजदाद करूं लागलों तर या आक्षेपाला अप्रत्यक्ष आणि सहजासहजीच अुत्तर दिल्यासारखें होणार आहे.

सुप्रसिद्ध कवि प्रो. मायदेव यांनी आपली वीणाकाव्यांत रमणारी लेखणी खंडकाव्या-साठी राबवून 'सुधा' आमच्या हातीं दिली. रचनेचें शैथिल्य व बलात्कारासारख्या भयंकर



अनुक्रमणिका

प्रसंगाचें वर्णन यांचा डाग या काव्याला न लागतां तर माझ्यासारख्या त्यांच्या चहात्याला या काव्य विषयी फारच अभिमानाने बोलतां आलें असतें. जुन्यांपैकी नामवंत राजकवि यशवंत यांनी आपला "यशोनिधि" हा भावगीतसंग्रह रसिकांस सादर केला. यशवंत व्यक्ति-निष्ठ असले तरी भोवतालच्या आंदोलनाने अस्थिर होण्याची क्षमता त्यांच्यांत आहे. आणि वैयक्तिक सुखःदुखें पौराणिक कल्पनांच्या व लोकप्रिय संकेतांच्या मदतीने लोकांचीं म्हणून कशीं चटकदारपणें रंगवावींत हें त्यांना चांगलें कळतें. त्यांची कविता लोकांच्या हृदयाचा अेकदम ठाव घेते याचें रहस्य हें होय.

'तो आणि ती' हें श्री. शंकरराव साठे यांचें अुपरोधात्मक खंडकाव्य अलीकडील सुधारक-जीवनावर विदारक प्रकाश पाडणारें आहे. वृत्त व शैली या दृष्टीने कै. कविवर्य माधव जूलियन् यांच्या 'सुधारक' या अुत्कृष्ट खंडकाव्याची आठवण हें काव्य करून देतें. रा. साठे यांनी कांही कांही ठिकाणीं दाखविलेला शिथिलपणा थोड्या श्रमाने टाळतां येणें शक्य होतें. अुपरोधाला मार्मिक व रेखीव शब्दरचनेची जोड दिली असेल व मधून मधून आदर्श काव्याचा डौल आणिला असेल तर ती 'संस्कृति टीका' केवळ प्रासंगिक महत्त्वाची न राहतां अक्षरवाङ्मयांत स्थान मिळवूं शकते.

रा. साठे यांच्याप्रमाणेच 'बाबुलनाथ' यांच्या कवितांत (आकाशगंगा व जलधारा) मार्मिक अुपहास व विडंबन आहे. पण रा. साठे यांची सामाजिक दृष्टि बाबुलनाथांत नाही, आणि कित्येकदा सभ्यतेची पातळी सोडून त्यांचा विनोद वाहत जातो. हे दोष टाळले तर बाबुलनाथांना आपल्या सफाअीदार लेखणीचें अधिक चीज करतां येअील.

रा. काळेले (ओळखीचे सूर) आणि रा. दूड (पराग) यांनी आपले काव्यसंग्रह प्रसिद्ध करून मराठी कवितेच्या भवितव्याबद्दल चांगली आशा निर्माण केली आहे. हे दोघेहि कवि अद्भुतरम्यतावादी संप्रदायाचे आहेत. शब्दसौष्ठवांत दोघे सारखे आहेत. यांच्यासारखीच अुच्च व सौंदर्यसमीक्षक अभिरुचि श्री. के. नारखेडे यांच्याहि कवितांतून व्यक्त होते शिवाय नार-खेडे यांच्या कविताकन्यकेच्या तोंडावर खेडेगांवी निरोगीपणाची झाक आहे. तथापि या तिघांनीहि कांही ठरीव संकेतांची आवड सोडून पुढे सरकलें पाहिजे. थोडी पण शुद्ध व सात्त्विक रचना करणारे वरिष्ठ पिढींतले अेक कवि श्री. य. म. गद्रे यांनी आपला काव्यसंग्रह प्रसिद्ध केला आहे.

सौ. सुभेदार, सौ. काळे, सौ. अपर्णा देशपांडे यांनी आपलीं लहानमोठीं काव्यकुसुमें मराठी शारदेस वाहिलीं आहेत. रा. खर्शीकर, रा. बोरसे, रा. रायकर, विद्याकुमार, ठेकेदार, रा. पाठक यांनी लिहिलेले व संपादिलेले काव्यग्रंथ मराठी वाङ्मयाच्या काव्याचें दालन संपन्न कर-ण्यास आपापल्या परीने हातभार लावीत आहेत. सेनापति बापट व पूज्य विनोबा भावे यांचीं काव्यपुस्तकें (गांवगीता व ज्ञानेश्वराचीं भजनें) मराठी वाचकांना सादर स्वागतार्ह वाटतील.

मराठी काव्यपुस्तकांचा हा वर्षातला आढावा अगदी त्रुटित आहे, तथापि काव्याच्या सर्व शाखांचा विस्तार होतो आहे, संपादन, संकलन, नवनिर्मिति इ० सर्व तऱ्हांचीं काव्यपुष्पें नित्य अुदयास येत आहेत हें पाहून कोणालाहि आनंद वाटेल. मात्र ताम्बे यांच्या-प्रमाणे भावाविष्काराच्या या सनातन व रमणीय माध्यमावरील श्रद्धा अढळ राहिली पाहिजे. हें माध्यम अुणें पडतें अशा कल्पनेने प्रतिभाशाली साहित्यिक तें सोडून देतात ही गोष्ट कवितेच्या ऱ्हासाला कारण झाली आहे. प्रतिभेचें दारिद्र्य नव्हे, तर काव्य या माध्यमाविषयीची अश्रद्धा हीच अखेर काव्याचा नाश करते.

गो. ग. त.

## नाट्यवाङ्मय

नाट्यवाङ्मय हें अेका दृष्टीने परावलंबी वाङ्मय आहे. वृक्षाच्या आधाराने वेल वाढावी त्याप्रमाणे तें रंगभूमीच्या आधारानेच वृद्धिंगत होतें. मराठी रंगभूमीची सद्यःस्थिति मुळींच चांगली नाही ही वस्तुस्थिति सर्वमान्य आहे. ज्या वर्षीच्या नाट्यवाङ्मयाचें सिंहावलोकन मी या लेखांत करणार आहें त्या वर्षी तर मराठी रंगभूमीच्या नाकाशीं सूत धरल्यासारखी स्थिति होती. दोन-तीनच धंदेवाअीक नाटकमंडळ्या कोठल्यातरी आडगांवीं कशाबशा जीव धरून होत्या व त्यांचा सारा भर जुन्या नाटकांवर होता. नवीन नाटकें बसविण्यांची त्यांना अिच्छा व शक्तिहि नव्हती. अर्थातच नाट्यवाङ्मयनिर्मितीला, रंगभूमीच्या अभावीं, चांगलाच पायबंध बसला यांत नवल नाही. लहान-मोठीं, नवीं-जुनीं मिळून फक्त अठराच नाटकें १९४१ सालीं प्रकाशित झालीं आहेत. प्रत्यक्ष नाटकें नव्हे पण नाट्यवाङ्मयांतच ज्यांचा जरूर समावेश केला पाहिजे अशीं आणखी दोन पुस्तकें या सालीं प्रकाशित झालीं. तीं म्हणजे बडोद्याचे प्रो. वि. पां. दांडेकर यांचें **मराठी नाट्यसृष्टि**-पौराणिक नाटकें हें अेक, आणि सुविख्यात नाटककार श्री. मा. वि. वरेरकर यांचें **माझा नाटकी संसार** हें आत्मचरित्रात्मक पुस्तक दुसरें. १९४१ सालचें मराठी नाट्यवाङ्मय हें या वीस पुस्तकांपुरतें मर्यादित आहे.

१९४१ सालीं प्रकाशित झालेलीं बहुसंख्य नाटकें, खाजगी नाट्यसंस्थांच्या द्वारा रंग-भूमीवर अेखादा प्रयोग झाल्यामुळेच, जन्माला आल्याचें दिसतें. तेव्हा नाट्यवाङ्मय समृद्ध केल्याचें श्रेय या खाजगी नाट्यसंस्थांना दिलें पाहिजे. अर्थातच अशीं नाटकें लिहिणारे लेखक बहुधा हौशी, होतकरू या सदरांतलेच असल्याने त्यांच्या नाट्यवाङ्मयांत वाङ्मयगुण थोडे आणि अनुकरणवृत्ति जास्त दिसून यावी हें साहजिक आहे.

१९४१ सालच्या अखेरीस मुंबअीस आचार्य अत्रे यांच्या अध्यक्षतेखाली बत्तिसावें महाराष्ट्र नाट्यसंमेलन भरलें होतें. या संमेलनाच्या निमित्ताने श्री. काणेकर यांचें **घरकुल** आणि श्री. वरेरकरांचें **अुडतीं पांखरें** हीं दोन नाटकें रंगभूमीवर आलीं व त्यामुळेच या दोघां लोकप्रिय लेखकांच्या कृतींचा नाट्यवाङ्मयाला लाभ होअूं शकला. राजाराम संगीत मंडळीने कै. गडकरी यांचें **प्रेमसंन्यास** नाटक संगीताची जोड देअून रंगभूमीवर आणल्या-मुळे त्या गाजलेल्या नाटकाची नवी संगीत आवृत्ति या वर्षी प्रसिद्ध होअूं शकली. नाट्य-संमेलनच्या थोडें आधी नाट्यनिकेतन या नवीन नाट्यसंस्थेमार्फत श्री. मो. ग. रांगणेकरांचें **आशीर्वाद** रंगभूमीवर आल्याने रांगणेकर यांचा नाट्य प्रांगणांत पहिला प्रवेश याच वर्षी झाला.

नाट्यसंघाप्रमाणे शाळा कॉलेजेस् किंवा सामाजिक संस्था यांना अुत्सवसमारंभाच्या वेळीं छोटे छोटे नाट्यप्रयोग करण्याची गरज भासते व ती गरज भागविण्याच्या अुद्देशानें सौ. दया पटवर्धन यांचे **सात पाहुण्या** आणि श्री. स. अ. शुक्ल यांचे **चार चांदण्या** हीं पुस्तकें प्रकाशित झालीं आहेत. वेळोवेळीं लिहून वेगवेगळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या नाट्यप्रसंगांचें अशा लोकांच्या गरजेसाठी या दोन्ही पुस्तकांत संग्रह केलेले आहेत. अेकाच अुद्देशाने निघालेल्या अेकाच स्वरूपाच्या या दोन्ही पुस्तकांच्या नांवांतील सारखेपणा मोठा गंमतीचा वाटतो !

स्त्रियांच्या समाजासाठी पुरुषपात्रविरहित नाटक लिहिण्याच्या हेतूने श्री. ना. धों. ताम्हनकरांची **आमच्या आम्ही** ही नाटिका अवतरली आहे, तर शालेय मुलींसाठी श्री.

अनुक्रमणिका

ग. पां. परचुरे यांची **मैत्रिणी** आणि शाळकर मुलांसाठी श्री. दा. वि. कुलकर्णी यांची **वाढदिवस** हीं दोन चिमुकलीं पुस्तकें नाट्यवाङ्मयांत यंदा दाखल झालीं आहेत.

खाजगी नाट्यसंस्थांनी रंगभूमीवर आणल्यामुळेच ज्या पुस्तकांची भर वाङ्मयांत पडली अशा बाकीच्या नाटकांत श्री. नंदू खोटे यांचें **विभूतिपूजा** हें अेकच नाटक नांव घेण्यासारखें गुणपूर्ण आहे. नंदू खोटे यांचें हें पहिलेंच नाटक खरें, पण तें 'आशीर्वाद' या रांगणेकरांच्या याच वर्षी निघालेल्या पहिल्याच नाटकापेक्षा अधिक सरस आहे. श्री. ना. रा. अभ्यंकरकृत **सवाअी सूड** आणि श्री. द. गो. कुलकर्णीकृत **साखरपुडा** हीं दोन्ही नाटकें तितकीं सरस नसलीं, तरी त्या त्या लेखकाच्या पहिल्या नाट्यकृति म्हणून स्वागतार्ह आहेत. श्री. अंकुश राममाधव या नवीन लेखकाचें अैतिहासिक नाटक **बाघाचा वाघ**, श्री. ग. कृ. बोडस यांचें **धर्मवीर संभाजी**, श्री. श्री. कृ. ओककृत **खुनी सम्राट्**, सौ. द्वारका गुते-कृत **प्रेमाचा होम** आणि श्री. अ. वा. दामलेकृत **बंधविमोचन** हीं लहानमोठीं चोपडीं नाट्यवाङ्मयाच्या जमेला आहेत. नाट्यसंमेलनाच्या वेळींच आद्यनाटिकाकार श्री. अ. ह. गद्रे यांनी आपल्या नअू गाजलेल्या नाटिकांचा अेकत्र संग्रह करून **नाटिकानवरत्नहार** या नांवानें प्रसिद्ध केला आहे.

१९४१ सालचें नाट्यवाङ्मय हें अितकेंच. (शक्य तितका प्रयत्न करून अेवढींच पुस्तकें अुपलब्ध झालीं. यांव्यतिरिक्त कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं असल्यास त्यांची माहिती न मिळाल्या-मुळेच त्यांचा अुल्लेख करणें शक्य नव्हतें) या नाटकांपैकी 'सवाअी सूड' आणि 'खुनी सम्राट्' हीं दोन नाटकें अद्‌भुत प्रकारात्मक आहेत. 'सवाअी' सूड या नाटकाच्या प्रस्तावनेंत तें नाटक 'राक्षसी महत्त्वाकांक्षा', नाटकाच्या परंपरेंतील असल्याचें मामा वरेरकरांनी म्हटलें आहे. 'खुनी सम्राट्' हेंहि त्याच मालिकेंत बसणारें नाटक असल्यानें असल्या नाटकांना 'राक्षसी' नाटकें म्हणणें सोयीचें होअील असें मला वाटतें. 'धर्मवीर संभाजी' आणि 'बाघाचा वाघ' हीं दोन नाटकें अैतिहासिक आहेत. बाकी सर्व नाटकें व नाट्यप्रसंगहि सामाजिक असून त्यांत समा-जाच्या आजच्या प्रश्नांची चर्चा केलेली आहे. 'घरकुल' हें अेकच नाटक अिब्सेनच्या 'डॉल्स हाअुस'चें भाषांतर आहे. बाकी सर्व नाटकें स्वतंत्र आहेत.

या नाटकांतून वर्णिलेल्या विषयांची चर्चा करण्यापूर्वी नाट्यतंत्रासंबंधी थोडा अुल्लेख केला पाहिजे. ज्या अिब्सेनियन तंत्राचें मराठींत फार दिवस भयंकर स्तोम माजविलें जात होतें, त्या तंत्राचा जनक अिब्सेन याचेंच अेक नाटक भाषांतर होअून यंदा रंगभूमीवर आलें. 'घरकुल'च्या प्रस्तावनेंत श्री.के. नारायण काळे यांनी अिब्सेनच्या नाट्यतंत्राचा चिकित्सक दृष्टीने केलेला अूहापोह वाचनीय आहे. अिब्सेनच्या नाट्यतंत्राचा आत्मा लक्षांत न घेतां 'अुथळपणें अनुकरण करूं पाहा-णारे नकल्ये' अिब्सेनच्या तंत्राचें नाटक म्हणजे ज्यांत अेकेक अंक अेकेकाच प्रवेशाचा असतो तें असें मानून चालतात. अेकांकी, अेकप्रवेशी रचनेचें स्तोम मराठींत विशेषतः वरेरकरांनी फार माजवलेलें आहे. पण या प्रचाराचा कांहींच परिणाम अितर नाटककारांवर झालेला या वर्षीच्या नाट्यवाङ्मयावरून तरी दिसत नाही. घरकुल हें अिब्सेनचेंच नाटक असल्याने तें सोडून दिलें तर 'अुडतीं पाखरें' आणि 'आशीर्वाद' हीं दोनच नाटकें काय तीं अेकांकी अेक-प्रवेशी रचनेचीं आहेत ! 'विभूतिपूजा' आणि 'आमच्या आम्ही' या नाटकांत नवें तंत्र पुष्कळसें वापरलें आहे, पण त्यांत बहुप्रवेशी अंक, स्वगत भाषणें हीं आहेत. बाकी सर्व नाटकें मराठी नाट्यपरंपरेच्या सनातन तंत्राला अद्यापि चिकटून आहेत. बहुप्रवेशी अंक, स्वगत भाषणें, संगीत, लांबलचक व्याख्यानबाजी वगैरे जुने प्रकार अद्यापहि नव्या नाटककारांना सोडवत नाहीत.

कांही कांही नाटकांत तर अेक गंभीर प्रवेश, त्यानंतर अेक विनोदी प्रवेश ही अुर्दू चाल अद्यापहि चालू असल्याचें दिसतें. हा प्रकार पाहून 'माझा नाटकी संसार'मधील वरेरकरांच्या शब्दांत म्हणावें लागतें की, 'महाराष्ट्राचा परंपरेचा हा अभिमान मात्र अवास्तव आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाही.' अेकांकी अेकप्रवेशीच नाटक असलें पाहिजे असा माझा हट्ट नाही, मात्र तें अितर दृष्टींनी शक्य तितकें वास्तव वाटण्याअितकी त्याची रचना आधुनिक असली पाहिजे यांत शंका नाही. 'अुडतीं पांखरें' 'विभूतिपूजा', 'आमच्या आम्ही', आणि 'आशीर्वाद' हीं चार नाटकें सोडलीं, तर बाकीचीं नाटकें सर्वच दृष्टींनी आधुनिकतेपासून दूर असल्याचेंच अनुभवास येतें.

नाट्यरचनेचा हा प्रश्न बाजूस ठेवून 'नाट्यविषयाकडे पाहूं लागलों तरीहि तेथें हेंच परंपराप्रेम दिसून येतें. 'सौभद्रा'पासून 'लग्नाच्या बेडी'पर्यंत चालत आलेला प्रेम आणि लग्न हाच विषय बहुतेक नाटककारांनी हाताळलेला आहे. त्यांतहि लग्नोत्तर प्रेमापेक्षा लग्नपूर्व प्रेम हाच विषय सर्वांच्या आवडीचा दिसतो. यंदाच्या नाट्यवाङ्मयांत लग्नोत्तर प्रेमाचा खेळ काय तो 'घरकुल' आणि 'अुडतीं पांखरें' या दोन नाटकांतच फक्त दिसून येतो. बाकीच्या बहुतेक नाटकांचा शेवट प्रियामीलनांत होतो. मोठ्या नाटकांचाच काय पण छोटया नाट्य-प्रयोगांचाहि विषय आपुकमापुकमीलन' हाच आहे. 'सात पाहुण्यां'पैकी सहा पाहुण्या लग्न-घाअींत दिसतात! 'नाटिका नवरत्नहारा'पैकी बहुसंख्य नाटिका हाच अध्याय लावतात.

लग्न हाच अेक विषय हजार प्रकारांनी मांडतां येण्यासारखा आहे हें मला मान्य आहे. प्रचलित समाजांतील वैवाहिक प्रश्न चर्चेला घेअून नाटककारांना या जुन्या विषयांत देखील नावीन्य आणतां येअील. परंतु तसें कांही करण्याचा फारसा प्रयत्न न करतां बहुतेक नाटककार तरुण-तरुणी-प्रेम, त्याला वडीलधाऱ्या मंडळींचा किंवा परिस्थितीचा प्रथम थोडा विरोध, नंतर कोणत्या तरी कारणाने तो विरोध नाहीसा होअून झालेलें नायक-नायिकेचें मीलन, या ठराविक चाकोरींतूनच जातांना दिसतात. 'साखरपुडा' हें नाटक नांवावरूनच विषय सुचविणारें आहे. वधूपित्याच्या पैशाच्या लोभाने आपल्या मुलाच्या अिच्छेविरुद्ध त्याचें सावकाराच्या मुलीशीं लग्न लावूं अिच्छिणाऱ्या अेका रावसाहेबांना, त्या सावकाराचें दिवाळें निघाल्याचें भासवून, तो विचार रद्द करावयाला लावून मुलाच्या प्रेयसीशींच त्याचें लग्न करण्यास संमति द्यायला भाग पाडणारें गोड कपट कसें यशस्वी झालें यावर या नाटकाची अुभारणी आहे. 'सात पाहुण्यां'-मध्ये प्रेमवेडा, लांबलेलें लग्न, नीला निमकर, गैरसमज, प्रेमाचे पूरक, श्रीमंत पतीची राणी या सर्व छोट्या नाटुकल्या प्रेमांत सांपडलेल्या तरुण-तरुणींच्या कथा असून बहुतेकांचा शेवट गोड झाला आहे! 'नाटिकानवरत्नहारा'मध्येहि लग्नाच्या बाबतींत तरुण पिढीला 'पूर्ण स्वातंत्र्य' असावें, 'कुमारी १९३१' सारख्या अद्ययावत् तरुणींनाहि विवाहाचें पावित्र्य मान्य केल्या शिवाय गत्यंतरच नसतें, 'प्रीतिविवाह' रूढ व्हावेत, जातिभेद 'प्रेमदेवते'च्या मीलनाआड येअूं नयेत, या मतांचा पुरस्कार त्या त्या नाटिकेंत केलेला आहे. लग्न हें वधूवरांच्या प्रेमावर आधारलेलें असावें नि त्या प्रेममीलनांत अितर विघ्नें आड येअूं नयेत, हा सूर मात्र बहुतेक सर्व नाटकांतून ठळकपणें मांडलेला आहे.

प्रेमाचेच खेळ सर्व नाटककार दाखवीत असले, तरी त्यांतहि कल्पनानावीन्य कसें आणतां येतें हें नंदू खोटे यांच्या 'विभूतिपूजा' नाटकावरून दिसून येअील. १९४१ सालच्या नाटकांत 'अुडतीं पांखरें' नि 'घरकुल' या दोन नाटकांनंतर सरस नाटक म्हणून मी 'विभुति पूजा' नाट-काचें नांव घेअीन. अगदी साधासाच विषय फार चतुरपणें मांडून या नाटकांत चटकदार

केला आहे. कॉलेजकर तरुण-तरुणींमधील प्रेमाची चुरस या संगीत नाटिकेंत अत्यंत खेळकर-पणानें नि खट्याळपणानेंहि मांडली आहे, पण तिचा शेवट मात्र अशा कल्पकतेनें केला आहे, की त्यामुळें नाटिका अतिशय लज्जतदार झाली आहे.

मुलींचीं लग्नें आणि त्यांबद्दल आईबापांची दृष्टि हा किती पेचांत पाडणारा विषय आहे, याचें स्त्रियांच्या दृष्टिकोनांतून केलेलें प्रतिपादन ताम्हनकरांच्या 'आमच्या आम्ही' नाटिकेंत आहे. आया आपल्या मुलींच्या कल्याणाच्या हेतूनेच त्यांच्या लग्नाची घाई करीत असतात खरें, 'पण प्रेमानेंसुद्धा कांहीं प्रसंगीं सुखापेक्षा छळच अधिक होतो' हें त्यांच्या लक्षांत येत नाही. वडीलधाऱ्या स्त्रियांना ही दृष्टि यावी यासाठी 'आमच्या आम्ही' नाटिकेचा अवतार झाला आहे. चार वेगवेगळ्या वृत्तींच्या आया व त्यांच्या निरनिराळ्या स्वभावांच्या अुपवर मुली यांच्या लग्नविषयक दृष्टिकोनांच्या झगड्यावर या नाटिकेची अुभारणी केलेली असून मुलींना आत्मविकासाला भरपूर वाव देअून त्यांचा अुद्धार त्यांना करून घेण्यास संधि व सवड द्यावी हें आयाचें कर्तव्य आहे, असा निष्कर्ष या नाटिकेंत ताम्हनकरांनी काढला आहे तो कोणासहि मान्य होण्यासारखाच आहे.

मुलींना आत्मविकास करण्यास वडील मंडळींनी असा भरपूर वाव दिला, त्यांचा विकासहि परिपूर्ण झाला, नि त्या लग्न करून परक्या घरीं जाअूं लागल्या तर अशा मुलींकडून बापानें— विशेषतः पुत्रसंतति नसल्यानें पुत्राविषयींच्या साऱ्या आशा-अपेक्षा ज्यानें आपल्या मुलीवरच केंद्रित केल्या आहेत अशा बापानें— तिच्या स्वगृहींच्या कर्तव्याबाबत कांहीं अपेक्षा करावी कीं नाही? आणि तशी ती केली तर तो बाप 'सावकार' किंवा 'पठाण' गणावा काय या प्रश्नांची चर्चा रांगणेकरांच्या आशीर्वाद नाटकांत अभिप्रेत आहे. रांगणेकरांनी नाटकाचा विषय खरोखरीच चांगला निवडला आहे. तो सार्वत्रिक स्वरूपाचा सामाजिक प्रश्न आहे असें जरी म्हणतां येत नाही, तरी सध्याच्या आर्थिक तंगीच्या दिवसांत मुलीकडून अर्थार्जनाची अपेक्षा असणारे आअीबाप बरेच असूं शकतील. परंतु विषयसूत्र चांगलें निवडूनसुद्धा त्याची मांडणी रांगणेकरांना फारशी परिणामकारक करतां आली नाही असें म्हणावें लागतें. शिवाय पहिल्या अंकांत अुपस्थित केलेल्या प्रश्नाचें दुसरें कांहींच अुत्तर न सुचल्यामुळे नाटकाच्या शेवटीं पहिल्या अंकांत आपण जिथे होतो तिथेच फिरून आलों असा भास होतो. या कारणानें विषय छान असूनहि नाटक अपुरें व असमाधानकारक वाटतें.

विवाहोत्तर संसारकथांवर आधारलेल्या 'घरकुल' व 'अुडतीं पांखरें' या दोनहि नाटकांत विवाहसंस्थेचा बोजवाराच अुडालेला दाखविलेला आहे हें साम्य चिंतनीय आहे. आठ वर्षें अेकत्र संसार करूनहि नवरा-बायकोच्या 'अंतःकरणामध्यें अेक खोल, रुंदच्या रुंद काळीभोर दरी पसरली' असल्याचें शेवटीं लता व रमाकांत यांना कळून येतें. "आपला संसार म्हणजे भातुकलीचा खेळ होता" ही जहरी जाणीव आठ वर्षांनंतर लतेला होते व माणूस म्हणून आत्म-विकास करून घेण्यासाठी तिला संसाराचा खेळ अुधळून घराबाहेर पडावें लागतें. बाह्यात्कारी सुखी दिसणारे संसार आंतून भोंग्यानें पोखरून भुसा केलेल्या लाकडासारखे कसे पोकळ असतात याचा अेक नमुना 'घरकुल'मध्ये पाहावयास मिळतो, तर दुसरा प्रकार 'अुडतीं पाखरें' दाखवितात. सध्या सुशिक्षितांत अेक बायको जिवंत असतां दुसरी सुशिक्षित व आधुनिक थाटामाटाची करण्याची प्रथा पडली आहे तीवर हें नाटक आधारलेलें आहे. कृष्णराव आणि शामराव हे दोघेहि भाऊ अशा प्रकारें दुसरें लग्न करतात खरें, पण त्यांच्या पहिल्या लग्नाचे संसार वेगवेगळ्या प्रकारचे दाखविले आहेत. कृष्णरावाची बायको सारं कांहीं निमूट सहन

करते व आहे त्यांत समाधान शोधण्याचा प्रयत्न करते. ती अशिक्षित व जुन्या संस्कृतींत वाढलेली असल्यामुळे असें होतें असें मानलें तरी शामरावाची बायको बी. अे. झालेली असूनहि थोडीशी वाचाळता करण्यापलीकडे नवऱ्याच्या दुसऱ्या लग्नाचा कांहींच प्रतिकार करीत नाही. वरेरकरांच्या सगळ्या नाटकांत बायका खूप बडबड करतात, पण शेवटीं बायका त्या बायकाच असें दाखविलेलें असतें, तोच प्रकार याहि नाटकाचा आहे. लग्न करणें ह्याखेरीज स्त्रीच्या जातीला गत्यंतर नाही, नि लग्न केल्याने सारीं छुपीं पापें लपून वर प्रतिष्ठितपणें 'घराण्याची अब्रू'हि कायम राहाते या प्रचलित समाजकल्पनेवर या नाटकांत प्रच्छन्न टीका आहे. पण त्याहिपेक्षा या नाटकाचा खरा अुद्देश समाजांत रूढ होअूं पाहणाऱ्या दुसऱ्या लग्न-बंधनाचें वास्तवरूप दाखविणें अितकाच आहे. जुन्या लग्नाच्या घड्या विस्कटत आहेत आणि नव्या बसत आहेत त्या कोणत्या प्रकारच्या आहेत याचें दिग्दर्शन करणें अितकाच या नाटकाचा अुद्देश दिसतो.

'अुडतीं पांखरें' हेंच नाटक रचनेच्या दृष्टीने या वर्षीचें सर्वांत चांगलें नाटक म्हणावें लागेल. त्या नाटकाचा विषय कांहींसा थिल्लर आहे व कांही ठिकाणीं घेतलेले वैयक्तिक चिमटे नाटकाला अुणेपणा आणतात हें खरें, पण साध्याच विषयाची सुबोध, स्वाभाविक आणि सहज मांडणी, अगदी साधे, सुटसुटीत नि सुंदर संवाद आणि विविध व्यक्तिरेखांचीं काढलेलीं संयमपूर्ण चित्रें या दृष्टींनी 'अुडतीं पाखरें' नाटक सरस वाटतें. 'विभूतिपूजा' हें नंदू खोटे यांचें नाटकहि संवाद नि व्यक्तिरेखा या दृष्टीने वाखाणण्यासारखें आहे, पण त्याचेंहि कथासूत्र थिल्लरच आहे. 'घरकुल' नाट्यविषयाच्या दृष्टीने अुत्तम नाटक आहे, पण त्याचें भाषांतर बोजड आणि गैरमराठी झालेलें असल्याने मूळ नाटकाचें सौंदर्य नि परिणामकारकता मराठी अनुवादांत बरीचशी कमी झाली आहे असें म्हणणें भाग पडतें. 'आमच्या आम्ही' ही नाटिका स्त्रीस्वभावदर्शन आणि संवाद या दृष्टींनी अतिशय रंगदार झाली आहे. 'साखरपुडा' नाटकाचे संवादहि बरेच कल्पक व चटकदार असून त्यांत योजिलेलें कपट नाटक लक्ष्मीच्या दिवाणजीच्या घरीं झालेल्या आकस्मिक आगमनाने जर मध्येच गळूं दिलें नसतें तर नाटकाची परिणामकता वाढली असती.

'राक्षसी' नाटकांपैकी 'सवाअी सूड' हें नाटक भाषेच्या आवेशपूर्णतेमुळे नि नाट्यविषयाच्या बोधपरतेमुळे आकर्षक झालें आहे; मात्र त्यांतील कुमाराचा सूड घेण्याची शीलवतीची पद्धत श्री. खांडेकरांच्या अमृत बोलपटांतील विलासाचा सूड घेण्याच्या सीतेच्या तऱ्हेची सख्खी बहीण शोभण्यासारखी आहे ! 'खुनी सम्राट्' हें श्री. कृ. ओक यांचें नाटक सर्वच अर्थांनी 'राक्षसी' नाटक आहे ! मंगलाचरण झाल्यावर नाटकास सुरवात होते तीच मुळीं अुदात्त महाराजांच्या खुनाने ! नाटकाच्या पहिल्या अेकाच आठपानी प्रवेशांत अेकूण चार खून आहेत ! ! सबंध नाटकांत खूनच खून, सतीचा देखावा, वेषांतर, पिस्तुल, चाबकाचा मार वगैरे अनेक अमानुष प्रकार पदोपदीं दडपले आहेत. आणि या साऱ्या अमानुष प्रकारांना शोभेल अशीच भाषा सर्वत्र वापरली आहे. "तुझ्या पातिव्रत्याचे तारे तोडण्याचे ते दिवस गेले आतां", "आपल्या पातिव्रत्याचं जालीम विष बाजूला करून निर्मळ मनानं माझ्या मानेभोंवतीं नाजूक हात टाक", "लढाअीच्या आगीवर माझ्या ध्येयाची कंबर शेकून घेणार" असल्या अर्थशून्य शब्दजंबाल वाक्यांनी सारें नाटक खच्चून भरलेलें आहे !

दोन्ही अैतिहासिक नाटकांपैकी अंकुश राममाधव यांचें 'वाघाचा वाघ' हें होतकरू परळकरबंधूंचें नाटक पुष्कळच समाधानकारक आहे. नेताजी पालकरच्या कथानकावर त्याची

रचना केलेली असून आटोपशीर रचना नि संवादांचा सुबोधपणा हे त्याचे अुल्लेखनीय विशेष आहेत. अैतिहासिक नाटकांत (बहुधा टाळ्या मिळविण्यासाठी) अधूनमधून थोडी व्याख्यानबाजी जरूर आहे असा लेखकाचा समज असावा. 'धर्मवीर संभाजी' हें दुसरें अैतिहासिक नाटक महाराष्ट्र नाटक मंडळींतील अेक नट व सुंदर संगीत नाटक मंडळीचे सध्याचे चालक श्री. ग. कृ. बोडस यांनी रचलें आहे. 'राजसंन्यास' नि 'बेबंदशाही' या संभाजीचरित्रावरील दोन लोकप्रिय नाटकांची धर्मवीर संभाजी ही बेचव मिसळ आहे. वेश्या नि वारुणी यांच्या व्यसनांतून संभाजीला नाटककाराने मुक्त केला आहे, पण शिरकाणाच्या अमानुष पापाचा कलंक मात्र संभाजीवर शाबित धरला आहे. संभाजी निर्व्यसनी दाखविल्यामुळे तो कब्जीच्या मुठींत कां जातो हें गूढ नीटसें अुकलत नाही. संभाजीवरील नाटकाला जी भव्यता नि रुद्रता अवश्य आहे तिच्या अभावामुळे हें नाटक अगदी सामान्य वाटतें.

'सात पाहुण्या' पुस्तकांतील सातहि नाट्यप्रसंग मनोरंजक आहेत. वास्तवता हा त्यांचा प्रमुख विशेष असून रोजच्या आयुष्यांतील वेंचलेले प्रसंग कुशलतेने मांडून सौ. पटवर्धन यांनी साधेच प्रसंग चित्ताकर्षक केले आहेत. पुस्तकाच्या प्रस्तावनेंत केलेली अशा प्रकारच्या नाट्यप्रसंगांच्या रचनेच्या तंत्राची चर्चा मार्गदर्शक आहे.'सात पाहुण्या'प्रमाणेच 'चार चांदण्यां'तील नाट्यप्रसंगांचा मुख्य अुद्देशहि करमणूक हाच आहे. 'डोळ्यांत धूळ' ही अिंग्रजी प्रहसनावरून कल्पना घेअून लिहिलेली नाटुकली सरस आहे.

'प्रेमसंन्यास' नाटकाविषयी कांहीच लिहिण्याची गरज नाही. त्याला संगीताची जोड अितक्या वर्षांनंतर द्यावी लागली, ही गोष्ट मात्र रंगभूमीवरून संगीताची हकालपट्टी करूं पाहणाऱ्यांनी लक्षांत घेण्यासारखी आहे. यंदाच्या नाटकांपैकी 'घरकुल', 'अुडतीं पाखरें' व 'आमच्या आम्ही' अेवढीं तीनच नाटकें गद्य आहेत. बाकी सर्व नाटकांत पदें आहेत. 'बाबाचा बाब' आणि 'खुनी सम्राट्' या नाटकांत अनुक्रमें सतरा व चौदा पदें आहेत ! मोठ्या नाटकांत काय पण 'चार चांदण्यांतील' नाट्यप्रसंगांत देखील मुळांत नसलेली पदांची जोड 'प्रयोगाच्या सोयी'साठी द्यावी लागली आहे. 'मराठी नाट्यसृष्टि' या आपल्या परिश्रमपूर्वक लिहिलेल्या माहितीपूर्ण पुस्तकांत प्रो. दांडेकरांनी दाखवून दिल्याप्रमाणे मराठी रंगभूमि १६९० पासून संगीतप्रधान आहे, त्यामुळेच संगीताची अुचलबांगडी करण्याचे प्रयोग यशस्वी होअूं शकत नाहींत. फार तर प्रेक्षकांची संगीताची गरज 'भावगीता'च्या नांवाने पुरविण्यांत येअील अितकाच काय तो फरक 'आशीर्वाद'सारख्या नव्या धर्तीवरच्या नाटकांना करतां येअील व येतो.

नाटकांतील विनोदाच्या दृष्टीने पाहिलें तरी देखील तिथे कायम छापाच्या विनोदाचीच परंपरा कायम असल्याचें दिसतें. विनोदाचा बहुतेक सारा भर शाब्दिक कोट्यांवरच असल्यामुळे प्रसंगनिष्ठ विनोद फारसा कुठे आढळत नाही. शाब्दिक कोट्या मात्र हव्यास म्हणून करतांना कित्येक ठिकाणीं तरी नाटककार हास्यास्पद होतात. अेक स्त्री व तिच्या प्राप्तीसाठी धडपडणारें अेक मेषपात्र आणि अेक मर्द असे दोन पुरुष या 'पुण्यप्रभावी' त्रिकोणाच्या धर्तीचाच विनोद 'खुनी सम्राट्', 'सम्राअी सूड', 'बाबाचा बाब', 'धर्मवीर संभाजी प्रभृति' नाटकांतून आढळतो. अशा विनोदांत कल्पकतेपेक्षा आचरटपणा आणि अर्वाच्यपणा यांचेच नमुने फार असतात. त्याचीं अुदाहरणें देअून देणार किती ? 'आमच्या आम्ही' आणि 'विभूतिपूजा' या नाटकांतील खेळकर व खोडकर विनोदी वातावरण मात्र मनोज्ञ आहे.

प्रत्यक्ष नाटकांव्यतिरिक्त अितर नाट्यवाङ्मयविषयक यंदाच्या पुस्तकांतील 'मराठी नाट्यसृष्टि–पौराणिक नाटकें' हें प्रो. वि. पां. दांडेकर यांचें पुस्तक चार वर्षांच्या परिश्रमांचें

फळ आहे. मराठी नाट्यसृष्टीचा अितिहास हें कोणत्याहि मराठी ग्रंथसंग्रहालयाचें कायमचें भूषण होअील यांत शंका नाही. कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांतून क्रमशः विकास पावत गेलेल्या मराठी रंगभूमीचा हा साधार व माहितीपूर्ण अितिहासच आहे. या पुस्तकांत मराठींतील सुमारें दोनशे पौराणिक नाटकांचा थोडक्यांत सटीप परिचय करून दिलेला असल्याने संदर्भग्रंथ म्हणून देखील हें पुस्तक फार अुपयोगी पडण्यासारखें आहे. मराठींतील नाट्यवाङ्मयाचा, माझ्या माहितीप्रमाणे तरी, हा पहिलाच अितिहास आहे. या पुस्तकाचा त्रुटितपणा हाच त्याचा दोष म्हणून सांगतां येअील. कोणत्याहि वाचकाला नवीन व मनोरंजक माहिती देण्याचें कार्य प्रो. दांडेकरांचा हा ग्रंथराज चांगल्या प्रकारें करील अेवढें मात्र निश्चित.

'माझा नाटकी संसार' हें मामा वरेरकरांचें आत्मचरित्र आहे. पण तें फक्त त्यांच्या 'नाटकी संसारा'पुरतेंच मर्यादित स्वरूपाचें आत्मचरित्र आहे. मामांच्या त्रिखंडात्मक नाटकी आत्मचरित्रांपैकी या पहिल्या खंडांत मामांचें पहिलें नाटक कुंजविहारी प्रथमच रंगभूमीवर आलें तेथपर्यंतचा कथाभाग आलेला असून या पुस्तकाचा खरा भर मामांचा नाट्यविषयक मनोविकास कोणकोणत्या कारणांनी कसकसा होत गेला तो अितिहास सांगण्यावरच आहे. अेका दृष्टीने असेंहि म्हणतां येअील की, १८८५ ते १९०८ सालापर्यंतच्या मराठी रंगभूमीचा अेका व्यक्तीच्या दृष्टिक्षेत्रांतून लिहिलेला हा मनोरंजक अितिहास आहे. फरक अितकाच की, हा अितिहास 'असं असं घडलं' अशा स्वरूपाचा नसून 'मला असं असं वाटलं' अशा प्रकारचा आहे. तें कसेंहि असलें तरी या पुस्तकांत तत्कालीन नट-नाट्य-नाटकें यांविषयींची पुष्कळच मनोरंजक व वैचित्र्यपूर्ण माहिती आजच्या वाचकाला मिळते, हा या पुस्तकाचा सर्वांत मोठा फायदा आहे. गतवर्षी श्री. गणपतराव बोडस यांचें 'माझी भूमिका' हें आत्मचरित्रात्मक पुस्तक प्रसिद्ध झालें. त्यानंतर नाट्यात्मक आत्मचरित्र वरेरकरांचेंच यंदा प्रसिद्ध झाले. वरेरकरांची नाट्यविषयक कामगिरी केवळ बिनमोल आहे आणि त्यांनीच मराठी रंगभूमीला पुरोगामी बनविण्याचा प्रदीर्घ प्रयत्न केला आहे हें कोणासहि नाकारतां येणार नाही. अशा नाट्यमुनींचें हें प्रांजल आत्मचरित्र अत्यंत रसाळ आणि चटकदार असून अेखाद्या सुरस कादंबरीसारखें अव्वल अखेर चित्तवेधक झालेलें आहे. हें पुस्तक अेकदा वाचावयास घेतल्यावर तें शेवटपर्यंत नेल्यावांचून दुसरें कांही सुचत नाही अितकें तें चटका लावणारें झालें आहे. त्यांत वैचारिक मतभेदाचीं स्थळें आहेत हें कबूल, पण अत्यंत तळमळीने, अतिशय सुबोध भाषेंत लिहिलेलें, साध्यासुध्या प्रसंगांच्या सहृदयतेने केलेल्या वर्णनाने रंगलेलें, हृदयंगम आत्मचरित्र मराठी नाट्यवाङ्मयांत दुसरें नाही असें माझा 'नाटकी संसार' वाचून माझें मत झालें आहे. पुढील वर्षी (१९४३) मामांची अेकसष्टी येत आहे त्या सुमारास त्यांच्या आत्मचरित्राचे अुरलेले दोन्ही खंड प्रकाशित व्हावेत अशीच अिच्छा हा प्रथमखंड वाचणारा प्रत्येक वाचक करील.

१९४१ सालच्या नाट्यवाङ्मयाचें हें धावतें समालोचन असल्याने तें पुष्कळशा बाबतींत अपुरें आहे याची जाणीव मला आहे. परंतु यंदाच्या नाट्यवाङ्मयाचा अुडता परिचय अेका छोट्या लेखांत करून द्यायचा असल्यानें याहून अधिक चर्चा किंवा चिकित्सा करण्यास अवसरच नव्हता. प्रत्यक्ष नाट्यवाङ्मयांत जमा होत नसला तरी त्या वाङ्मयाचाच अेक पूरक भाग म्हणतां येअील अशा कांही बातींचा जातां जातां अुल्लेख करून हा लेख संपवितों.

१९४१ मध्ये रेडिओ स्टेशनवर 'नटाची रोजनिशी' या नांवाखाली श्री. केशवराव दाते, श्री. विष्णुपंत औंधकर, श्री. चिंतामणराव कोल्हटकर, श्री. नानासाहेब चापेकर या

नटांचीं माहितीपूर्ण व्याख्यानें झालीं व तीं नंतर कांही नियतकालिकांतून प्रसिद्धहि झालीं. शिवाय श्री. चिंतामणराव कोल्हटकरांचे 'विविधवृत्तां'त मराठी रंगभूमीविषयीचे कांही माहिती-पूर्ण लेख याच वर्षी प्रसिद्ध झाले आहेत.

बत्तिसावें महाराष्ट्र नाट्यसम्मेलन या वर्षी मुंबअीस भरलें त्याच्या स्वागताध्यक्ष व अध्यक्षपदांवरून केलेलीं श्री. वर्तक आणि आचार्य अत्रे यांचीं भाषणें विचारप्रवर्तक झालीं. विशेषतः आचार्य अत्रे यांचें भाषण नाट्यसंमेलनांच्या अध्यक्षीय भाषणांत अव्वल दर्जाचें ठरून वाङ्मयांतहि तें अुच्च स्थान पटकविण्याजोगें झालें याविषयीं सर्वांचें अेकमतच आहे.

र. गो. स.

## लघुकथासंग्रह

लघुकथा हा वाङ्मयप्रकार लोकांचा अितका आवडता झाला आहे की कोणतेंहि मासिक पुस्तक अुघडा त्यांत लघुकथांची संख्या अितर लेखांहून जास्त भरेल; किंबहुना कांही मासिकें तर केवळ लघुकथेलाच वाहिलेलीं आहेत. लघुकथांची लोकप्रियता जशी यावरून दिसते तशीच त्यामुळे लघुकथावाङ्मयांत प्रत्यहीं पडणारी भरहि स्पष्ट होते. दर महिन्याला निदान अेक दोन या प्रमाणांत प्रसिद्ध होणारे लघुकथांचे संग्रहहि याच गोष्टीचे निदर्शक आहेत.

लघुकथांची होणारी वाढ आणि त्यांची वाढती लोकप्रियता पाहिली म्हणजे साहजिकच त्यांचा अेकंदर दर्जा काय आहे असा प्रश्न समोर अुभा राहतो. केवळ घटकाभर मनोरंजन झालें की लघुकथेचें कार्य संपलें असें कांहींचें मत आहे; तर लघुकथा म्हणजे आपल्या मत-प्रचाराचें अेक कलात्मक साधन आहे असें कांहींना वाटतें; वास्तवता हेंच तिचें प्रमुखांग असें कांही मानतात तर दुःखीकष्टी जीवांना आपल्या दुःखांचा क्षणभर तरी विसर पाडणारी ती अेक स्वप्नसृष्टि आहे असें कांहीजण समजतात. खरें पाहिलें असतां तिच्यांत या सर्व गोष्टी सामावल्या पाहिजेत; परंतु याहिपेक्षा अत्यंत आवश्यक गोष्ट म्हणजे तिच्यांतून व्यक्त होणारी जीवनाकडे पाहण्याची लेखकाची विशिष्ट दृष्टि. लघुकथा ही जरी जीवनावर आधारलेली अेक वास्तव कला-कृति असली तरी तिच्यांतून कोणत्या तरी विशिष्ट तत्त्वज्ञानाची प्रतीति व्हावयास हवी. जीवना-बद्दलचा जिव्हाळा आणि मानव जातीच्या कल्याणाची तळमळ लेखकाच्या ठायीं वास करीत असेल तरच त्याच्या कथांतून या विशिष्ट दृष्टीचा 'स्पर्श' होअूं शकेल. मात्र गतिमान जीवनाचा व्यापक व सखोल अनुभव, वर्णव्यक्तींशीं समरस होण्याची पात्रता आणि वाचकाच्या मनाचा ठाव घेण्याची शक्ति लेखकाच्या अंगीं असली पाहिजे; त्याविना त्याच्या कथा नकली आणि बेगडी ठरतील. १९४१ सालीं प्रसिद्ध झालेल्या कथा या निकषावर कितपत अुतरतात अितकेंच प्रस्तुत समालोचनांत पाहावयाचें आहे.

१९४१ हें साल संख्येच्या मानाने लघुकथेला फारसें वाअीट गेलेलें दिसत नाही. सालाबादप्रमाणे याहि वर्षी श्री. खांडेकरांचा 'घरट्याबाहेर' नांवाचा अेक कथासंग्रह प्रसिद्ध झाला. श्री. बोकीलांचा 'मांडवावरील वेली', सानेगुरुजींचा 'त्रिवेणी', चोरघड्यांचा 'यौवन' हे कथासंग्रहहि प्रस्तुत सालांतील अुल्लेखनीय संग्रह आहेत. या नामवंत लघुकथा-लेखकांप्रमाणे अितरहि अनेक (माझ्या माहितीप्रमाणे निदान २०-२२) कथालेखकांचे कथा संग्रह या सालांत प्रसिद्ध झाले. याशिवाय विशेष गोष्ट म्हणजे प्रा. माटे यांनी 'अुपेक्षितांचें अंतरंग' दाखवून लघुकथेच्या दालनांत प्रवेश केला तोहि याच सालांत. जीवनाची अर्धी बाजू सांभाळण्याचें काम स्त्रियांचें असतें. लघुकथेच्या संसारांतहि आपला अर्धा वांटा अुचलण्या-

साठीं कांहीं लेखिका धावल्या आहेत. त्यांत सौ. कुसुमावती देशपांडे (दीपदान), सौ. किर्लोस्कर (प्रतिबिंब), आणि सौ. दांडेकर (प्रतिमा) यांचीं नांवें प्रामुख्यानें घ्यावीं लागतील. अकेका लेखकाचे अनेक कथांचे संग्रह जसे प्रसिद्ध झाले आहेत तद्वत् अनेक लेखकांचे मिळून अेक अेक असेहि दोन कथासंग्रह या सालांत प्रसिद्ध झाले आहेत ('दुसरे हिरे' आणि 'समुद्रमंथन'). नवोदितांच्या कथासंग्रहांत मधून मधून कांहीं अनुवादित किंवा पाश्चात्य वाङ्मयावरून सुचलेल्या कथा आहेत, त्याचप्रमाणे साऱ्याच लघुकथांचा 'बोलाविता धनी' वेगळा आहे अशा प्रकारचाहि अेक संग्रह श्री. वि. श्री. मोडक यांनी प्रसिद्ध केला आहे; आणि प्रा. फडक्यांनी तर पाश्चात्य वाङ्मयांतून 'वेचलेले मोती' कथारूपानें रसग्रहणपूर्वक वाचकांना सादर केले आहेत. लघुकथेच्या दालनांत वरील सर्व संग्रह जरी दाटीवाटीनें आढळले तरी त्यांचें मूल्यमापन त्यांच्या संख्यावारीनें होणार नाही. त्यांतून आढळणारा विशिष्ट दृष्टिकोन आणि त्याच्या जोडीला जरूर ते वाङ्मयगुण यांनीच त्यांची श्रीमंती प्रतीत होणार आहे.

महाराष्ट्रांतील लघुकथालेखक बहुशः पांढरपेशा मध्यमवर्गातील आहेत. मध्यमवर्ग म्हटला की त्याच्या अनुभवाची कक्षाहि ठराविक पडते. गृहसंस्था, कुटुंबसंस्था, शिक्षण, जीवितकार्य अित्यादींची चाकोरीहि परंपरेनें आंखली जाते. या सर्वांचा परिणाम असा होतो की या मध्यमवर्गांतून आलेल्या लेखकांच्या लेखनांत त्याच अेका मध्यमवर्गाचें चित्रण केलें जातें. प्रेमभावना ही अेक मानवी मनाची प्रमुख भावना असेल; परंतु या प्रेमभावनेचा आविष्कारहि ठराविक मध्यमवर्गीय पद्धतीनें केला जातो. कॉलेजमधील निष्काळजी रम्य वातावरण, विद्यार्थि-विद्यार्थिनींचीं सफल किंवा विफल प्रेमचेष्टितें, हुषार किंवा क्रीडानिपुण विद्यार्थी आणि त्यावर प्रेम करणारी विद्यार्थिनी अित्यादींचा वावर चालू जमान्यांतील लघुकथांतून विशेषत्वानें होतो. या कॉलेजच्या वातावरणांतून बाहेर पडलेंच तर नंतरची बेकारी, अेकदम शिरावर पडणारी कुटुंबपोषणाची जबाबदारी, त्यानंतर होणारा राजाराणीचा संसार आणि त्या संसारांतून निर्माण होणारी ठराविक महत्त्वाकांक्षा किंवा सुखदुःखें अित्यादींचें मध्यमवर्गीय दृष्टीकोनांतून केलेलें चित्रण. लेखकाच्या मनावर जर आगरकरी सामाजिक सुधारणेचा कांहीं परिणाम झाला असेल तर परंपरा, अंधःश्रद्धा अित्यादींचीं बंधनें तोडून टाकणारीं कांहीं —पण तींहि मध्यमवर्गीय दृष्टीनें पाहिलेलीं व रंगविलेलीं—चित्रें. अर्थात् लेखक जर कसबी कलावंत असेल, मापेवर त्याचें प्रभुत्व असेल, आणि वर्ण्य व्यक्तीशीं तादात्म्य पावण्याची त्याच्यांत कुवत असेल तर वर अुल्लेखिलेलीं मध्यमवर्गीय चित्रें देखील वाचकांचीं मनें मुग्ध केल्याविना राहणार नाहीत. कांहीं ख्यातनाम लेखकांच्या कांहीं कथा त्याच त्याच तोंडावळ्याच्या असून देखील वाचनीय वाटतात याचें कारण तरी हेंच आहे. परंतु या सर्वांचा परिणाम तरुण नवोदित लेखकांवर मात्र अनुकूल होत नाही. या ख्यातनाम लेखकांच्या पाअुलावर पाअूल टाकण्याच्या अिराद्यानें पुढे सरसावलेल्या नवोदित लेखकांच्या कथांतून वरवरचा शृंगारसाज जरी अुठून दिसला तरी त्यामागे जरूर तो जिवंत रसरशितपणा आढळत नाही. १९४१ सालीं प्रसिद्ध झालेल्या लघुकथांपैकी शेकडा ६०।७० तरी लघुकथा या प्रकारच्या आहेत. वानगीदाखल श्री. द. ग. पाटील यांचीं 'कोवळीं किरणें' व बालशंकर देशपांडे यांच्या 'श्रावणांतल्या विजा' पाहा. संवाद आणि बारिकसारिक हालचालींचें सूक्ष्म वर्णन यांत पाटील, प्रो. फडक्यांची सहीनसही नक्कल करूं पहातात, तर श्री. देशपांडे आपला सारा संग्रह खांडेकरी अुपमाअुत्प्रेक्षांनी व कृत्रिम भाषाविलासानें नटवून सोडतात. विवाहपूर्व किंवा विवाहोत्तर प्रेमावर आधारलेल्या प्रेमकथांचा संग्रह म्हणून 'समुद्रमंथन' व 'हवेल्या' या संग्रहांकडे बोट

दाखवितां येअील. या व अितर अनेक संग्रहांतील कथांतून कथनशैली परिणामकारक असली तरी त्या कथा सजीव वाटत नाहीत. अनुभूति लांबच राहो पण सहानुभूति देखील अशा कथांतून आढळत नाही. मात्र याच प्रकारच्या विवाहपूर्व 'गोड घोटाळ्या'वर विनोदी व खुमासदार लेखणीने गोष्ट लिहिली तर ती कशी चटकदार होते याचा प्रत्यय श्री. बोकिलांच्या कांही कथांतून येतो. अर्थात् केवळ घटकाभर गंमत अितकाच या कथांचा अुपयोग. त्याला वाङ्मयानंद म्हणतां येअील अशाप्रकारचा अुत्कट आनंद या कथांनी मिळूं शकत नाही.

मध्यम वर्ग हा सुखासीन असला तरी ध्येयशून्य नाही. कदाचित् त्याचीं ध्येयें चुकीचीं असतील, परंतु नवीन परिस्थितीशीं व कल्पनांशीं तोहि सतत झगडत असतो. वरून सुखी दिसणारें त्याचें जीवन आंतून पोखरून गेलेलें असतें. या पोखरलेल्या आणि गांगरलेल्या मध्यमवर्गाचें वास्तव चित्र जर मध्यमवर्गीय लेखकांनी रेखाटलें तर त्यांतून अुत्तम कला-कृति निर्माण होअूं शकेल. 'नवें जग', 'स्वप्न आणि जीवन', 'पहिला दोहरा' या खांडे-करांच्या लघुकथा आणि 'चार आघात' 'शरयूचीं लग्नें' या चोरघड्यांच्या कथा या दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण आहेत. वरून सुखी संसार करणाऱ्या पतिपत्नींमध्ये भावनांचीं अनेक आंदोलनें घडत असतात. अेकमेकांवर पूर्ण प्रेम असूनदेखील मन चळण्याचे अनेक अनिष्ट प्रसंग येतात आणि अेकमेकांनी अेकमेकांला सावरून घेतलें तरच त्यांतून सुरक्षित पार पडतां येतें. मानवी मनाच्या सूक्ष्म तंतूंची अुकल करण्याची कुवत असेल तरच या विषयावर अुत्तम लघुकथा लिहितां येतील. प्रस्तुत सालांतील लघुकथांपैकी कांही लघुकथा (अबोध बोध, समदुःखी, पिसारा) या परी-क्षेत अुतरण्यासारख्या आहेत. अर्थात् सध्याच्या समाजस्थितींत स्त्रियांची होणारी कुचंबणा हळुवार हाताने आणि करुणरम्य प्रसंगाने चित्रित करण्याची कामगिरी स्त्रियांनीच शिरावर घेणें जरूर आहे. प्रस्तुतच्या सालांत सौ. कुसुमावती देशपांडे, सौ. किर्लोस्कर, सौ. दांडेकर अित्यादि लेखिकांनी आपापले संग्रह प्रसिद्ध करून स्त्रीमनाचें यथार्थ चित्रण केलें आहे. सौ. देशपांडे यांनी आपल्या तरल, कोमल व मनोज्ञ लेखनशैलीने 'माअुली' हें चित्र अत्यंत मृदुरम्य रेखाटलें आहे. सौ. किर्लोस्करांच्या 'वंचना', 'कोंडमारा', 'मावशी' अित्यादि कथा आणि सौ. मालतीबाअी दांडेकरांच्या 'अडगळ', 'जीवन्मृता', 'ठिगळ', 'वादळ' अित्यादि कथा मनोज्ञ आहेत. शिक्षकिणीचा पेशा पत्करलेल्या प्रौढ कुमारिकांचा किंवा परित्यक्तांचा प्रश्नहि आजच्या समाजांत फार महत्त्वाचा आहे. त्यांच्या मनाची यथार्थ कल्पना पुरुषलेखकांकडून होणें शक्य नाही; स्त्रियांची लेखणीच त्याला योग्य. या दृष्टीने सौ. किर्लोस्करांच्या 'दिवाळी' व 'सोन्याचा कांटा' आणि सौ. देशपांडे यांच्या 'झिमझिम' व 'उघाड' या गोष्टी अुल्लेखनीय आहेत. विभावरी शिरूरकरांनी निर्माण केलेली अपेक्षा आज बरींच वर्षे जरी पूर्ण होत नसली तरी वरील लेखिकांनी आपापल्या कथांतून ती अंशतः पूर्ण केली आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

स्त्रीजीवनाअितकेंच बालजीवनहि सूक्ष्म आणि तरल असतें. सौ. कुसुमावतीबाअींच्या 'वादळ' या कथेंतील बाळू आणि बोकिलांच्या 'वसंताचें रामायण'मधील वसंत व 'वासरू-प्रेम' करणारा विनू हीं बालमनाचीं चित्रें रम्य आहेत.

वैयक्तिक सुखासीनता आणि सामाजिक जीवनाबद्दल अुदासीनता हीं आजच्या मध्यम-वर्गाचीं दोन प्रमुख लक्षणें आहेत. दारिद्र्य, अज्ञान, अंध परंपरा अित्यादींनी अितर दलित-वर्ग पीडला नाडला गेला आहे पण तिकडे मध्यमवर्गीयाचें लक्ष जात नाही; तो आपल्या वैय-क्तिक जीवनांत रंगून गेला आहे. त्याच्या स्वतःच्या आणि समाजाच्या हिताच्या दृष्टीने त्याने या आपल्या वैयक्तिक जीवनांतून बाहेर पडलें पाहिजे. श्री. खांडेकरांनी आपल्या 'घरट्या-

अनुक्रमणिका

बाहेर' या संग्रहांतून हेंच सूत्र गुंफिलें आहे. 'घरच्याबाहेर' आणि 'डोंगर आणि दरी' या कथा या दृष्टीने अुल्लेखनीय आहेत. खांडेकरांच्या या संग्रहांतून सामाजिक ध्येयवाद सूचित केला असल्याने या कथासंग्रहाला बराच वरचा मान मिळेल असें वाटतें.

दारिद्र्यामुळे रूढ सामाजिक नीतिनियमांच्या बंधनांना किंमत अुरत नाही. भाकरी कीं नीति हा प्रश्न अुभा राहिला की शेवटीं भाकरीचाच विजय होतो. चोरघड्यांची 'भाकरीची गोष्ट' ही या दृष्टीने वाचकांच्या मनाचा ठाव घेते. वासना वासना म्हणून आपण जिचा अुपहास करतों तीबद्दल जबाबदार कोण असा प्रश्न वाचकांच्या मनापुढे अुभा करण्याचें श्रेय 'तेवढा अेक तास' या श्री. चोरघड्यांच्या अत्यंत संयमपूर्ण कथेला द्यावें लागेल. 'गंगास्नान' ही कथाहि वाचकाचें मन कष्टी करते.

गेल्या महायुद्धानंतर युरोपमध्ये सामाजिक आणि राजकीय विचारक्रांति झाली आणि समाजसत्तावादाचे आणि नवमतवादाचे वारे हिंदुस्थानाकडे वाहूं लागले. अमेरिकन फ्रेंच व विशेषतः रशियन, वाङ्मय यांचें अनुकरण जाणून वा नेणून मराठी कथावाङ्मयांत होअूं लागलें. कामगारांच्या दलित आणि हीनदीन जीवनाचें चित्रण करणें ही अेक नवीन टूम निघाली व त्यांपैकी कांहींना खरोखरीचा त्यांच्याबद्दल कळवळा वाटून त्यांवर कथा लिहिल्या गेल्या ही गोष्ट खरी. परंतु मध्यमवर्गीय लेखकाने केवळ सहानुभूतीने त्या दलितवर्गाचें चित्रण करणें निराळें आणि त्या जीवनाच्या झळा प्रत्यक्ष लागल्यामुळे त्यांतून वाङ्मय निर्माण होणें निराळें. जोंवर त्या वर्गापैकी अेखादा त्यांच्या जीवनाचें चित्र काढणारा निर्माण झाला नाही किंवा त्यांच्या अुन्नतीकरिता प्रत्यक्ष कृतीने झगडणाऱ्या लोकांतून जोवर अेखादा लेखक पुढे सरसावत नाही तोवर वाचकांना कल्पनेवर आधारलेल्या कथांवरच संतुष्ट राहावें लागत आहे. शेतकरी-कामकऱ्यांअितकेंच अितरहि अनेक अुपक्षित वर्ग समाजांत आहेत. दुर्दैवाची गोष्ट ही की त्याकडे आमच्या लेखकांचें जावें तितकें लक्ष जात नाही. परंतु ही अुणीव प्रो. माट्यांनी 'अुपेक्षितांचें अंतरंग' प्रसिद्ध करून अंशतः भरून काढली आहे. प्रो. माटे हे समाजशास्त्रज्ञ आहेत, आणि या समाजशास्त्रज्ञाच्या सामाजिक दृष्टीला जीं या दलित आणि अुपेक्षित वर्गातील वास्तवचित्रें दिसलीं तीं त्यांनी गोष्टींच्या रूपाने सांगितलीं आहेत. वाचकांच्या मनांत तीं त्या अुपेक्षितांबद्दल दया, अनुकंपा, करुणा अुत्पन्न करण्याअितकीं परिणामकारक आहेत. भावनेपेक्षा विचाराचें प्राबल्य असल्यामुळे या गोष्टींचा तोंडवळा ललितनिबंधांसारखा जरी भासला तरी त्यामागें असलेलें अुपेक्षित अंतरंग प्रथमच दाखविल्याचें श्रेय प्रो. माट्यांना देणें जरूर आहे. 'सावित्री मुक्यानेंच मेली', 'कशाचा संसार', 'पुरंदरचा नामा' अित्यादि गोष्टींतील करुणरस वाचकांना गहिंवर आणतो. 'अस्पृष्टांच्या डायरींतील पानें'हि अुत्कट अुतरलीं आहेत.

दलितवर्गाचीं चित्रें काढतांना त्या वर्गाशी लेखक जितका जास्त समरस होअील तितकीं तीं चित्रें अुत्कट आणि कलापूर्ण अुतरतील. श्री. चिंदरकरांचा 'पूर्वा' हा कथासंग्रह या दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण आहे. वेश्यांचा वर्गहि दलितवर्गापैकी अेक महत्त्वाचा वर्ग आहे. मराठी वाङ्मयांत अेकंदर दलितवर्गाच्या जीवनाप्रमाणे याहि वर्गाच्या जीवनचित्रांची अुणीव भासते. अर्थात् अेका दृष्टीने ही गोष्ट फार चांगली आहे. अुगीच अनभिज्ञ पांढरपेशा लेखकाने आपल्या कल्पनेने त्यांच्या जीवनाचीं चित्रें रंगवावींत ही गोष्ट अुचित नव्हे.' परंतु या सालच्या कथांतून क्वचित् मधून मधून याहि वर्गावर लिहिलेल्या लघुकथा आढळतात. अुदा० चिंदरकरांच्या 'पूर्वा'मधील विफल प्रेमाने व्यथित होणारी वेश्येची मुलगी केसर. परंतु त्यामानाने सौ. किर्लोस्करांच्या 'अपुरें अभिनंदन' या कथेंतील पुरुषी बेजबाबदारीमुळे अखेर वेश्यावृत्ति पत्करावी लागणाऱ्या

स्त्रीचें चित्रें कारुण्यरम्य वाटतें. कंटकांच्या 'शहाळीं'मधील 'कलंकिता' यल्लाभादेखील वाच-कांच्या मनांत अनुकंपा अुत्पन्न करते.

मनोविश्लेषण हें अेक आधुनिक कथावाङ्मयाचें वैशिष्ट्य मानावें लागतें. अर्थात् कोणत्याहि कथेला मनोविश्लेषणाचा आश्रय हा लागतोच. परंतु घटना आणि प्रसंग यांपेक्षा मनोव्यापारांवर जास्त भर देअून मानसिक आंदोलनांचीं चित्रें रंगविणें हें या मनोविश्लेषणात्मक कथांचें वैशिष्ट्य मानावें लागेल. बोकिलांचा 'भिकारडा' या गोष्टींतील भिका पराच्या गादीवर लोळतांना देखील ज्या भावनेनें व्यथित होतो ती भावना आणि शेवटीं त्याने केलेला निश्चय आणि त्याची अम्मलबजावणी या सर्व गोष्टी त्याच्या मनाचें वास्तवचित्र दाखवितात. श्री. चोरघड्यांच्या कांहीं कथांतूनहि मनोविश्लेषणाचा आविष्कार झाला असला तरी त्यांत पसरलेल्या गूढरम्य छायेमुळे तो सूक्ष्म भासतो. सौ. कुसमावती देशपांडे यांच्या 'माअूली', 'झिमाझिम' व 'अुबाड' या कथाहि या दृष्टीने अुल्लेखनीय आहेत.

समाजाकडे सहानुभूतीने पाहण्याची जी अेक दृष्टि असते त्याचप्रमाणे अुपहासबुद्धीने पाह-ण्याची कांहीं जणांची लकब असते. या दृष्टीने पाहणाऱ्या लेखकांचें लेखन विनोद प्रचुर किंवा अुपरोध–अुपहासगर्भ होतें. चालू सालांत या प्रकारांत मोडणाऱ्या श्री. वझे यांच्या 'न बोलाय-च्या गोष्टी' प्रसिद्ध झाल्या आहेत. यांतील 'चंद्र, सूर्य कीं काजवे ?', 'अेकसष्टीचे बळी', 'गैर-समज' अित्यादि कथा अुपरोध-अुपहासपूर्ण रूपककथा म्हणून अुल्लेखनीय आहेत. संयमाने आणि तारतम्याने वापरल्यास हा वाङ्मयप्रकार परिणामकारक होअील याची साक्ष प्रस्तुत कथासंग्रहांत मिळतें. अगदी अुपरोध-अुपहासदृष्टीने नव्हे पण जीवनाकडे समाधानी संतोषी आणि खिलाडू वृत्तीने पाहण्याचीहि अेक दृष्टि आहे. या खिलाडू वृत्तीने लिहिलेल्या लघुकथांवर विनोदाची खुसखुशीत झाक येते, आणि त्या कथा हसत खेळत वाचतां येतात. श्री. बोकीलांच्या 'मांडवावरील वेलीं'त या प्रकारचा विनोद आढळतो. त्याचप्रमाणे 'हसरे हिरे' या विनोदी कथासंग्रहांत निरनिराळ्या विनोदी कथा अेकत्रित केल्या आहेत. त्यांतहि विनोदाचे अनेक नमुने आढळतात. परंतु याच्या अगदी अुलट प्रकार साने गुरुजींच्या 'त्रिवेणीं'त आढळतो. त्रिवेणींतील अेकंदर वातावरण मुळीं अुदात्त आणि करुणरम्य आहे. त्यांतील 'शबरी', 'यज्ञ' आणि 'त्यागांतील वैभव' या तीन्ही कथा मूळच्या पौराणिक आहेत. या हृदयंगम कथांशीं साने गुरुजी अितके तादात्म्य पावलेले आहेत कीं त्यांनी पुनः आपल्या वाणीने त्या सांगतांच त्यांतील कारुण्यरम्य प्रसंगाने वाचकाचें मन आर्द्र होतें.

चालू सालांत प्रसिद्ध झालेल्या कथांच्या लेखकांपैकीं कांहीं लेखक गोमंतक किंवा मराठवाडा यांतील आहेत. प्रांतप्रदेशानुसार रीतिभाती, वाक्प्रचार, वातावरण अित्यादींत फरक आढळतो. हा फरक विशेषत्वाने आढळणाऱ्या कथांना प्रादेशिक कथा म्हणून संबोधिलें जातें. परंतु २० सालच्या लघुकथासंग्रहांत श्री.कटकांचीं 'शहाळीं' जरी गोमंतकांतील असलीं किंवा कृष्णाकुमारांचीं 'अशोकाचीं पानें' जरी हैदराबाद मराठवाड्यांतील असलीं तरी त्यांना पूर्णतया प्रादेशिक म्हणतां येणार नाहीं. मात्र त्या प्रांताचे वाक्प्रचार, भाषा, अित्यादींचा आढळ त्या संग्रहांतून होतो अितकें मात्र खरें.

चालू सालच्या लघुकथांचें वैशिष्ट्य विषयवारीने हें अशा प्रकारचें आहे. सामान्यतः या सालीं लघुकथांना निवडलेले विषय हे त्यापूर्वीच्या पांच दहा वर्षांत निवडलेल्या विषयांहून भिन्न असल्याचें दिसत नाहीं. नाहीं म्हणावयास नवीन नवीन होतकरू तरुण लेखक लघुकथेच्या

प्रांतांत पदार्पण करीत आहेत. आरंभीं म्हटल्याप्रमाणे लघुकथा लोकांची अितकी आवडती आहेत की कोणतेंहि मासिक पुस्तक अुघडलें तर त्यांत लघुकथांचीच संख्या जास्त भरते. लघु-कथांची ही अितकी लोकप्रियता आणि नवोदित लेखकांची अितकी गर्दी असून देखील त्यांतून अेखादा दर्दी लेखक कां निर्माण होअूं नये असा प्रश्न साहजिकच मनापुढे येतो. कथानुकूल सुललित भाषाशैली आणि तंत्र या बाबतींतहि प्रशंसनीय प्रगति आढळते. पण जर कोण्या अेका गोष्टीची वाण असेल तर ती कथाप्रसंगांची— विषयांची. लेखकांच्या जीवनाची कक्षा वाढत नाही; त्याला नवीन नवीन अनुभव येत नाहीत; ज्यांचें मन खूप संस्कारक्षम आहे त्यांपैकी कांहींत तादात्म्य पावण्याची शक्तिहि आहे; पण नवनवोन्मेष अुसळवण्यास लागणारी विविधता त्यांच्या जीवनांत नाही; आणि याच्याहि पलीकडे जीवनाबद्दलचा जिव्हाळा, त्या जिव्हाळ्यामागे असणारी विशिष्ट शक्ति आणि विशेष म्हणजे त्या शक्तीवर असणारी भक्ति यांचा वास त्यांच्या ठिकाणीं नाही. ज्या ख्यातनाम लघुकथालेखकांत ही शक्ति आहे त्यांचें लेखन अितरांमधून अुठून दिसतें. त्यांचें व्यक्तिशः लेखन अितरांहून निराळें भासतें परंतु त्यांच्या अेकस्याच्याच लेखनाकडे पाहिलें तर विविधतेचा— नावीन्याचा— नवीन अनुभवांचा— अभावच आढळतो. श्री. खांडेकरांचा ४१ सालचा कथासंग्रह आणि ४० किंवा ३९ सालचे त्यांचे कथासंग्रह यांत वैशिष्ट्याने दिसण्याअितका फरक आहे असें वाटत नाही. जी गोष्ट खांडेकरांची तीच गोष्ट अितर लेखकांची. भाषा आणि तंत्र यांत निःसंशय प्रगति होत आहे. श्री. खांडेकरहि या बाबतींत नवीन नवीन प्रयोग करून पाहात आहेत. नवीन लेखकांकडून पाश्चात्य कथांचे स्तुत्य अनुवाद केले जात आहेत. यामुळे भाषेची आणि वाङ्मयाची समृद्धिहि होत आहे. पण प्रश्न अितकाच की ज्याला वाङ्मयानंद म्हणतां येअील, कलानंद म्हणतां येअील, तो देअूं शकणाऱ्या आणि जीवनासंबंधीची कोणती तरी विशिष्ट निष्ठा अुरीं धरणाऱ्या अशा लघुकथा किती आहेत ? अर्थात् ही गोष्ट निरपवाद नाही. 'दीपदान', 'प्रतिबिंब', 'यौवन', 'घरट्याबाहेर' यांसारख्या कथासंग्रहांतील कथांतून याचा धर सांपडत नाही असें नाही. परंतु अेकंदरींत अर्वाचीन लघुकथा ही नवीन अनुभवांच्या अभावीं तेजोहीन होअूं पाहते आहे. लेखकांनी जर थोडी दृष्टि अुंचावली, आपल्या आवडत्या स्वप्नरंजनांतून जाग आणली तर त्यांना आवतीभोवती अनंत नवे नवे विषय आढळतील. चालू महायुद्ध सुरू होअूनहि तीन वर्षें होअून गेलीं. या युद्धाने आपल्या जीवनावर अगदींच परिणाम केला नाही असें खात्री-लायक म्हणतां येअील का ? नवीन युगाचें प्रतीक म्हणून आपल्या कथांतून बॉंब आणि टॅंकच आणलीं पाहिजेत असें नाही; बॉंब आणि टॅंक जरी दूर असलीं तरी अेकंदर जीवनकलह कठिण झाला आहे; समाज हवालदील झाला आहे. पण या वास्तवजीवनाचें यथार्थ चित्रण आजच्या वाङ्मयांत अभावानेच आढळतें. परंतु केवळ या साऱ्या वास्तवजीवनाचें निर्जीव चित्रण करूनहि भागणार नाही; तर त्या वास्तवचित्रामागे कोणत्याना कोणत्या तरी विशिष्ट तत्त्वज्ञानाची संजीवनी शक्ति पाहिजे. नाही तर जीवनाचीं वास्तवचित्रें रेखाटूनहि "We paint life as it is, but beyond that nothing at all....... We have neither immediate nor remote aims, and in our souls there is a great empty space" असे जे खेदोद्गार आपल्या समकालीन लेखकांच्या निवळ निर्जीव वास्तवचित्राकडे पाहून चेकॉव्हला काढावे लागले तशाच प्रकारचे अुद्गार आपल्याहि लेखकांबद्दल काढावे लागतील.

गं. व. ग्रा.

## कादंबरी

गेल्या वर्षी प्रकाशित झालेल्या ग्रंथांची अेकंदर संख्याच बरीच कमी असावी असें वाटतें. याचें कारण युद्ध ! परंतु युद्धाने कागदावर नियंत्रण आणलें तरी वाचकांच्या वाचनाच्या सवयी-चें कोणी नियंत्रण करू शकत नाही. दरवर्षीप्रमाणे मागील वर्षीहि कांही नवीं नवीं पुस्तकें वाचावयास मिळावींत अशी वाचकांना अुत्कंठा वाटत होतीच आणि प्रकाशकांनी महागाअीच्या दिवसांतहि वाचकांची ही अुत्कंठा पूर्ण करण्याच्या कामीं जिवापाड प्रयत्न केले. प्रकाशनाचा व्यवसाय अतिशय जोखमीचा होअून बसल्यामुळे अर्थात् ज्यांनी आपलें गिऱ्हाअीक पक्कें करून ठेविलें आहे अशाच लेखकांना प्रकाशकांनी प्रकाश दिला. त्यामुळे दरवर्षीपेक्षा गेल्या वर्षी नवोदित लेखकांचे ग्रंथ फारसे प्रकाशित झाले नाहीत. परंतु स्फूर्तीच्या बाबतींत कळण्यास कांही मार्ग असता तर असें दिसून आलें असतें की, परिस्थितीच्या या कोलाहलांत अनेकांचीं मनें खडबडून जागीं झालीं आहेत. आणि आपल्या मनांतील खळबळ व्यक्त करावी असें अनेकांना वाटत आहे. मागील महायुद्धामुळे पाश्चात्य वाङ्मयांत जशीं प्रचंड आंदोलनें अुत्पन्न झालीं तशीं या चालू युद्धामुळे या देशांत होत आहेत. कारण या युद्धाने या देशासहि कवटाळावयास सुरुवात केली आहे. परंतु तीं आंदोलनें ग्रंथरूपाने नमूद झालीं नाहीत. याचें कारण अद्यापहि महाराष्ट्रांत तरी प्रकाशन हा धंदा आहे आणि वाचन ही करमणूक आहे.

प्रकाशकांनी धंदेवाअीकपणाने शक्य तों प्रथितयश लेखकांनाच लिहावयास बसविलें आणि त्यामुळें गेल्या वर्षी पुन्हा अेकदा मराठी वाङ्मयांत माडखोलकर, पु. य. देशपांडे, खांडेकर, फडके अित्यादि नावें गाजलीं.

'जळलेला मोहोर' (खांडेकर), 'काळी राणी', 'नवें जग' (देशपांडे), 'नवे संसार' (माडखोलकर), 'इंद्रधनुष्य' (फडके) अित्यादि ग्रंथ अनेक कारणांसाठी वाचकांच्या स्मरणांत राहावेत असे झाले. आणि वरील ग्रंथांपेक्षा निराळ्या स्वरूपाच्या पण तितक्याच स्मरणीय अशा अितरहि कादंबऱ्या आहेत. त्यांत 'फाटकी वाकळ', 'मी-रामजोशी', 'सात लाखांतील अेक' (वरेरकर), 'अपुरा डाव' (कवठेकर), 'साहित्यिकांची सफर' (य. गो. जोशी), यांचा प्रामुख्याने अुल्लेख करावा लागेल. याहि कादंबऱ्या मराठी वाचकांनी हरप्रयत्नाने मिळवून मिळवून वाचल्या. याशिवाय 'जिवलगा'बद्दल दा. न. शिखरे यांचे अभिनंदन अनेकांनी केलें. ना. ह. आपटे यांच्या 'अपेक्षे'चा चांगला स्वीकार झाला. वा. वि. जोशींचें 'अंतर' त्यांचे मागील ग्रंथ आठवींत वाचकांनी वाचलें. सौ. मालतीबाअी दांडेकरांचें 'मातृमंदिर' लेखिकेची पहिलीच कादंबरी असूनहि वाचकांना आवडलें. रा. वि. म. कुलकर्णी यांची 'आहुति', ना. वि. कुलकर्णी यांचें 'जग कुठें आहे ?', कोचकरांचीं 'दडलेलीं पत्रें', रजनी गुहागर यांचें 'जीवन', टोंगो यांचा 'स्वीकार', शिरोडकरांचें 'गाल्वोट', साळगांवकर यांचें 'दान आणि ग्रहण'... अशी यादी करूं लागलों की, कादंबरीक्षेत्रांत गेल्या वर्षी नाही म्हटलें तरी बरेंच लिहिलें गेलें असें कळूं लागतें. परंतु अशी यादी पूर्ण करणें हा या समालोचनाचा हेतु नाही हें लक्ष्यांत घेअून व्यावहारिक दृष्ट्या झालेल्या अनुल्लेखाबद्दल वाचकांनी क्षमा करावी.

प्रथितयश वा नवोदित, गाजलेले वा न गाजलेले, खपलेले वा पडलेले अित्यादि व्यावहारिक विचार समालोचनाच्या कामीं अवादी अप्रस्तुत आहेत. त्यामुळे तशा तऱ्हेचा कांहीहि विचार मनांत न आणतां आणि सर्व ग्रंथांची अचूक नोंद करण्याचाहि गणकाचा हव्यास न बाळगतां या विभागांतील वाङ्मयांतील विचारप्रवाहांचें स्थूल समालोचन करावयाचें

आहे. पत्रिकेच्या अंकांत वेळोवेळीं या विभागांत बऱ्याच कादंबऱ्यांवर कमजास्त विस्तारानें लिहून झालेंच आहे त्यामुळे वैचारिक समालोचनाचें हें काम बरेंचसें सोपें झालें आहे.

या विभागांतील ग्रंथांविषयी सर्वसाधारणपणें असें म्हणतां येईल की, कादंबरीलेखकांनी आपल्या भोवतालच्या जीवनाशीं परिचय करून घेण्याचा बराच प्रयत्न केला आहे. आपणांस परिचित झालेलें मानवी जीवनाचें स्वरूप एकंदर मानवी जीवताशीं जुळतें असावें असें त्यांना मनापासून वाटत होतें. आपलें लेखन प्रातिनिधिक करण्याची त्यांची योजना असल्याचें त्यांच्या ग्रंथावरून वाटतें. आयुष्याविषयी जीं आंदोलनें वाचकांच्या मनांत आहेत, त्यांचा कानोसा घेण्याचा प्रयत्न लेखकांनी केला. पण–

तो प्रयत्न यशस्वी झाल्याचा निर्णय मात्र फार थोड्या कादंबऱ्यांना देतां येईल. याचें कारण अनुभवाचें जग आकुंचित आणि प्रातिनिधिक म्हणविण्याचा हट्ट. नवें जग जन्माला येत आहे असें कमजास्त प्रमाणांत बहुतेकांना वाटतें. पण तें कोणतें हें ओळखण्याचा जो प्रयत्न कादंबरीकारांनी केला तो पाहून मात्र वाटतें की, तें हें नाही एवढें खास. राजकीय विचारांच्या बाबतींत प्रचलित राजकीय वातावरणांत कांही मार्गदर्शन करण्याचा प्रयत्न 'नवें जग', 'फाटकी वाकळ', जिवलग', 'मी–रामजोशी' इत्यादि कादंबऱ्यांतून केलेला आहे. बहुतेकांना असें वाटलें की, आज चालू झालेल्या राजकीय विचारपंथांपैकीं कोणत्याहि पंथानें तरुण पिढीचें समाधान होत नाही. पुढाऱ्यांतील जिव्हाळा नाहीसा झालेला आहे आणि त्यांची विचारपद्धति नव्या प्रश्नांस निरुपयोगी ठरत चाललेली आहे. असें वाटल्यामुळे आंता नव्या जगांतील कांही तरुण विराटभारतवादाची तयारी करीत आहेत असें श्री. पु. य. देशपांडे यांनी सांगितलें आहे आणि विराटभारतवादानेहि काम होत नाही असें दाखवून समाजसत्तावाद हा एकच पंथ, नव्या जगाची उभारणी व धारणा करूं शकेल असें दाखविलें आहे. युद्धाचें आव्हान किंवा प्रत्यक्ष परिस्थितींतील वाढती असुरक्षितता यामुळे बलोपासनेकडे पुष्कळांचें मन वळलें आहे. परंतु केवळ बलोपासनेनें समाजांतील अन्यायांचा बंदोबस्त करतां आला तरी त्यांचें निर्मूलन करतां येत नाही असें दाखविण्यासाठी नव्या जगांतील युद्धसहकार्यवादी तरु आणि अरविंद यांचा शेवटीं पराभव झाल्याचें लेखकाने दाखविलें आहे. आणि शेवटीं अमानुष समाजरचनेंतूनच युद्धादि प्रसंग उत्पन्न होतात ती अमानुषता युद्धें लढून दूर होणार नाही, त्यासाठी समाजरचना बदलावयास पाहिजे, हें लेखकाने वाचकांस पटविण्याचा प्रयत्न केला आहे. या सर्व प्रयत्नांस साधन म्हणून वापरलेल्या कथानकाने मात्र पोरकटपणा आणला आहे. ज्या कथानकांतून या राजकीय विचारप्रवाहांची पेरणी केली आहे त्या कथानकांत या विचारप्रवाहास मुळींच पाठिंबा नाही. एखादा पुरुष जायबंदी करून युद्धपद्धतीचा पराभव ठरवणें, त्या पुरुषाच्या भांबावलेल्या पत्नीस हृदयावर विसावा देऊन आपल्या विराटभारतवादाचा विजय झाला असें मानणें या दोन्ही प्रकारांत त्या विचारप्रवाहांचें मात्र विडंबन झालें आहे. प्रचलित राजकारणाविषयी आपले विचार कथानकांतून सांगतांना कथानकास ते विचार पचतात कीं नाही याचा फारसा विचार होत नाही. त्यामुळे होतें काय, त्या विचारांवर तर प्रकाश पडतच नाही परंतु ते अस्थानीं अपात्रीं पडल्याने सत्याचें विडंबन मात्र होतें. गांधीवादांतील निरुपयोगीपणा दाखविण्याचा अट्टाहास कांहींनी केला तर त्यांचें भाबडेपणानें समर्थन करण्याची खटपट कांहींनी केली. वरेरकरांची 'फाटकी वाकळ' ही त्यांच्यावर गांधीवादाची जी भलती पकड आहे त्याची साक्ष आहे. गांधीवादाने, स्वतःस व दुसऱ्यास मार्ग दाखविण्याऐवजी गांधीवाद्यासच हतबुद्ध करावें हें गांधीवादाचें दुर्दैव होय !

समाजांतील भोंदूपणास धक्के देणारा 'फाटकी वाकळ'मधील नायक हा स्वतः मात्र गांधी-वादाच्या लौकिक भागांतच गुरफटलेला दिसतो. 'जीवन' या कादंबरींतहि गांधीवादाच्या या लौकिक भागावरच सगळा भर दिला आहे. गांधीवादाच्या लौकिक भागाने हिंसावादाचा पराभव करण्याची अुमेद लेखिकेने बाळगली आहे. तेथें हिंसा आणि अहिंसा हे शब्द अगदी शब्दकोशांतील अर्थाच्या मर्यादेपुरतेच वापरलेले दिसतात. ते कांही स्वतंत्र स्वयंसिद्ध विचार-प्रवाह वा पंथ आहेत असें कादंबरीवरून वाटत नाही. राजकीय विचारांच्या पार्श्वभूमीवर 'जिवलग' कादंबरीचें कथानक अुभारलें आहे. तेथेहि तडफदार तरुणाच्या हातीं आपल्या राज-कारणांतील 'यावनी' प्रश्न सोपविला आहे. त्या प्रश्नाचें विवेचन व निर्णय अेका राजकीय मत-प्रणालीपुरते सुसंगत आहेत. परंतु लेखकाच्या भूमिकेवरून विचार करतांना यापेक्षा जास्त व्यापक दृष्टिकोनाची कोणीहि अपेक्षा करील. अशा तऱ्हेने राजकीय विचारप्रवाहांचा कादंबरी-विभागांत कानोसा घेतला तर निदान अेवढें नक्की दिसतें की, गांधीवादी तत्त्वज्ञानानें बदललेल्या परिस्थित्यनुसार फेरविचार करण्याची आवश्यकता सर्वांना पटलेली दिसते. परंतु याबरोबरच त्या फेरविचारांचें जें प्रत्यक्ष स्वरूप कादंबऱ्यांतून दिसतें त्यांत मात्र कोणत्याहि नव्या विचारप्रवा-हाचें स्वरूप, त्या त्या कादंबरीपुरतेंसुद्धा, वाचकांस विश्वासांत घेण्याअितकें व्यक्त झालें नाही.

राजकीय विचारप्रवाहांतील अस्थिरतेप्रमाणेच सामाजिक विचारांतहि कादंबऱ्यांतून अस्थि-रता दिसून येते. माणसांचा आचार व विचार यांच्यांत कल्पनानिर्मित जगांतहि मेळ नसावा हें अेका अर्थाने 'वास्तववादा'स धरूनच आहे असें म्हणतां येअील ! वास्तववादाची अशी अत्यंत पोकळ व शाब्दिक तरफदारी सामाजिक कादंबऱ्यांतून चाललेली दिसते. विवाहसंस्थेच्या अडचणींचें स्वरूप काही ठिकाणीं आता बदललेलें दिसतें. अजाणतेपणीं विवाहबंधनांत गुरफटलें जाणें ही बालविवाहकालांतील आपत्ति आता काळाबरोबर नाहीशी झालेली दिसते. नापसंत माणसाशीं योग आणि त्यामुळे प्रिय व्यक्तीचा अपरिहार्य वियोग याहि अडचणींतून विवाहसंस्था पार पडलेली दिसते. आता विवाहबंधनाची व्यवहारिक बाजू डावलून जीवनांतील अपुरे डाव पार कसे पाडतां येतील याविषयी योजना सुरू झालेल्या दिसतात. आपल्या प्रिया विवाहित झाल्या तरी त्यांचा सहवास मिळवूं शकणारे प्रियकर कांही कादंबऱ्यांतून दिसतात (दडलेलीं पत्रें) तर कांही कादंबऱ्यांतून पतिविषयाविषयीच्या रूढ कल्पनांचा मनावर पुरेसा ताबा नसल्याने नकळत (?) प्रियकराविषयी अनावर ओढ अुत्पन्न होणें, परंतु त्या ओढींतील सामाजिक संकटांना घाबरून शेवटीं निदान विवाहांत शरीरसुखापुरता हक्क मिळाला तरी पुष्कळ झालें अशा सामोपचाराने जीवनाचा विस्कळित डाव कसाबसा आवरणें असा प्रकार कांही कादंबऱ्यांतून दिसतो (अपुरा डाव). बंधुप्रेमाच्या आच्छादनाखालीं प्रणयाराधन करण्याचा भोंदूपणा झिडकारून आपल्या अिच्छेचें स्पष्टपणें प्रकटीकरण करणाऱ्या स्त्रिया कांही कादंबऱ्यांत दिसतात. शरीरसंबंधापेक्षा जास्त अुच्च शुद्ध व्यापक विशाल भूमिकेवर वैवाहिक जीवन असावें अशा आग्रहाने त्या जीवनासाठी तपश्चर्या करीत शरीराने दूर राहणारे स्त्री-पुरुष कांही कादंब-ऱ्यांत दिसतात. आणि तेथेच शरीरसंबंधास अगदी दुय्यम मानणाऱ्या त्याच नायिका आपल्या नियोजित प्रियकराशिवाय दुसऱ्या अेखाद्या दुःखीकष्टी जिवाची मात्र स्त्रीसहवासाची भूक अंशतः भागविण्यास तयार असण्याअितका समंजसपणाहि दाखवितात ! कारण त्या दुसऱ्याच्या अपेक्षांत कायमचें असें कांही पत्करावें लागत नाही असें त्यांचें समर्थन आहे ! अेकाच पुरुषावर आपलें प्रेम आहे असें कळल्यावर अेक बहीण दुसऱ्या बहिणीच्या मार्गांतून बाजूस होअून समाज-सेवेसाठी 'मातृमंदिरें' काढून तेथे आपल्या वैवाहिक जीवनाविषयीच्या अपेक्षाभंगाचें दुःख

विसरून जाते असें स्त्रीजीवनाचें चित्र लेखिका रंगवीत आहेत. प्रथमदर्शनीं प्रेमांतील फसवेंपण दाखविणाच्या आवेशाने कांही लोक 'मदनमंदिरें' अुध्वस्त करीत आहेत. याचबरोबर आओबापांच्या समाधानाखातर आपल्या सहाध्यायी प्रियेच्या प्रेमाचा त्याग करणारे कॉलेज-युवक 'जीवन'सारख्या कादंबऱ्यांतून दिसतात. अितकेंच नव्हे तर या प्रेमत्यागानंतर स्वतःचें जीवन वाऱ्यावर सोडून न देतां आपल्या गांधीवादाच्या (?) सामर्थ्यानें अेका हिंसावादी तरुणाचें जीवन वांचविण्यासाठी स्वतःचा बळी देण्याअितकी तडफ 'जीवना'च्या नायकांत दिसते. समाजांतील कांही तरुण-तरुणींच्या जीविताविषयक अपेक्षा, योजना यांचें चित्रण करण्याचे असे हरहुन्नरी प्रयत्न चालू आहेत. तरुणांच्या फक्त विवाहविषयक सुखदुःखांची वास्तपुस्त करण्याकडे बऱ्याच लेखकांचें लक्ष गुंतलें असलें तरी वैवाहिक जीवनाबाहेरहि तरुणांचें जीवन आहे. त्याहि, जीवनविभागांतील प्रश्नाविषयी त्यांच्या ठिकाणीं तळमळ आहे याची जाणीव बाळगणारेहि बरेच लेखक आहेत. आणि त्यांत आश्चर्य असें की, त्यांतल्या त्यांत प्रथितयशाच्या मानाने नव्या लेखकांनी ही जाणीव जास्त स्पष्टपणें व्यक्त केली आहे ('जिवलग', 'दान आणि ग्रहण' अि.). कादंबरीविभागांतील जग आता शहरापुरतें संकुचित राहिलें नसून तें खेडेगांवापर्यंत व्यापक झालेलें आहे. खेडेगांवांतील जीवनाचीं यथार्थ चित्रें रंगविण्याचें कार्य यशस्वीपणें झालेलें कांही कादंबऱ्यांतून दिसतें. ग्रामोद्धाराच्या कार्यांतील सोओ-गैरसोओींचें अुद्बोधक चित्रण 'सात लाखांतील अेक' या प्रथितयश लेखकाच्या कादंबरीअितकेंच 'आहुति' या नवोदित लेखकाच्याहि कादंबरींत झालें आहे. ग्रामीण जीवनाचे प्रश्न तात्त्विक भूमिकेवरच्या बौद्धिक सामर्थ्यापेक्षा मानवतेच्या जाणिवेनेच सुटतात हें या कादंबऱ्यांतून दाखविलें आहे.

नवोदित लेखकांतहि प्रथितांच्या अनुकरणाने केवळ स्त्रीपुरुषसंबंधापुरतें विवेचन करणारेहि लेखक आहेत; अुदा० टोंगो यांची 'स्वीकार' ही पहिलीच कादंबरी तीन तरुणींच्या सहवासांत सांपडलेल्या तरुणाचें जीवन वर्णन करणारी आहे. अेखादा तरुण निरनिराळ्या संबंधाने निरनिराळ्या स्वभावांच्या तरुणींच्या सहवासांत वावरत असतां कोणत्या तरुणीचा स्वीकार करावा याविषयी त्याला गोंधळ पडणें साहजिकच आहे. प्रतापचा असा गोंधळ झाला. परंतु त्याने मोहवशतेपासून स्वतःचा बचाव करून शेवटीं अेका निरागस तरुणीचा स्वीकार केला. कर्तव्यकठोर पुरुषहि शेवटीं अविकृत स्त्रीमनाच्या सहवासाचा खुषीने 'बंदा' होतो हें दाखविण्यांत लेखकाने तरुणाच्या मनाच्या समंजसपणाचें चित्र रंगविलें आहे. 'गालबोट' या श्री. शिरोडकर यांच्या कादंबरींतहि, अेका व्यसनी तरुणामध्येहि अेखाद्या स्त्रीच्या जीवनाविषयी सहानुभूति अुत्पन्न झाल्याने कर्तृत्व जागृत होतें असें रंगविलें आहे. आणि त्याबरोबरच समाजांतील रूढ नीतिकल्पनांच्या जाचामुळे व्यक्तिविकासाची गळचेपी होत आहे हेंहि दाखविलें आहे. अपराध्यास पापक्षालन करतांच येअूं नये असा समाजाचा दंडक आहे. त्या दंडकाची विवेकशून्यता लेखकाने गोमांतकीय पार्श्वभूमीवर अुठावदार रीतीने दाखविली आहे.

वैवाहिक जीवनाकडे 'शास्त्रीय' दृष्टीने पाहण्याचा प्रयत्न श्री. वि. स. खांडेकर यांनी आपल्या 'जळलेला मोहर' या पुस्तकांत केला. हें पुस्तक कादंबरी कीं कथासंग्रह आहे याविषयी वाद आहे. परंतु सर्व पुस्तकांतील घटना अेकत्र बांधण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे, अेवढ्यापुरतें त्यास कादंबरी म्हणण्यास हरकत नाही. अपेक्षित असे संबंध विवाहबाह्य असले तरी ते अपरिहार्य आहेत किंवा समर्थनीय आहेत असें दाखविण्याचा बऱ्याच लेखकांनी प्रयत्न केला आहे. आपल्या प्रिय व्यक्तीच्या सहवासाविषयींच्या अपेक्षा कृत्रिम वैराग्याने दडपून

ठेवण्याअैवजी त्यांना वाट करून द्यावी असा मार्ग बऱ्याच कादंबऱ्यांतून चोखाळलेला आहे. अिच्छेविरुद्ध झालेल्या विवाहाचें पावित्र्यादि 'तंत्र' पाळण्यास विवाहित व्यक्ति बांधलेली नाही असे विचार कांही कादंबऱ्यांतून व्यक्त झाले आहेत. परंतु या प्रश्नांकडे श्री. खांडेकरांनी शास्त्रीय चिकित्सेच्या दृष्टीने पाहिलें आणि 'जळलेला मोहर' लिहिला. ललितवाङ्मयांतील सर्व प्रांतांत धुमाकूळ घालणारा वैवाहिक असंतोप हाच येथेहि विषय आहे. तो अुत्पन्न होण्याचीं भावनात्मक कारणें सोडल्यास आणखी अेक कारण अुरतें. तें म्हणजे लैंगिक जीवनांतील विसंगति. पति आणि पत्नी यांपैकीं अेखादी व्यक्ति जरी जास्त कामुक असली तरी वैवाहिक जीवनांत असंतोप अुत्पन्न होतो. वस्तुतः आपापल्यापरी दोघेंहि तशीं चांगली परंतु त्यांचें मीलन विसंगत होतें, विचित्र होतें. अशा विकृत कामप्रवृत्तीच्या स्त्रीपुरुषांच्या हकीगती 'जळलेला मोहर' या ग्रंथांत सांगितल्या आहेत. परंतु लेखकांचें निदान अतिशय अेकांगी ठरलें आहे. कामेच्छा-पूर्ति ही विवाहितांच्या जीवनाच्या अनेक अपेक्षांपैकीं अेक आहे, ती अेकमेव अपेक्षा नाही. विवाहसंबंध सुसंबद्ध राखण्यासाठीं विवाहितांमध्ये जे अनेक रज्जु आहेत त्यांपैकीं कामेच्छा हा आहे हें लक्ष्यांत न घेतल्याने, 'जळलेला मोहरा'स कांहीसा अेकांगीपणा व अशास्त्रीयता आली आहे. फार काय वैवाहिक जीवनांतील शारीरिक सुखाचा भागहि पूर्णपणें शास्त्रीय पद्धतीने मांडलेला नाही. नुसत्या कामेच्छेची अेकंदर जीवनांत स्वतंत्र व्यवस्था करतां येत नाही. सुप्त मनांतील अनेक मानभावनांचा विचार व त्यांचे अुदात्तीकरण्याचा प्रयत्न हें त्या प्रश्नांचें स्वरूप आहे. तो सोडवितांना प्रतिक्रियेच्या स्वरूपांत अनावर झालेल्या मनाचीं दिशाणीं विविध दर्शनें हरघडीं पाहिलीं पाहिजेत. सुप्त मनाचा असा साकल्याने विचार केल्याखेरीज मोहोर जाळणाऱ्या आगीचें स्वरूप व त्यावरील अुपाय सांपडणार नाहीत. प्रेमाचा व विवाह-संबंधाचा अितक्या अलगपणें व केवळ शारीरदृष्टीने विचार होअूंच शकत नाही. 'जळलेला मोहर' वाचून 'अिंद्रधनुष्य' वाचावें म्हणजे अेकाच कथानकावर गोष्टहि लिहितां येते नि कादं-बरीहि लिहितां येते हें आपणांस कळतें. 'अिंद्रधनुष्यां'त Frigidity ( थंड कामवृत्ति ) अस-लेली तरुणी शेवटीं कशी निवळते म्हणजे कामप्रवृत्ति ही नैसर्गिक नि निरुपद्रवी आहे हें तिला पुरुषसहवासांच्या तिसऱ्या प्रयोगांत कळतें हें दाखविलें आहे. पहिले दोन तरुण प्रेमा-विष्कारांत वासना दाखवूं लागले कीं ती अेकदम बिथरून जाअी. पण शेवटीं तिला तिसऱ्या प्रयोगाच्या वेळीं कळलें की, पुरुषांच्या प्रेमाविष्कारांत हें असेंच असतें. त्यांत अेवढें घाबरण्या-सारखें कांही नाही. या बाअीला विवाहापूर्वी हें कळलें म्हणून बरें ! नाही तर अशा विकृत मतासह विवाह झाला असता तर तिच्या पतीच्या जीवनाचा मोहोर जळून गेला असता ! 'अिंद्रधनुष्यां'त प्रा. फडके यांचें 'लालित्य' अगदी नेहमीसारखें भरास आलें आहे. परंतु त्याचा अुपयोग (?) हा प्रश्न मनांत आला की वाअीट वाटतें. ता. १८ नोव्हेंबर १९४० ते ता. २०–१–१९४१ या कालांत या कादंबरीचें लेखन झालें. भोवतालच्या परिस्थितीकडे प्रथितयश साहित्यिकांचेंहि किती व कसें लक्ष आहे त्याचा हा पुरावा आहे. यावेळीं जगांत कोणतीं आंदोलनें चाललीं होतीं, या देशांत त्याच्या काय प्रतिक्रिया होत होत्या पण— 'लक्ष याकडे देतो कोण ! आला क्षण गेला क्षण !' अिंद्रधनुष्याच्या शेवटीं अेक पत्र दिलें आहे. त्या-वरून या परिस्थितीची जाणीव लेखकास असावी असें दिसतें. आपण अशा काळांत भोवताल-चें जीवन डावलून भलत्या विषयावर लिहीत आहोंत हें त्यांना माहीत आहे. कादंबऱ्यांतून राजकारणाचा निदान पार्श्वभूमीसारखा तरी अुपयोग ते करतात. पण या कादंबरींत तसें करणें नाही ! कारण राजकारण आलें कीं सरकारची वक्रदृष्टि येते असें कोणींतरी सांगितलें आणि

'झंकार'वर कांही किटाळ येअील अशी भीति वाटली ! १९४० सालींच त्यांनी अेक कम्युनिस्ट नायक (आपापल्या मगदुराप्रमाणें) रंगविला आहे ! म्हणजे राजकारणाचा विचार केला तर तो 'तसा' नाही तर मग राजकारण नाहीच ! जीवनांत– प्रातिनिधिक जीवनांत– राजकारण अितकें आलिप्त ठेवतां येतें का ? निदान कॉलेजांतील समंजस तरुणांच्या जीवनांतून तरी राजकारणास हाकलतां येतें का ? आणि मे १९४० च्या 'ज्योत्स्ने'च्या अंकांत रत्नागिरी-अध्यक्ष म्हणून प्रा. फडके यांचें स्वागत करतांना श्री. खांडेकर प्रा. फडके यांच्याविषयी लिहितात : 'आजच्या मराठी कादंबरीचे ते केवळ जादूगार नाहीत. तर ते तिचें आशास्थानहि आहेत ! त्यांनीं मनांत आणलें तर......टॉलस्टॉयप्रमाणें......महाराष्ट्राच्या १९०० ते १९४० मधील जीवनाचें चित्रण करणारी अेखादी महाकादंबरी लिहिण्याची त्यांना स्फूर्ति झाली तर...... रोमा रोलाँ, गॅल्सवर्दी किंवा पर्ल बक्‌च्या तोडीची कादंबरी ते आपल्या मातृभाषेला अर्पण करतील ! '

पण महाराष्ट्र आणि मराठी भाषा अद्याप आजच्या प्रथितयश लेखकांबद्दल निराश झालीं नाहीत ! आता १९४३ सालीं तरी— ?

साहित्यांत मान्यता मिळवून बसल्यावर आपल्या कार्याबद्दल बेफिकीर होणाऱ्या बेजबाबदार आणि भोंदू साहित्यिकांबद्दल अतिशय अुबग घेअूनच जणूं काय श्री. य. गो. जोशी यांनी 'साहित्यिकांची सफर' ही 'भयंकर' दीर्घ कथा लिहिली असावी. अेरव्ही अतिशय मनमिळाअू, सहनशील असलेला मनुष्य संतापला म्हणजे कसा संतापतो याचें अेक वाङ्मयीन अुदाहरण म्हणजे 'साहित्यिकांची सफर' ! साहित्यिकांनीं सुरू केलेल्या व वाढविलेल्या बुवाबाजीच्या अनेक प्रकारांवर श्री. य. गो. जोशी यांनी कोरडे ओढले आहेत. त्यांची स्वतःची खेळाडू वृत्ति याहि प्रसंगीं कायम राहिल्याने, पुस्तकांतील वातावरण वैयक्तिक निंदेपासून बरेंच अलिप्त राहिलें आहे आणि विडंबन परिणामकारक झालें आहे. 'दुधावरची साय' लिहिणारा गृहस्थ 'साहित्यिकांची सफर'हि लिहूं शकतो !

कांही व्यक्तींच्या जीवनाच्या आधारें अेखाद्या समाजव्यापी प्रश्नाचा अूहापोह करणाऱ्या लेखकाप्रमाणेच, सर्वसामान्यपणें सामाजिक जीवनाच्या आधारें जीवनाचा स्थूल मानाने विचार करणारेहि कांही लेखक असतात. श्री. ना. वि. कुलकर्णी, श्री. ना. ह. आपटे श्री. वा. वि. जोशी अित्यादींचा या सदरांत समावेश होअील. 'जग कुठें आहे' या कादंबरींत श्री. कुलकर्णी यांनी मध्यमवर्गाची दैनंदिन कथा वर्णिली आहे. त्यांत तरुण पिढीच्या ठिकाणीं दिसणारी बेफिकिरी आणि बेजबाबदारी दाखवून अेका वृत्तपत्रकाराचें आदर्श समाजसेवक असें चित्र रंगवलें आहे. समाजसेवेच्या कार्यांतील माणसांनी अहोरात्र आपल्या कार्यनिष्ठेवर जागता पहारा ठेविला पाहिजे. जीवनांत तत्त्वभ्रष्टतेचे प्रसंग केव्हा, कसे अुद्भवतील याचा नियम नसतो हेंहि कांही पात्रांच्या द्वारें पटविलें आहे. 'अपेक्षा' या कादंबरींत श्री. ना. ह आपटे यांनी, वैवाहिक जीवनांत दोघांनी आपल्या अपेक्षांना मुरड घातली तरच वैवाहिक जीवनांत सुख लागतें, विवाह ही तडजोड आहे, हें प्रतिपादिलें आहे. 'अंतर' या कादंबरींतील वातावरण जरठ-कुमारी-विवाहकाळांतील वाटलें तरी त्यांत चालू जीवनाच्याहि छटा आहेत. या कादंबरींत श्री. वा. वि. जोशी यांनी अनेक दृष्टींनी विषम ठरणाऱ्या विवाहाचा स्वतःच्या सामाजिक दृष्टिकोनाने विचार केला आहे. वयांतील व वृत्तींतील अंतर वैवाहिक जीवनाचें, विशेषतः पत्नीच्या जीवनाचें, सर्वस्वीं मातेरें करतें

हें त्यांनी दाखवलें आहे. या व असल्या कादंबऱ्यांतून, वैयक्तिक जीवनांतील अतृप्त आकांक्षांच्या तृप्तीसाठीं अट्टाहास बाळगणारीं माणसें दिसत नाहीत; तर या प्रकारच्या कादंबऱ्यांतील व्यक्ति आपल्या आशा-अपेक्षा यांचा विचार सामाजिक औचित्याच्या दृष्टीने करीत असतात. वैयक्तिक जीवनाच्या सर्वांगीण(?) विकासाअैवजी समाजाचा अेक अुपयुक्त घटक होणें ही त्यांची दृष्टि असते. तरुण-तरुणी याहि कादंबऱ्यांतून आहेत; फक्त त्यांच्या जीवनचित्रांत असा फरक दिसण्याचें कारण लेखकांचा दृष्टिकोन ! आपण रंगविलें तें प्रातिनिधिक सत्य आहे असा अट्टाहास माडखोलकरादि कादंबरीकार करतात. आणि असा आत्मविश्वास श्री. आपटे, कुलकर्णी अित्यादि लेखकांनाहि वाटत असतो. तरी या दोन वृत्तींच्या लेखकवर्गाने रंगविलेल्या सत्यांत अितकी तफावत कां पडावी ? अेकाच काळीं, अेकाच समाजांत लिहिणारे लेखक; परंतु अेकाच्या ग्रंथांतील तरुण-तरुणींत वैयक्तिक आकांक्षापूर्तीसाठीं प्रचंड अट्टाहास. तो अट्टाहास स्त्रीपुरुष-संबंधांतील आचारस्वातंत्र्याचा आणि दुसऱ्याच्या ग्रंथांत भोवतालच्या समाजांत जास्तींत जास्त अुपयुक्त ठरण्याचा प्रयत्न करणारे तरुण व त्यांना सहकार्य देअून समरस होणाऱ्या तरुणी असा फरक कां दिसतो हा मोठा चिंतनीय प्रश्न आहे. लेखकांच्या जीवनविषयक दृष्टिकोनांत फरक आहे हें याचें अुत्तर असावें.

आपल्या दृष्टिकोनाच्या किंवा परिचित जगाच्या मर्यादा लेखकांनी लक्षांत घेतल्या तर सबंध सत्याचें भोवताली चाललेलें विडंबन थांबेल. या मर्यादा मोठमोठ्या लेखकांस माहीत नाहीत असें नाही; अुदाहरणार्थ खालील अुद्गार पाहा :—

"राजकीय चळवळीच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली मराठींतील कोणतीहि कादंबरी आपण घ्या. तींत फक्त गांधीवादाचे वाभाडे काढलेले आपल्याला दृष्टीस पडतील. पण गांधीवाद हा अशास्त्रीय, अपर्याप्त व म्हणून त्याज्य आहे असें कंठरवानें सांगितल्यावर लोकांना त्यापेक्षां श्रेयस्कर आणि तेजस्वी असें कांहींतरी दाखविण्याची जी जबाबदारी ओघानेंच येते तिची जाणीव मात्र कोणाला दिसत नाहीं". —माडखोलकर : शारदोपासक संमेलन, पुणें (१९४०).

आता माडखोलकरांविषयी खांडेकर काय म्हणतात पाहा :

"माडखोलकरांचे विचार दर सहा महिन्यांस बदलतात व जेव्हां तसा बदल होतो तेव्हां तो बदल योग्य आहे असें दाखविण्यासाठीं अेक सिद्धान्त शोधून काढण्याचा ते प्रयत्न करतात."
(समीक्षक, १५-६-१९४०, पृ. ६).

फडके, माडखोलकर (आणि आपण ?) अित्यादिकांनी काय करावें ?

"रा. फडके काय अगर माडखोलकर काय, यांनीं या समाजांतील कटु सत्यें पाहून तीं आत्मसात् करून त्यांवर तोडगा सुचविला पाहिजे. आपण ठराविक वर्गासंबंधीं घुटमळत बसतों. यामुळें मोठमोठे लेखकहि स्वतःशींच अप्रामाणिक होतात व परिस्थिति समजून न घेतां तिला बगल देण्यांतच भूषण मानतात, म्हणून लोकांना त्यांची किंमत वाटत नाहीं. रा. फडके यांनीं अेका कादंबरींत कॉंग्रेस राजवटीवर टीका केली आहे. म. गांधींची निंदा करून समाजांतील प्रश्न सुटत नसतात. बौद्धिक अराजकतेवर नुसती टीका करून काम भागत नाहीं."
—खांडेकर, जमखंडी द. म. साहित्यसंमेलन, (१९४०).

वाङ्मयाचें अितकें स्पष्ट मार्गदर्शन ज्येष्ठ साहित्यिक व्यासपीठावरून करीत आहेत, परस्परांचें व स्वतःचेंहि अितकें अचूक निरीक्षण करीत आहेत तरी ललितवाङ्मयांतील 'बौद्धिक

अराजक' मात्र अद्याप धुमसतच आहे ! परंतु या ज्येष्ठ साहित्यिकांनी आता मोवतालच्या तरुण लेखकांना विश्वासांत घेऊन त्यांना आत्मनिवेदन व आत्मपरीक्षण सांगितलें तर बौद्धिक अराजकाची निदान 'परंपरा' होण्याचें तरी थांबेल! या दृष्टीने 'प्रा. फडके यांच्या साहित्य-सेवेंतील स्मृति' हें 'झंकार'मधील सदर व निरनिराळ्या नामवंत लेखकांनी नियतकालिकांतून कांही निमित्ताने प्रसिद्ध केलेले आपले वाङ्मयजीवनांतील अनुभव अित्यादि लेखन अत्यंत हित-कारक आहे. अेखाद्या सुज्ञ प्रकाशकाने या सर्व मजकुरावर लक्ष ठेवून 'अिपारा' नांवाने त्याचें ग्रंथरूपाने संकलन करावें !

गं. भा. नि.

## लघुनिबंध

'लघुनिबंधांचा आमच्यावर असा मारा होतोय म्हणतां !' अशी अेका संपादकमित्राची तक्रार श्री. खांडेकर यांनी आपल्या 'अविनाश' या लघुनिबंधसंग्रहाच्या प्रस्तावनेंत दाखल केली असली तरी गेल्या सालांत पांचापेक्षा जास्त लघुनिबंधसंग्रह प्रसिद्ध झालेले दिसत नाहीत. मागील वर्षाच्या अेकुलत्या अेक संग्रहापेक्षा हा आंकडा स्पृहणीय असला तरी अितर पुस्तकांच्या मानाने तो कांहीच नाही हें मान्य केलें पाहिजे. संपादकांवर 'वळवाच्या सरीं'प्रमाणे लघुनिबंधांचा मारा होत असला तरी ते वळवाच्या सरींप्रमाणेच निष्फळ ठरत आहेत हें अुघड दिसतें. कठीण आर्थिक परिस्थिति आणि वैशिष्ट्याचा अभाव हींच कदाचित् त्यांतलें पुष्कळसें लिखाण पुस्तकरूपाने प्रकाशित न होण्याचीं कारणें असावींत. पण गेल्या सालीं प्रसिद्ध झालेले पांचहि संग्रह आपा-पल्यापरीने वैशिष्ट्यपूर्ण आहेत ही समाधानाची गोष्ट होय.

या पांच संग्रहांत प्रो. फडके यांचा 'धूम्रवलयें' हा संग्रह प्रथम मन वेधून घेतो; आणि तें योग्यच आहे. अुत्कृष्ट लघुनिबंधाला लागणारे सारे विशेष प्रो. फडके यांच्या ठिकाणीं वसत असल्यामुळे अेकाहून अेक सरस असे लघुनिबंध त्यांच्या हातून निर्माण व्हावेत हें ठीकच. 'गुज-गोष्टी' आणि 'नव्या गुजगोष्टी' हीं मराठींत अुत्कृष्ट लघुनिबंधांचीं पुस्तकें म्हणून मानलीं गेलीं असलीं तरी 'धूम्रवलयां'त त्यांच्या व्यक्तिमत्वाचे विशेष प्रकर्षाने प्रकट झाले आहेत. प्रस्तुतचा संग्रह त्यांच्या दोन्ही संग्रहांपेक्षा सर्वच बाबतींत सरस अुतरला आहे. जीवनाकडे अभिजात रसिक-तेने पाहण्याची त्यांची वृत्ति या लघुनिबंधांत मोठ्या हृदयंगमतेने प्रतीत होते. जीवनाशीं संतोषी वृत्तीने समरस होअून त्यांत प्रकट होणाऱ्या सौंदर्यविशेषांचा परामर्श चोखंदळपणाने घेणें हा त्यांच्या लघुनिबंधांचा स्थायीभाव आहे. या त्यांच्या जीवनाबद्दलच्या संतोषी वृत्तीचा विलास विविध मधुर संवेदनांच्या रूपाने त्यांच्या लघुनिबंधांत पाहावयास मिळतो. असंतोषाची भावना कोठे चमकलीच तर ती अितक्या हळुवारपणें, अितक्या खेळकरपणें चमकेल की ती नमूद करण्यांतहि लेखकाला संतोषच वाटत असावा हें स्पष्ट दिसतें. लहरीपणा (mood) हा त्यांच्या लघुनिबंधाचा दुसरा विशेष मानला पाहिजे. या विशिष्ट लहरीपणांतच त्यांच्या संपन्न व्यक्तिमत्वाचे निरनिराळे पैलू चमकून जातात. या विशेषांनीच त्यांच्या लघुनिबंधांचें नावीन्य आणि चटकदारपणा हीं कायम राखलीं आहेत. हा लहरीपणा अितर लघुनिबंधकारांत विशेषत्वाने प्रतीत होत नसल्या-मुळेच त्यांचें व्यक्तिमत्व प्रभावी असूनहि त्यांच्या लेखनांतून नावीन्याचा अनुभव घडत नाही. अेखादा विषय हातीं घेतला कीं त्याचा धागा नेमक्या ठिकाणीं पकडून त्याचा संथपणें पण भावनेच्या अंगाने आविष्कार करण्यांत त्यांचें कौशल्य केवळ अनुपम आहे. भावनाविलासाच्या

अनुक्रमणिका

दृष्टीने अुत्कृष्ट ठरलेल्या त्यांच्या 'हरवली म्हणून सांपडली' या लघुनिबंधापेक्षा प्रस्तुत पुस्तकांतला 'पुरून ठेवलेलें धन' हा लघुनिबंध खचित सरस ठरेल. 'नको असलेले ग्रंथ' आणि 'कारागीर' या लघुनिबंधांत त्यांच्या खेळकर लहरीपणाचा अुत्कृष्ट नमुना पाहावयास सांपडतो. गुजगोष्टींचें भाषावैभव या संग्रहांत दृष्टीस पडत नाही हें खरें पण या लघुनिबंधांच्या साध्या, रसाळ पण ओघवती भाषेचा साजच लघुनिबंधाच्या नाजुक कलाविलासाला पोषक ठरणारा आहे. 'गुज-गोष्टी' कृत्रिम आणि बोजड वाटतात, त्या त्यांतील भाषागौरवामुळेच. भाषागौरव आणि अलंकारप्राचुर्य हे लघुनिबंधासारख्या जिव्हाळ्याच्या वाङ्मयप्रकाराला अनुपकारक ठरले तर त्यांत नवल कसलें ! लघुनिबंध हा जर प्रियमित्राच्या प्रेमळ संभाषणासारखा मानला तर भाषेचा बडेजाव आणि अलंकारांची हौस त्याला हानिकारकच ठरणार. पण 'गुजगोष्टीं'चा बोजडपणा 'नव्या गुजगोष्टीं'त कमी झालेला दिसला आणि 'धूम्रवलयां'त तर तो साफ नाहीसा झाला आहे.

**अविनाश** हा श्री. खांडेकरांचा लघुनिबंधसंग्रह वाचतांना अगदी निराळ्या तऱ्हेचा अनुभव येतो. त्यांच्या तरल मनोवृत्तीचें प्रतिबिंब त्यांच्या अितर लेखनापेक्षा लघुनिबंधांतच स्पष्टपणें पडलेलें दिसून येतें. संथपणापेक्षा गतिमानतेचाच अनुभव त्यांचे लघुनिबंध वाचतांना येतो. मूळ संवेदनेभोंवती नवनवीन कल्पना आणि विचार यांची गुंफण करण्याकरिता भिर-भिरणाऱ्या मनावरोवर आपण प्रवास करतों आहोंत असें वाटल्यावांचून राहत नाही. यामुळे त्यांच्या विषयांचा परिपोष भावनेच्या अंगाने झालेला क्वचितच दिसून येतो. कल्पना आणि तात्त्विकता यांचेंच प्राचुर्य त्यांच्या लघुनिबंधांत दिसतें. खांडेकरांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोनहि संतोषी वृत्तीच्या माणसाचा नाही. जीवनांतली विषमता आणि विसंगति यांजबद्दल त्यांच्या ठिकाणीं जो तीव्र असंतोष वसत आहे आणि त्यांच्या अितर लेखनांत जो तीव्र स्वरूपांत अुफाळून येतांना दृष्टीस पडतो त्यामुळे त्यांची वृत्ति कांहींशी कडवट आणि कणखर बनली आहे. या त्यांच्या कडवट आणि कणखर वृत्तीच्या छटा त्यांच्या लघुनिबंधांत प्रतीत होतात. लघुनिबंधासारख्या लेखनप्रकाराला कडवटपणा किंवा कणखरपणा मानवणारा नसल्याने श्री. खांडेकरांच्या लघुनिबंधांत हृदयंगमता किंवा माधुर्य यांचा अनुभव क्वचितच येतो. अलंकारांची पखरण आणि नवनवीन वाक्प्रचार पेरण्याची लकव यांमुळे त्यांच्या भाषेंत ओघ आणि 'बोलके' पणाचा अभाव दिसून येत असला आणि भाषेंत जी आपुलकी निर्माण व्हावयास पाहिजे ती होत नसली तरी याच विशेषांमुळे त्यांच्या लघुनिबंधांना चमचमीतपणा आणि चटकदारपणा प्राप्त झाला आहे. 'अकल्पित संदेश' आणि 'सारेच गुलाम' हे या संग्रहांतले लघुनिबंध या दृष्टीने संस्मरणीय झाले आहेत.

**अेक पाअूल पुढें** हा प्रो. दांडेकरांचा लघुनिबंधसंग्रह आपल्या साधेपणाच्या गुणां-मुळे वाचकांच्या लक्षांत राहण्यासारखा आहे. दांडेकरांची वृत्ति रसिक खरी पण त्यांच्या रसिक-वृत्तीचे पैलू त्यांच्या लघुनिबंधांत अुमटलेले दिसत नाहीत. त्यांचे विषय अगदी साधे, नित्यांतले आहेत. आणि त्यांची खुलावटहि साधी, सरळ अशी केलेली आहे. फडक्यांचा भावनाविलास आणि खांडेकरांची काव्यात्मता प्रो. दांडेकरांच्या लघुनिबंधांत प्रतीत होत नसली तरी त्यांत साधेपणामुळे वाचकाला घरगुती वातावरणाचा आल्हाद खचित मिळतो. साधी भाषा, साधेच विषय आणि साधाच थाट यांमुळे विषयाविषयांतून नावीन्य आढळत नसलें तरी खेळकर वृत्तीच्या विलासामुळे वाचकाचें विनोदन चांगलें होतें. 'रेल्वे लाअीन्स' हा त्यांचा या संग्रहांतील काव्यपूर्ण लघुनिबंध स्मरणांत राहण्यासारखा आहे.

म. सा. प. (१५-४-१५)

अनुक्रमणिका

**पहिली अुडी** हा प्रो. भावे यांचा लघुनिबंधसंग्रह वाचतांना त्यांची या लेखन-प्रकारांतल्या नवखेपणाची साक्ष ठिकठिकाणीं दिसते. विषयाशीं खेळत खेळत आत्मप्रकटीकरण करण्यास लागणारें कौशल्य त्यांच्या ठिकाणीं अजून यावयाचें आहे. तसा त्यांचा प्रयत्न सुरू असलेला दिसतो. तो सरावानें साध्य होअील याची साक्ष त्यांचे कांही लघुनिबंध देतात. संस्कृत वाङ्मयाच्या परिशीलनानें प्राप्त झालेलें वैदग्ध्य आणि अिंग्रजी वाङ्मयाच्या परिचयानें आलेली मार्मिकता त्यांच्या लेखनांत दिसत असली तरी त्यांचा परिपाक त्यांच्या व्यक्तिमत्वांत झालेला दिसत नाही. सूक्ष्म निरीक्षण, मार्मिक वाचन आणि ललित शैली, येवढ्यानेंच लघुनिबंध सिद्ध होअूं शकत नाही. या सर्वांवर संपन्न व्यक्तिमत्वाची रासायनिक क्रिया घडल्याशिवाय त्यांतून अुत्कृष्ट लघुनिबंधांचा फुलोरा फुलूं शकत नाही. 'नर्मदेंतला गणपति' किंवा 'अेक शोध' यांसारख्या लघुनिबंधांवरून त्यांच्या भावी यशाबद्दल आशा वाटूं लागते.

वैयक्तिक लघुनिबंधांचे जे चार संग्रह प्रसिद्ध झाले त्यांचें धावतें समालोचन येथवर झालें. पण या चार संग्रहांपेक्षा जरा निराळ्या तऱ्हेने वैशिष्ट्यपूर्ण असा जो पांचवा संग्रह गेल्या सालीं प्रसिद्ध झाला तो म्हणजे **ललित निबंध** हा होय. प्रो. फडके यांजपासून तों आजघटकेच्या तरुण लघुनिबंधकारांपर्यंत साऱ्यांचे लघुनिबंध या संग्रहांत संकलित करण्यांत आले आहेत. त्या त्या लेखकाचा अुत्कृष्ट लघुनिबंध यांत घेअून या संग्रहाला प्रातिनिधिक स्वरूप आणण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. पण हें या संग्रहाचें प्रातिनिधिक स्वरूप विवाद्य आहे. श्री. काणेकर व श्री. खांडेकर यांचे यांहूनहि चांगले लघुनिबंध निवडतां आले असते. श्री. शेरकर यांना या संग्रहांत कां स्थान देण्यांत आलें नाही तेंहि कळण्यासारखें नाही. पण तें कांही असलें तरी हा धाडसी प्रयत्न करून अेक नवीन अुपक्रम सुरू करण्याबद्दल या संग्रहाचे संपादक हार्दिक अभिनंदनास पात्र आहेत. नियतकालिकांतून विपुल लघुनिबंधलेखन सुरू असतां आणि काव्याचे व लघुकथांचे अनेक प्रातिनिधिक संग्रह प्रसिद्ध होत असतां लघुनिबंधांच्या बाबतींतच तो प्रयत्न होत नव्हता ही गोष्ट खचित अुत्साहजनक नव्हती. पण आता या संग्रहानें ही प्रथा सुरू झाली आहे व लोकांकडून तिचें स्वागतहि होत आहे ही आशादायक गोष्ट आहे. या संग्रहामुळे मराठी लघुनिबंधांचें विविध स्वरूप कळून येण्यासारखें आहे व या गोष्टीमुळे या संग्रहाला अेक विशेष मूल्य आलें आहे. पण याशिवाय या संग्रहाला प्रो. फडके यांची जी प्रस्तावना लाभली आहे तीमुळे या संग्रहाचें महत्त्व अनेक पटींनी वाढलें आहे. लघुनिबंधाच्या स्वरूपाची मूलग्राही छाननी अत्यंत ललित मार्पेत करणारा लेख मराठींत याशिवाय दुसरा नाही.

ना. मा. सं.



# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## विशेष साधारण सभा

म. सा परिषदेची विशेष साधारण सभा ता. १६ ऑगस्ट १९४२ रविवारीं सायंकाळीं ४॥ वा. परिषदेच्या सभागृहांत परिषदेचे अेक अुपाध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षते खाली भरली होती. सभेस पुढीलप्रमाणे सभासद अुपस्थित होते :—

प्रा. द. वा. पोतदार, प्रा. वा. म. जोशी, श्री. कृ. ग. लिमये, श्री. वि. द. घाटे, श्री. चिं. ब. जोशी, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. नी. वा. किंकर, डॉ. ग. श्री. खैर, श्री. श्री. शा. हणमंते, श्री. द. वि. देवधर, श्री. ग. धों. तुळपुळे, डॉ रा. ग. हर्षे, श्री. बा. शि. नाअीक, श्री. रा. दा. देसाअी, श्री म. वि. गोखले, रा. सा. र. लु. जोशी, प्रि. ध. रा. गाडगीळ, श्री. य. रा. दाते, श्री. गो. ग. माल्शे, श्री. तो. पु. अत्तरदे, श्री. कृ. शं. दीक्षित, श्री. श्री. कृ. साठे, डॉ. वि. भि. फडके, श्री. श्री. के. क्षीरसागर, श्री. ज. श्री. वाघ व श्री. य. गो. जोशी.

आरंभीं चिटणिसांनी पटवर्धन स्मारक समितीच्या चिटणिसांकडून आलेलें पत्र (प. ५७३, ता. १८।७।४२) सभेस वाचून दाखविलें. याबाबत परिषदेच्या कार्यकारी मंडळाने ता. २६ जुलै १९४२ च्या सभेंत जे ठराव केले तेहि माहितीसाठी सभेस वाचून दाखविले व आपली या कर्जअुभारणीबाबतची योजनाहि सभेस निवेदन केली. यानंतर प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी खालील ठराव सभेपुढे मांडला:—

"म. सा. परिषदेकडे आलेलें पटवर्धन स्मारक समितीचें प. ५७३, ता. १८।७।४२ चें पत्र व त्यावरील परिषदेच्या कार्यकारी मंडळाचा ठराव हीं वाचलीं. डॉ॰ माधवराव पटवर्धन स्मारक मंदिराची अिमारत आता पूर्ण झाली आहे हें पाहून या सभेस आनंद होत आहे. या सभागृहास अेकंदर आलेल्या खर्चीपैकी कांही रक्कम स्मारकसमितीने जमविली असून अधिक रक्कम जमविण्याचे स्मारकसमितीचे प्रयत्न चालू आहेत या आश्वासनाबद्दल ही सभा समितीस धन्यवाद देत आहे. इमारत, ग्रंथालय व अितर सामान यांस आजपावेतो मंजूर केलेल्या रकमेहून अंदाजें रु. १०,००० अधिक लागणार आहेत. या जादा खर्चास ही सभा अनुमति देत असून ही रक्कम शक्य तितक्या लवकर मुदतीच्या कर्जाने अुभारावी या पटवर्धन समितीच्या शिफारशीसह मान्यता देत आहे. हें कर्ज ठेवी, डिबेंचर अगर अन्य तऱ्हेने कसें अुभारावें हें ठरवून त्याबाबत सर्व व्यवस्था करण्याचा अधिकार ही सभा कार्यकारी मंडळास देत आहे, व कर्ज अुभारण्याकरिता अवश्य लागल्यास परिषदेची स्थावर मालमत्ता तारण लावून देण्यासहि अधिकार कार्यकारी मंडळास देत आहे."

या ठरावास श्री. य. रा. दाते यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सभेने सर्वानुमतें मंजूर केला.

यानंतर पटवर्धन स्मारक समितीच्या वरील पत्रांतील पटवर्धन सभागृहाचें नांव बदलण्याबाबतचा ठराव वाचून दाखविण्यांत आला. या ठरावांतील सूचनेप्रमाणे 'माधवराव पटवर्धन सभागृह' या नांवाअैवजी 'माधवराव पटवर्धन साहित्यमंदिर' हें नांव वरील सभागृहास देण्यांत यावें असें सभेनें सर्वानुमते ठरविलें.

हीं कामें झाल्यानंतर सभा विसर्जन करण्यांत आली.

---

अनुक्रमणिका

# परिषद्वार्ता

[ चिटणिसांकडून ]

**कार्यकारी मंडळ**— ता. २६ ऑगस्ट व ४ ऑक्टोबर या दिवशीं कार्यकारी मंडळाच्या सभा भरविण्यांत आल्या.

ता. २६ ऑगस्टच्या सभेंत विशेष साधारण सभेने ठरविल्याप्रमाणे रु. १०,००० चें कर्ज काढण्याबद्दलच्या योजनेचा विचार झाला. अेक वर्षाच्या मुदतीच्या ठेवी म्हणून रु.३००० चें, दोन वर्षांच्या मुदतीच्या ठेवी म्हणून रु.३००० चें व तीन वर्षांच्या मुदतीच्या ठेवी म्हणून रु. ४००० चें याप्रमाणे दरसाल चार टक्के दराने अेकुण रु. १०,००० चें कर्ज काढण्याची योजना कार्यकारी मंडळाने निश्चित केली आहे व आतापर्यंत यापैकी रु. ७००० या रकमेच्या वर ठेवी परिषदेस मिळाल्या आहेत.

सोलापूर येथील संकल्पित शाखा सभेच्या घटनेस व स्थापनेस परिपत्रकाने घेतलेली मान्यता ता. ४ ऑक्टोबरच्या सभेंत कायम करण्यांत आली.

**परीक्षा**— पत्रिकेच्या ६२ व्या अंकांत प्रसिद्ध केल्याप्रमाणे प्रथमा, प्रवेश, प्राज्ञ व विशारद या परीक्षांचा १९४३-४५ या सालांसाठी अभ्यासक्रम, नियम वगैरे सर्व माहिती याच अंकीं प्रसिद्ध केली आहे. ही माहिती स्वतंत्र पत्रकरूपाने छापली असून ट. ख. सह या पत्रकाची किंमत ३ आणे ठेविली आहे.

चालू वर्षी प्राज्ञ परीक्षा ता. १४ डिसेंबर व विशारद परीक्षा ता. १६ डिसेंबर या तारखांस सुरू होतील. अुमेदवारांकडील अर्ज स्वीकारण्याची शेवटची तारीख ११ नोव्हेंबर ही आहे.

**संमेलन**— आगामी महाराष्ट्र साहित्य संमेलन नाशिक येथे सुप्रसिद्ध नाटककार आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांच्या अध्यक्षतेखाली ता. ३०,३१ ऑक्टोबर व ता. १ नोव्हेंबर या दिवशीं भरविण्याचें स्वागत समितीने निश्चित केलें आहे.

प्रतिवर्षाप्रमाणे संमेलनाध्यक्षांचा सत्कारहि ता. ३० सप्टेंबर मंगळवारी परिषदेच्या कार्यालयांत परिषदेचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली झाला.

**निवडणुकी**— ता. ४ ऑक्टोबर दिवशीं नवीन नियामक मंडळांतील सभासदांच्या निवडणुकीसाठी आलेल्या मतपत्रिकांची मोजणी झाली. या अंकाच्या मलपृष्ठावर छापलेल्या यादींत अविरोध व प्रत्यक्ष निवडणुकीने निवडून आलेले अशा सर्व सभासदांचा समावेश केला आहे.

## नवीन सभासद

**पुणें**

श्री. गणेश लक्ष्मण ढेकणे
,, जयवंत यादव चौगुले
,, शिवराम केशव दळवी
,, कृष्णराव भाअुराव बाबर
,, रामचंद्र नामदेव झोळ
,, भगवानराव रावसाहेब पाटील
,, शंकर लक्ष्मण थोरात
,, केशव महादेव बेडेकर

सौ. ज्योत्स्ना कोल्हटकर, पुणें
श्री. गोपाळ वि. वैद्य ,,
,, विठ्ठल गणेश ताम्हणकर, मुंबअी
,, जनार्दन सुका खडके, खिरोदा
प्रि. शंकर बळवंत सुखटणकर, सातारा
श्री. मधुकर हरि परांजपे, बंगलोर
,, भास्कर बळवंत ढवळे, मलकापूर
,, गोपाळ रामचंद्र कोल्हटकर, कोल्हापूर

# महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या परीक्षा

## नियम, अभ्यासक्रम अि.

१९४३-४५

'प्राज्ञ' आणि 'विशारद' या परीक्षांव्यतिरिक्त 'प्रथमा' आणि 'प्रवेश' या दोन नवीन परीक्षा १९४३ सालापासून घेण्यांत येतील. परीक्षांचा क्रम, शुल्क वगैरे गोष्टी पुढे दिल्या-प्रमाणे आहेतः —

| | परीक्षा | शुल्क रु. | प्रश्नपत्रिका | प्रत्येकीं गुण |
|---|---|---|---|---|
| १ | प्रथमा | १—०—० | १ | ,, १०० |
| २ | प्रवेश | ३—०—० | २ | ,, ,, |
| ३ | प्राज्ञ | ५—०—० | ३ | ,, ,, |
| ४ | विशारद | १०—०—० | ५ | ,, ,, |

(**टीप**— आचार्य परीक्षा तूर्त घेण्यांत येणार नाही.)

## परीक्षांचा कार्यक्रम

सामान्यतः डिसेंबर महिन्यांतील तिसऱ्या सोमवारीं परीक्षांस आरंभ केला जाअील.

### १ प्रथमा

| | | | |
|---|---|---|---|
| सोमवार | ११ ते २ | | प्रश्नपत्रिका १ |

### २ प्रवेश

| | | | |
|---|---|---|---|
| सोमवार | ११ ते २ | ... (गद्य-पद्य) | प्र० प० १ |
| ,, | ३ ते ६ | ...(स्थूलवाचन, व्याकरण) | ,, २ |

### ३ प्राज्ञ

| | | | |
|---|---|---|---|
| सोमवार | ११ ते २ | ( गद्य ) | प्र० प० १ |
| ,, | ३ ते ६ | ( पद्य ) | प्र० प० २ |
| मंगळवार | ११ ते २ | (स्थूलवाचन, व्याकरण, निबंध) | प्र०प. ३ |

### ४ विशारद

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सोमवार | ... ११ ते २ | ... ( गद्य ) | प्रश्नपत्रिका | १ |
| ,, | ... ३ ते ६ | ... ( पद्य ) | ,, | २ |
| मंगळवार | ... ११ ते २ | ... ( गद्य ) | ,, | ३ |
| ,, | ... ३ ते ६ | ...(भाषा, व्याकरण) | ,, | ४ |
| बुधवार | ... ११ ते २ | ...(निबंध, भाषा) | ,, | ५ |

(**टीप**— विशेष कारणांमुळे अेखाद्या वर्षी तारखा बदलणें झाल्यास तसें आगाअू जाहीर करण्यांत येअील.)

**केंद्रें**— मुंबअी, पुणें व नागपूर या शहरीं केंद्रें ठेवण्यांत येतील. कमींत कमी पांच अुमेदवार असतील व केंद्रविषयक व्यवस्था समाधानकारक करणें शक्य असेल तर अितर ठिकाणींहि केंद्रें अुघडण्यांत येतील.

परीक्षेस बसूं इच्छिणाऱ्या अुमेदवाराची लायकी—

(१) मराठी भाषेचा अभ्यास करूं अिच्छिणाऱ्या कोणाहि व्यक्तीस 'प्रथमा' परीक्षेस बसतां येअील.

(२) 'प्रथमा' परीक्षा उत्तीर्ण झालेल्या किंवा दुय्यम शाळांतील ५ वी अियत्ता पास झालेल्या व्यक्तीस 'प्रवेश' परीक्षेस बसतां येअील.

(३) 'प्रवेश' परीक्षा किंवा सरकारमान्य विश्वविद्यालयाची मॅट्रिक परीक्षा किंवा प्राथमिक अध्यापक विश्वविद्यालयाची 'द्वितीय वर्ष' परीक्षा अुत्तीर्ण झालेल्या कोणत्याहि व्यक्तीस, त्याचप्रमाणे प्राथमिक अध्यापक विद्यालयाची प्रथम वर्ष परीक्षा अुत्तीर्ण होअून सरकार-मान्य संस्थेंत पुरीं पांच वर्षें काम केलेल्या कोणाहि व्यक्तीस 'प्राज्ञ' परीक्षेस बसतां येअील.

(४) 'प्राज्ञ' परीक्षा किंवा सरकारमान्य विश्वविद्यालयाची मराठी भाषा घेअून बी. अे. परीक्षा, त्याचप्रमाणे श्री. ना. दा. ठा. भारतीय महिलापीठाची 'गृहितागमा' परीक्षा अुत्तीर्ण झालेल्या अुमेदवारास 'विशारद' परीक्षेस बसतां येअील.

'प्रथमा' परीक्षा अुत्तीर्ण होण्यास प्रत्येक प्रश्नपत्रिकेंत शे. ३३ गुण आवश्यक आहेत.

'प्रवेश' परीक्षा अुत्तीर्ण होण्यास प्रत्येक प्रश्नपत्रिकेंत शे. ३५ गुण आवश्यक आहेत.

'प्राज्ञ' व विशारद परीक्षा अुत्तीर्ण होण्यास प्रत्येक प्रश्नपत्रिकेंत शे. ३५ व अेकंदर परीक्षेंत शे. ४० गुण आवश्यक आहेत.

कोणत्याहि परीक्षेंत सर्व प्रश्नपत्रिका मिळून शे. ५० गुण मिळविणारा अुमेदवार दुसऱ्या कक्षेंत व शे. ६५ गुण मिळविणारा विद्यार्थी पहिल्या कक्षेंत अुत्तीर्ण झाला असें मानण्यांत येअील.

परीक्षेसाठी करावयाच्या अर्जाचा तक्ता अुमेदवारांनी परिषदेच्या कार्यालयांतून मागवून घ्यावा. तक्ता व शुल्क हीं १० नोव्हेंबरपूर्वी कार्यालयांत आलीं पाहिजेत. या तारखेनंतर आलेले अर्ज स्वीकारले जाणार नाहीत.

शुल्काची रक्कम कोणत्याहि कारणास्तव परत केली जाणार नाही. अेखादा अुमेदवार आजारामुळे किंवा अन्य महत्त्वाच्या अडचणीमुळे परीक्षेस न बसल्यास व त्याने दाखविलेलें कारण म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास योग्य वाटलें तर त्याने भरलेल्या शुल्काची ३/४ रक्कम त्यानंतर दुसऱ्याच वर्षी होणाऱ्या परीक्षेसाठी त्याच्या नांवाने राखून ठेवण्यांत येअील.

परीक्षांचा निकाल परीक्षा संपल्यानंतर सामान्यतः सहा आठवड्यांच्या आंत प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध केला जाअील. परीक्षांचा निकाल जाहीर झाल्यानंतर अेक महिन्याच्या आंत गुणांच्या केवळ बेरजांसंबंधी फेरतपासणीसाठी अुमेदवारांनी अर्ज केल्यास तेवढ्यापुरती तपासणी करून निकाल अुमेदवारास कळविला जाअील. अशा फेरतपासणीस पांच रुपये अधिक शुल्क द्यावें लागेल. अुत्तीर्ण झालेल्या अुमेदवारांस प्रमाणपत्रें देण्यांत येतील.

अुमेदवारांनी म. सा. परिषदेने मान्य केलेल्या शुद्धलेखनाच्या नियमानुसार अुत्तरें लिहिलीं पाहिजेत. या नियमांची पुस्तकें कार्यालयांतून विकत मिळतील. (किंमत २॥ आणे).

मागील प्रत्येक वर्षाच्या प्रश्नपत्रिकांस दोन आणे किंमत ठेविली आहे.

र. लु. जोशी
चिटणीस
म. सा. परिषद्

वा. दा. गोखले
चिटणीस
परीक्षासमिति
म. सा. परिषद्

## परीक्षांचे अभ्यासक्रम

### प्रथमा

प्रश्नपत्रिका १— साहित्यरत्नहार-भाग ५. (के. भि. ढवळे)
स्थूलवाचन—केवळ स्वराज्यासाठी (संक्षिप्त).

### प्रवेश

प्रश्नपत्रिका १— गद्य—गद्यविलास-मध्यमश्रेणी (टिकेकर-कुलकर्णी).
पद्य—महाराष्ट्र कविपरंपरा (य. दि. पेंढारकर).

प्रश्नपत्रिका २— स्थूलवाचन—कांही म्हातारे आणि अेक म्हातारी (वि. द. घाटे). व्याकरण—मराठी साहित्य व व्याकरण—पांचवी आवृत्ति (मोने) या पुस्तकांतील 'काव्य-विचार' (पृ. १३४) पासून 'विरामचिन्हें' (पृ. ३८४) अेवढा भाग.

### प्राज्ञ

प्रश्नपत्रिका १— गद्य—विचारसौंदर्य (वा.म.जोशी) आनंदीबाअीची दिनचर्या (पे. द. खंड ४.)

प्रश्नपत्रिका २— पद्य—रसतरंगिणी—पुढील वेंचे: १ ज्ञानदेव, २ नामदेव—स्फुट अभंग, ३ अेकनाथ—सर्व वर्णांचा धर्म, ४ तुकाराम—सामान्य-नीति, ५ मुक्तेश्वर—दमयन्तीचा त्याग, ६ वामन—स्फुट श्लोक, ७ मोरोपंत—सावित्री आख्यान, हंसकाक कथानक, अुत्तराविलाप, केकावली, ८ रघुनाथ पंडित—नलदमयंती स्वयंवराख्यान.
महाराष्ट्र शारदा—भाग १ (दि. गं. केळकर).

प्रश्नपत्रिका ३— स्थूलवाचन दौलत (ना. सी. फडके), वाअीकर मटजी (धनुर्धारी), मराठी व्याकरणाचीं मूलतत्त्वें (ग. ह. केळकर).

### विशारद

प्रश्नपत्रिका १— रागिणी (वा. म. जोशी), मूकनायक (कोल्हटकर), माझ्या आवडत्या गोष्टी (य. गो. जोशी), पुढील गोष्टी— १, ३, ४, १०, १३, १४, २०, २३, २४, २७, ३०, ३२, ३३, ३४, ३६, ३७, ३८, ३९, ४३, ४५, ४६, ४७, ४९, ५०, ६१;
काळांतील निवडक निबंध भाग १०.

प्रश्नपत्रिका २— ज्ञानेश्वरी—१२ वा अध्याय; श्लोक केकावली; तुकाराम वेंचे (प्रो. केळकर); वाग्वैजयंती (गडकरी); फुलांची ओंजळ (त्री).

प्रश्नपत्रिका ३— रामचंद्रपंत अमात्यांची आज्ञापत्रें अितिहासमंजरी पहिलीं ६० पृष्ठें (द. वि. आपटे) [४० गुण], महाराष्ट्र सारस्वत भाग १ व २ (भावे), अर्वाचीन मराठी ग्रंथाची पूर्व पीठिका (गं. बा. सरदार) [६० गुण.].

प्रश्नपत्रिका ४— दामले यांचे व्याकरण (बारीक टाअीपांतील चर्चेखेरीज सर्व भाग).
मराठी भाषा-अुद्गम व विकास (कुलकर्णी).

प्रश्नपत्रिका ५— निबंध (५० गुण). अभिनव काव्यप्रकाश व प्रतिभासाधन (५० गुण).

(१) अभ्यासविषयक ग्रंथाबरोबर त्या त्या ग्रंथकाराची चरित्रविषयक माहिती, त्यांच्या लेखनाचें वैशिष्टय, त्याची लेखनशैली, भाषापद्धति वगैरे अनुषंगिक माहिती अुमेदवारास असली पाहिजे.

---

# संपादकीय



महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचा हा चौसष्टावा अंक माझ्या चालू संपादकीय कारकीर्दीतील शेवटचा अंक होय. तो आपल्या हातीं देऊन या स्थानावरून मी आज आपणा सर्वांचा निरोप घेत आहें.

माझ्या संपादकत्वाखालील गेल्या तीन वर्षांच्या अवधींत पत्रिकेची जी कांही साहित्यिक कामगिरी झाली आहे, तिचें सर्व श्रेय लेखनसाहाय्य करून पत्रिकेचा प्रत्येक अंक अधिकाधिक सरस आणि सकस करण्यासाठीं मला मदत करणाऱ्या माझ्या प्रथितयश लेखकमित्रांना आहे. माझ्या सुदैवानें मला ज्येष्ठ आणि समवयस्क अशा दोन्ही प्रकारच्या साहित्यसुहृदांकडून सारखेंच सहकार्य मिळाल्यामुळे पत्रिकेच्या अंतरंगाच्या सजावटीची विविधता आणि व्यापकता मला बऱ्याच चांगल्या रीतीनें सांभाळतां आली; आणि सप्रमाण शास्त्रीय चर्चेबरोबरच आधुनिक दृष्टिकोणानें केलेल्या विधायक तात्त्विक विवेचनाचाहि मला त्यांत वेळोवेळीं अंतर्भाव करतां आला. मला केलेल्या या निर्हेतुक लेखनसाहाय्याबद्दल मी माझ्या सर्व लेखक व कवि मित्रांचा अत्यंत आभारी आहें.

कोणत्याहि नियतकालिकाच्या संपादकानें कितीहि निःपक्षपाती, आणि पूर्वग्रहातीत राहण्याचा प्रयत्न केला, आणि प्रत्येक विचारणीय गोष्टीचा निर्णय न्याय्य आणि तर्ककर्कश दृष्टीनें करण्याचें ठरविलें, तरी अखेरीस तोहि मनुष्यच असल्यांमुळे त्याच्या वैयक्तिक आवडीनिवडी, विचार, मतें, आदर-अनादर, ऋणानुबंध अित्यादि घटकांचा आणि त्याच्या मानवी स्खलनशीलतेचा त्याच्या संपादकीय निर्णयावर परिणाम होणें अपरिहार्य असतें, असें मला वाटतें. यामुळे अशा प्रकारच्या अनेक गोष्टी माझ्याकडून घडल्या असण्याचा संभव आहे, याबद्दल मला शंका नाहीं; आणि म्हणूनच संपादकीय स्थानावर असतांना माझ्याकडून ज्या ज्या कोणाचे जे जे कांही ज्ञाताज्ञात अपराध, मानापमान, मनोभंग, अपेक्षाभंग घडले असतील त्यांबद्दल त्या सर्वांची मी अंतःकरणपूर्वक क्षमा मागतों.

माझ्याकडून हें पत्रिकेच्या संपादनाचें काम करून घेण्यांत परिषदेच्या व कार्यकारी मंडळाच्या सभासदांनी जें औदार्य व जी सहनशीलता दर्शविली, त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. तसेंच या संपादकाच्या पदावर माझी योजना करून त्यांनी माझा जो गौरव केला त्याबद्दल त्यांच्याविषयीं मी अंतःकरणपूर्वक कृतज्ञता प्रदर्शित करतों व हें या मुदतींतील शेवटचें संपादकीय संपवितों

के. नारायण काळे

अनुक्रमणिका

रत्नागिरी जिल्हा— श्री. विश्वनाथ गोपाळ शेव्ये.

बेळगांव, कारवार जिल्हे व सावंतवाडी— प्रो. वामन पांडुरंग खानोलकर.

धारवाड व विजापूर जिल्हे व जत संस्थान— प्रो. यशवंत रघुनाथ आगाशे.

अकोला जिल्हा— श्री. महादेव दामोदर साठे.

बुलढाणा जिल्हा— श्री. महादेव रामचंद्र कानिटकर.

अमरावती जिल्हा— प्रो. विष्णु भिकाजी कोल्हटे.

मध्यप्रांत शाखासभा— डॉ. शंकर दामोदर पेंडसे, श्री. दामोदर केशव ओक.

मराठवाडा—श्री. देवीदास लक्ष्मण महाजन.

हैद्राबाद शहर व संस्थानचा अुर्वरित भाग— डॉ. वामन दामोदर गाडगीळ, डॉ. शंकर वामन हर्डीकर.

कोल्हापूर संस्थान— श्री. गोविंद शिवराम अुपळेकर, श्री. विष्णु सखाराम खांडेकर.

दक्षिणी संस्थान साहित्य सभा (शाखासभा)— प्रो. शंकर केशव कानेटकर, श्री. बाबूराव गोविंद नाअीक, डॉ. रामचंद्र महादेव भातखंडे.

गोमंतक— श्री. दत्तात्रेय व्यंकटेश पै.

बडोदें संस्थान— राजरत्न वासुदेव विनायक जोशी.

गुजरात व काठेवाड— प्रो. मनोहर रामचंद्र पाळंदे.

सिंध— श्री. कृष्ण वासुदेव जोशी.

अिंदूर संस्थान— सौ. कमळाबाअीसाहेब किबे.

ग्वाल्हेर...राजपुताना— प्रो. अवधूत महादेव जोशी.

बंगाल...नेपाळ— डॉ. शंकर पुरुषोत्तम आघारकर

दिल्ली-पंजाब अि.— सौ. सुधा जोशी.

दक्षिण हिंदुस्थान— श्री. काशीनाथ वासुदेव कर्वे.

संयुक्त प्रांत— प्रो. मालचंद्र पुंडलीक आडारकर.

## संलग्न संस्थांनी निवडून दिलेले प्रतिनिधि

१. श्री. गोपाळ केशव खरे, २. प्रो. डॉ. नरहर काशीनाथ घारपुरे, ३. श्री. यशवंत रामकृष्ण दाते, ४. श्री. दिनकर विनायक देव, ५. श्री. दुर्गाराम सखाराम धोपेश्वर, ६. रा.ब. नरहर बाळकृष्ण देशमुख, ७. श्री. बापूराव शिवराम नाअीक, ८. श्री. शंकर गोविंद पटवर्धन, ९. श्री. गणेश हणमंत पाध्ये, १०. श्री. वामन श्रीधर पुरोहित, ११. श्री. लक्ष्मण भगवान महाजन, १२. श्री. बाळकृष्ण गणेश मुर्डेश्वर, १३. श्री. महादेव गोविंद मोडक, १४. श्री. शरचंद्र वामन रानडे, १५. श्री. गणेश नरहर श्रीगोंदेकर.

## महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचीं पहिलीं तेरा वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं तेरा पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, अैतिहासिक, चरित्रें, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक शंकाचर्चा, सामाजिक, अित्यादि विषयांवर सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यांसारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**किंमत**— सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये, परिषदेच्या सभासदांस २ रु.; ट. ख. निराळा.

**वि. सू.**— चौदाव्या वर्षाच्या पुस्तकाच्याहि बांधीव प्रती तयार आहेत, परंतु या प्रत्येक प्रतीस सभासदांसहि ४ रुपये पडतील; ट.ख. निराळा.

## 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास'

### महानुभावअखेर

लेखक— कै. **बाळकृष्ण अनंत भिडे**, आकार- रॉयल अष्टपत्री, पृष्ठें-१२५. अुत्तम बांधणी. किंमत फक्त अेक रुपया. परिषदेच्या सभासदांस बारा आणे; ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठी लिहा :—

**चिटणीस,**



**म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २**

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.



